# नवभारत

वर्ष पहिलें, अंक चौथा

जानेवारी १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

—संपादकमंडळ—

आचार्य शं. द. जावडेकर
श्री. हरि कृष्ण मोहनी

आचार्य स. ज. भागवत
प्रो. वि. म. बेडेकर (कार्य. संपादक)

व्यवस्थापक : श्री. चिं. य. मराठे

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो आभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंहि सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

---

**वार्षिक रु. ९ .... .... .... सहामाही रु. ५ .... .... ....अंकास रु. १**

मुद्रक व प्रकाशक **चिं. य. मराठे** यांनीं हें मासिक **विश्वास छापखाना**, २९१ शनिवार **पुणें २** येथें छापिलें आणि **नवभारत कचेरी**, २१९ शिवाजीनगर, **पुणें ५** येथें प्रसिद्ध केलें.






# अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत, जानेवारी १९४८

## या अंकांतील लेखक.

१ श्री. कृ. के. कोल्हटकरः—(सातारा)यांचा योगशास्त्रावर गाढ व्यासंग असून, त्यांच्या ' सार्थ सविवरण पातंजल योगदर्शन ' या आगामी ग्रंथाच्या प्रकाशनाला मुंबई विश्वविद्यालयानें ५०० रु. ची मदत दिली आहे.

२ श्री. ब्रिजलाल बियाणीः—( अकोला ) विदर्भ काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष. हिंदी संघराज्याच्या घटना समितीचे सदस्य, हिंदींतील साहित्यिक. त्यांचा मराठींत ' कल्पनाकानन ' हा लघु-निबंधसंग्रह प्रसिद्ध झाला आहे.

३ श्री. शंकरराव देवः—राष्ट्रसभेचे सरचिटणीस, ' उपनिषदांतील दहा गोष्टि ', ' भगवान् बुद्धासाठीं ' या ग्रंथांचे कर्ते. ' नवभारता'चे संचालक.

४ आचार्य स. ज. भागवतः—(पुणें)—शिक्षणशास्त्रज्ञ. ' जीवन आणि साहित्य ', ' चौफुला ', ' जीवनशिक्षण ' इत्यादि ग्रंथांचे लेखक. ' नवभारता'चे एक संपादक

५ श्रीपाद जोशीः—( कोल्हापूर )—हिंदुस्तानी भाषाप्रचारक आणि गुजराती, हिन्दी, उर्दू साहित्याचे अनुवादक. ' उर्दूके अदीब ' या हिन्दी पुस्तकाचे लेखक.

६ महर्षि धों. के. ऊर्फ अण्णासाहेब कर्वेः—( पुणें )—महाराष्ट्राचे महान् कर्मयोगी. महिला-विद्यापीठाचे संस्थापक. त्यांचें ' आत्मवृत्त ' प्रसिद्ध आहे.

७ प्रा. दि. धों. कर्वेः—(पुणें) फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य (प्रिन्सिपॉल), रसायनशास्त्राचे प्राध्यापक.

८ श्री. झवेरभाई पटेलः—( नागपूर )—गुजराथ विद्यापीठाचे 'ग्रामसेवादीक्षित'. हल्लींमध्यप्रांत वऱ्हाड सरकारनें स्थापन केलेल्या ग्रामोद्योगखात्याचे आयोजनाधिकारी. ' What shall we eat ', ' आहार व पोषण ' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

९ राजकवि यशवंत (पुणें)—सुप्रसिद्ध कवि, 'यशोधन' 'बंदिशाळा' इत्यादि काव्यसंग्रहांचे लेखक.

१० श्री. ना. गो. चापेकरः—( बदलापूर )—सुप्रसिद्ध साहित्यिक व समाजशास्त्रज्ञ.'आमचा गांव' ' समाजनियंत्रण ' ' वैदिक निबंध ' ' काश्मीर ' इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

११ श्री. वि. द. साठेः—( पुणें )—नाट्यविषयावरील व्यासंगी अभ्यासक.

१२ श्री. रा. कृ. पाटिलः—(नागपूर)—बी. एस्सी. (बनारस), एल्. एल्. बी. (नागपूर), बार–ॲट–लॉ. आय. सी. एस. मधून १९४३ त राजीनामा दिला. हल्लीं अन्नमंत्री, मध्य-प्रांत, वऱ्हाड.

१३ प्रा. अ. रा. कामत (पुणें) एम. एस्सी. फर्ग्युसन कॉलेजमध्यें गणित विषयाचे प्राध्यापक. ' सोव्हिएट शिक्षणपद्धति ' या ग्रंथाचे लेखक.

१४ सेनापति पां. म. बापटः—तीन तपांवर राष्ट्रसेवेंत आयुष्य व्यतीत करणारे कार्यकर्ते. ' Holy song ', ' गीताहृदय, ' ' [illegible] ग्रंथ ' या ग्रंथांचे लेखक.

अनुक्रमणिका

# भारतीय मानसशास्त्राचें तुलनात्मक दिग्दर्शन

कृ. के. कोल्हटकर

"At the present juncture of human affairs, two studies only are of real importance namely: Religion and Psychology. For, it is these two closely allied studies that must teach us the answers to the old questions—What am I? What may I hope for? What ought I to do?"

W. McDougall

अलीकडे आपल्याकडील विद्वानांचें लक्ष मानसशास्त्रविषयक अभ्यासाकडे बरेंच वेधलें आहे असें दिसून येतें. एतद्विषयक चर्चा वर्तमानपत्रें व नियतकालिकें यांमधून वारंवार झालेली आढळून येतें; इतकेंच नव्हे तर मानसशास्त्रांतील एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नावर आधारलेल्या लघुकथा व कादंबऱ्या देखील अलीकडे प्रसिद्ध होऊं लागल्या आहेत. कित्येक व्याख्यानमालांतून या विषयावरचीं व्याख्यानपुष्पें गोंवलेलीं आढळतात; तर कित्येक ठिकाणीं या विषयाचा अभ्यास व ऊहापोह करण्याकरितां लहानमोठ्या संस्था स्थापल्या गेल्याचेंही ऐकण्यांत येतें. या सर्व गोष्टींवरून मराठी वाचकांत मानसशास्त्रविषयक जिज्ञासा उत्पन्न झाली असून अनेक अभ्यासक मराठी वाचकांची ही जिज्ञासा आपआपल्या मार्गांनीं शमविण्याचे प्रयत्न करीत आहेत असें दिसून येतें. अशा स्थितींत भारतीय आर्य ऋषींनीं या शास्त्रांतील सिद्धांतांची मांडणी कशी केली आहे व त्यांनीं या शास्त्राच्या विकासाचा पल्ला कोठपर्यंत पोचविला आहे या संबंधींची तुलनात्मक चर्चा केल्यास ती वाचकांस थोडीबहुत उपयुक्त होईल, असें वाटल्यावरून ती या लेखांत करण्याचा प्रयत्न केला आहे.

जी तुलनात्मक रूपरेखा वाचकांपुढें मांडावयाची आहे ती 'भारतीय' मानसशास्त्राची होय. यांत 'भारतीय' हें विशेषण मुद्दाम योजण्यांत आलें आहे. हल्लीं 'मानसशास्त्र' असा शब्द उच्चारला कीं वाचकांच्या मनश्चक्षूपुढें अगदीं अलीकडच्या काळांतले जेम्स्, स्टाऊट, मॅक्डुगल्, फ्राईड, ॲडलर, युंग, वाट्सन्, वुडवर्थ, मर्फी, थॉर्नडाइक् इत्यादि महाव्यासंगी मानसशास्त्रज्ञ व त्यांच्या मानसशास्त्रविषयक कित्येक निर्दोष तर कित्येक सदोष उपपत्ती उभ्या राहतात. प्रस्तुत लेखांत या अर्वाचीन पंडितांचें मानसशास्त्रविषयक सिद्धांत काय आहेत या विषयींची चर्चा मुख्यतः करावयाची नाहीं, तर त्यांनीं प्रतिपादिलेले सिद्धांत दृष्टीपुढें ठेवून भारतीय आर्यऋषींनीं या सिद्धांतांबाबत मानसशास्त्रविषयक कोणती विचारप्रणाली आपल्यापुढें मांडली आहे यासंबंधींचें दिग्दर्शन करावयाचें आहे. अर्थात् हें दिग्दर्शन करीत असतांना भारतीयांचें प्राचीनकाळपासून विकास पावत परिणतावस्थेस पोहोंचलेलें मानसशास्त्र व अर्वाचीन मानसशास्त्रव्यासंगी पंडितांचें प्रगमनशील मानसशास्त्र यांची तुलना मधून मधून करावी लागणार, हें उघडच आहे.

## मानसशास्त्रें दोन आहेत काय ?

वास्तविक पाहतां 'शास्त्र' म्हटलें कीं तें एकरूपच असावयास पाहिजे, असें प्रथमदर्शनीं वाटतें. पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, इत्यादि शास्त्रांतील





अनुक्रमणिका

सिद्धांत इतके निश्चित आहेत कीं, त्यांची सत्यता पडताळून पाहण्याचे प्रयोग कोणीही कोठेंही, केव्हांही आणि कितीदांही करून पाहिले, तरी त्यांची सत्यता प्रतीतीस आल्याशिवाय रहात नाहीं. आणि अशी प्रतीति आली, तरच त्या ज्ञान–विज्ञानशाखेला शास्त्र ही संज्ञा लावणें उचित होईल. अशी स्थिति असल्यामुळें मानसशास्त्र हें जर 'शास्त्र' असेल तर त्यांतील सिद्धांतांत एकवाक्यता असली पाहिजे. मग 'भारतीयांचें मानसशास्त्र', 'अर्वाचीनांचें मानसशास्त्र' असा भेद कां करावा लागतो ? या शंकेचें समाधान प्रथम करूं.

वर उल्लेखिलेलीं पदार्थ-विज्ञान-शास्त्र, रसायन-शास्त्र इत्यादि शास्त्रें व मानसशास्त्रासारखीं शास्त्रें यांच्या स्वरूपांत मूलतःच एक महत्त्वाचा भेद आहे. पहिल्या प्रकारचीं शास्त्रें केवळ जडवस्तुविषयक असून मानसशास्त्र हें, चेतन वस्तु जें मन, तद्विषयक आहे. आतां जड वस्तूंनाहि अतिसूक्ष्म प्रमाणांत मन असतें, ही गोष्ट पौर्वात्य शास्त्रज्ञांना मान्य आहे व पाश्चिमात्य शास्त्रज्ञही–निदान त्यांच्यापैकीं कांहींजण तरी–ही गोष्ट मान्य करण्याच्या मार्गावर आहेत हें खरें आहे. पण जडवस्तूंच्या ठिकाणची ही मनःशक्ति इतक्या अविकसित अवस्थेंत आहे कीं, तिच्या योगानें त्यांच्या भौतिक गुणधर्मांत बदल होऊं शकत नाहींत. पण पुष्कळ अंशांनीं विकसित झालेल्या मनःशक्तीनें संपन्न असलेल्या चेतन सृष्टीला मात्र जड सृष्टिविषयक नियम लावतां येत नाहींत. आतां चेतन पदार्थांच्या वर्तनाला मुळीं नियमच नाहींत असें मात्र नव्हे. कारण, कांहींच नियम नसतील तर त्यांचें शास्त्रच बनणार नाहीं. तेव्हां चेतन वस्तूंच्या वर्तनाला नियम आहेत; पण ते जड पदार्थांना लागूं असलेले नियम नसून अगदीं स्वतंत्र व स्वरूपतः भिन्न असे वेगळे नियम आहेत.

दोहोंचीं दोन उदाहरणें घेऊन हें अधिक स्पष्ट करूं. उज्जातु ( Hydrogen ) चे दोन (Atoms) अणु ऊर्वातु ( Oxygen ) च्या एका अणूशीं विशिष्ट प्रतिक्रियेनें संयुक्त होतील, तर त्यांच्या या संयोगापासून पाण्याचा एक व्यणुक ( Molecule ) तयार होतो. हा रसायनशास्त्रांतला एक नियम आहे. या नियमाचा पडताळा जगांतील कोणत्याही देशांतील शास्त्रज्ञांनीं केव्हांही आणि कितीदांही घेतला तरी त्यांस हा नियम अबाधित असल्याचें दृष्टीस पडेल. पण विशिष्ट परिस्थितींत मनःशक्तीनें संपन्न असलेले मनुष्यप्राणी अशाच अगदीं नियमबद्धपणें वागतील, असें मात्र म्हणतां येणार नाहीं. 'सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान' अशा वृत्तीच्या एखाद्या तुकोबासारख्या माणसाला रस्त्यांतून जात असतां सोन्याचा दागिना वाटेंत पडलेला आढळला, तर त्याला हर्षविषाद कांहींच न होतां तो तसाच पुढें जाईल, तर दुसऱ्या एखाद्याला तो सांपडल्याचा आनंद होईल. आणि तिसऱ्या एखाद्याला तो दिसला असूनहि दूरत्वामुळें अगोदर उचलतां आला नाहीं म्हणून दुःखही होईल. म्हणजे सोन्याच्या दागिन्याचें दर्शन हें बाह्य निमित्त तिघांच्या संबंधांत सारखेंच होतें. त्या दागिन्यावर पडलेला उजेड परावर्तित होऊन त्याचे स्पंद तिघांच्याही डोळ्यांच्या द्वारांनीं मेंदूपर्यंत जाऊन पोहोंचले. इतका प्रकार पदार्थविज्ञानशास्त्रांतील नियमानुसार तिघांच्याही बाबतींत अगदीं एकरूप असाच घडला पण तिघांच्या मनांत होणारी प्रतिक्रिया मात्र अगदीं भिन्न झाली. मन हें जर उज्जातु किंवा ऊर्वातूंच्या अणूंप्रमाणें जड असतें, तर दागिन्यावरील प्रकाशकिरण मेंदूपर्यंत पोहोंचतांच तेथें जी मनोमय प्रतिक्षिप्तक्रिया ( Reflex action ) व्हावयाची ती वरील तिघांच्याही ठिकाणीं अगदीं एकरूपच झाली असती; पण तसें न घडतां प्रत्येकाच्या बाबतींत ती अगदीं भिन्न प्रकारची झाली म्हणजे या ठिकाणीं मनाला जड वस्तूंत प्रतीत होणारा नियम लागूं पडला नाहीं. मौल्यवान् वस्तु दृष्टीस पडल्यावर एक जण तटस्थ वृत्तीनें पुढें निघून जातो; दुसरा ती उचलून घेऊन आनंदी वृत्तीनें पुढें वाट चालूं लागतो; आणि तिसरा दुःखित अंतःकरणानें पुढें जातो; याप्रमाणें एकाच परिस्थितींत तीन मनांच्या तीन अवस्था झाल्या. याला कारणें असलींच पाहिजेत. हीं कारणें शोधून काढणें व त्या ठिकाणीं योग्य कार्यकारणभाव स्थापित करणें, हें मानसशास्त्राचें काम आहे. ज्या कारणांमुळें तिघांचें तीन प्रकारचें वर्तन घडतें, तीं कारणें मनोमयच असल्यामुळें त्याचा शोध सूक्ष्मदर्शक यंत्रासारख्या जड वस्तूंच्या साहाय्यानें होणें शक्य नसतें; म्हणून हें काम करीत








## भारतीय मानसशास्त्राचें तुलनात्मक दिग्दर्शन

असतां मानसशास्त्रज्ञांना आपली कल्पनाशक्ति चालवावी लागते. बुद्धीची पातळी सर्वांची सारखीच नसल्यामुळें या कारणांच्या भिन्न भिन्न उपपत्ती शास्त्रज्ञांकडून आपआपल्या बुद्धीप्रमाणें प्रतिपादिल्या जातात आणि मग जो तो आपआपल्या उपपत्तींतून त्याच्या समजुतीप्रमाणें सुसूत्र असें स्वतःचें एक मानसशास्त्र बनवितो. अशाप्रकारें दोनच नव्हे तर अनेक मानसशास्त्रें पाश्चिमात्य राष्ट्रांत निर्माण झालीं आहेत. या सर्व मानसशास्त्रांच्या अनेक बाबतींत परस्परांशीं नुसता भेदच नव्हे तर विरोधहि दिसून येतो. तथापिहि सर्वांत निर्विवाद असलेलें 'सामान्य' म्हणून कांहीं आढळतेंच; हें जें 'सामान्य' त्यालाच उद्देशून पाश्चिमात्यांचें मानसशास्त्र असें नांव या लेखांत दिलें आहे. त्याची व भारतीय आर्य ऋषींच्या मानसशास्त्राची तुलना करणें, हें प्रस्तुत लेखाचें प्रयोजन आहे.

### पाश्चात्य मानसशास्त्राची वाढ व मर्यादा

पाश्चिमात्यांच्या मानसशास्त्रांत अगदीं स्थूल असे दोन संप्रदाय दृष्टीस पडतात. त्यांतील एक संप्रदाय मन, किंवा इच्छा, आशा, संकल्प, ध्येय, प्रयोजन, हेतु, भावना, वासना, इत्यादि स्वरूपांनीं होणारे मनाचे भिन्नभिन्न आविष्कार यांतील कशालाच मानीत नाहीं. या संप्रदायिकांचें म्हणणें असें कीं,

"Man is a machine and his every action is the outcome of mechanical processes that, in theory, can be exactly calculated and foretold according to strictly mechanistic principles (Behaviourism-An Exposure P. 73 By W. Mcdougall)"

'मनुष्य हा एक यंत्रच असून त्याची प्रत्येक क्रिया या यान्त्रिक घटनेंतूनच निर्माण होत असते. यंत्रशास्त्राच्या नियमानुसार या घटनांची उपपत्ति अगदीं बिनचूकपणें बसवितां येते व तदनुसार पुढें काय घडणार, हें तितकेंच बिनचूकपणें सांगतां येतें. म्हणजे यंत्राच्या हालचाली ज्याप्रमाणें कांहीं विशेष नियमानुसार घडत असतात, त्याप्रमाणेंच मनुष्याच्या हालचालीही कांहीं विशिष्ट नियमानुसार घडत असतात. त्या घडण्याला निराळ्या मनाची आवश्यकता नाहीं. यासाठीं मन म्हणून कांहीं वस्तु असण्याची गरजच नाहीं; किंवा तें असलें तरी मनुष्याच्या हातून घडणाऱ्या सर्व व्यापारांत त्या मनाची मुळींसुद्धां गरज न लागतां ते यंत्रव्यापाराप्रमाणेंच कार्यकारणभावानें घडून येत असतात. आणि म्हणून आपल्याला त्या व्यापारांच्यामागें असलेल्या कारणांचें ज्ञान झालें, तर पुढें त्यांपासून कोणते व्यापार किंवा क्रिया घडतील हें निश्चितपणें सांगतां येईल. या संप्रदायाचा मुख्य पुरस्कर्ता वॉट्सन् हा शास्त्रज्ञ असून त्याच्या संप्रदायाला 'Behaviourism' 'स्वभाववाद', 'वर्तनवाद' असें म्हणतात. वॉट्सन्‌च्या नांवावरून याचा उल्लेख 'वॉट्सनिअन बिहेव्हिअरिझम्' असाही करतात.

या संप्रदायाचा येथें उल्लेख करण्याचें कारण असें कीं, तो वरवर उथळसा वाटला तरी त्याचा पुरस्कर्ता प्रो. वॉट्सन व त्याचे अनुयायी यांनीं स्वमतसिध्यर्थ इतका पुरावा गोळा केला आहे आणि इतकें लेखन केलें आहे कीं, अनेक मानसशास्त्रज्ञांना या मताचें खंडन करणें भाग पडलें आहे. या संप्रदायिकांनीं गोळा केलेला पुरावा व त्यावरून काढलेला निष्कर्ष आणि त्याच्या खंडनार्थ इतर मानसशास्त्रज्ञांनीं केलेला युक्तिवाद यांचा परामर्ष घेणें प्रस्तुत लेखाच्या मर्यादेंत येत नसल्यामुळें, तो येथें न करतां, त्याचा फक्त नामनिर्देश करून आपण आपल्या प्रस्तुत विवेचनाकडे वळूं.

वरील संप्रदाय सोडला तर बाकीचे सर्व मानसशास्त्रज्ञ मन म्हणून कांहीं वस्तु मानतात व त्याच्या गुणधर्मांचें विवेचन करून आपापल्या उपपत्ती मांडतात. शास्त्रज्ञांच्या बुद्धीची पातळी, त्यांच्या अंतःकरणाची निर्मलता, त्यांच्या मनाचा कल आणि अभ्यासासाठीं मिळालेल्या व्यक्तींची अंतर्बाह्य भिन्न मनःस्थिति व परिस्थिति यांमुळें शास्त्रज्ञांत मतभेद व मतविरोध निर्माण होतात व प्रत्येकास आपली उपपत्ति आपल्यास आलेल्या अनुभवावर आधारलेली म्हणून अगदीं बरोबर आहे, असें वाटतें व तदनुसार तो आपलें 'मानसशास्त्र' बनवितो. डॉ. अड्लर आपल्या ग्रंथांत या स्थितीचें वर्णन असें करतो.

'There are many psychologies and psychiatries in existence. One psychologist








takes one direction, another, another direction, and no one believes that the others are right.' (Science of Living)

अशा स्थितींत पाश्चिमात्य शास्त्रज्ञांत इतकीं मानसशास्त्रें व त्यांच्या उपशाखा निर्माण झाल्या आहेत कीं, वाचकांचीं मनें गोंधळून गेल्याशिवाय रहात नाहींत. गाढ विद्वत्ता व दुसऱ्यांच्या गुणांचें ग्रहण करून समतोल लेखन करण्याची हातोटी, यांविषयीं प्रसिद्ध असलेला मानसशास्त्रज्ञ मॅक्डुगल या परिस्थितीला उद्देशून निराशेचे उद्गार काढतो कीं,

"The psychologists of the present generation have so lamentably failed to reach agreement on the fundamentals of our science."

"I will point to a recent popular survey of modern science by a very competent hand, that of Mr. J. W. N. Sullivan. In his book 'The Limitations of Science" he sums up by saying- "Certainly there is no generally accepted body of psychological doctrine. There are rather a number of different theories, each having a limited range of application and, where they profess to deal with the same phenomena, differing profoundly from one another" (Psycho-analysis and Social Psychology)

मॅकडुगलसारख्या समतोल विचाराच्या मानसशास्त्रज्ञाला हल्लींच्या पाश्चिमात्यांच्या मानसशास्त्राचें स्वरूप कसें वाटतें, हें त्याच्या वरील उद्गारावरून स्पष्ट होत आहे. अशी वस्तुस्थिति कां असावी याची मीमांसा करीत असतां हा शास्त्रज्ञ याहूनहि निराशेचे उद्गार काढतो. तो म्हणतो—

"The present condition of psychology is more deplorable now, than it was fifty or one hundred years ago or indeed at any earlier period, you may name. For the last twenty years at least, the workers have been very numerous and active, and the mass of publication enormous. Yet the chaos continues and grows worse. Serious divergences of principle are more numerous and more acute; the hope of agreement seems to grow fainter."

'मानसशास्त्राची हल्लींची अवस्था शोचनीय आहे. आणि महत्त्वाच्या बाबतींत तर ती पन्नास किंवा शंभर वर्षांपूर्वींच्या काळांतल्या अवस्थेपेक्षांचसें काय, पण पूर्वींच्या कोणत्याही काळांतल्या अवस्थेपेक्षां अधिकच शोचनीय आहे. गेल्या वीस वर्षांत तरी मानसशास्त्राच्या क्षेत्रांत संशोधकांची संख्या खूपच वाढली आहे. त्यांचा उद्योग अविरतपणें चालू आहे आणि त्यांनीं प्रसिद्धिलेली सामुग्री विपुल आहे. तरी पूर्वींचाच गोंधळ पुढें चालू आहे. इतकेंच नव्हे तर तो वाढतच आहे. महत्त्वाच्या बाबींतही असलेले तीव्र मतभेद वाढत चालले असून ते तीव्रतर होत आहेत, आणि एकमत होण्याची आशा दुरावत चालली आहे.' वस्तुस्थितीचें असें वर्णन करून या सर्व परिस्थितीचें मूलभूत कारण तो येणेंप्रमाणें सांगतो—

"The more fully acquainted I become with the history of psychology, the more I am inclined to this pessimistic conclusion, namely, the mental powers of our species are inadequate to the task of building up the science of human nature."

"मानसशास्त्राच्या इतिहासाचा जसजसा मला अधिक परिचय होत चालला आहे, तसतसा माझ्या मनांत असा नैराश्यवाद बळावत चालला आहे कीं, मानवी मनोधर्माचें शास्त्र बनविण्याचें अवघड काम साधण्याला आपणां पाश्चिमात्यांचें बौद्धिक सामर्थ्यच अपुरें पडत आहे." मॅकडुगल हा शास्त्रज्ञ तिकडच्या देशांत फार मानला जातो. एका अशाच विद्वान् लेखकानें मॅकडुगलच्या मृत्युलेखांत त्याच्यासंबंधीं येणेंप्रमाणें उद्गार काढले आहेत.

"Historically he will stand for the great transitional writer—championing all that was good in the old psychology, jealous of integrity and yet making a way for new-comers.

यावरून मॅकडुगल हा शास्त्रज्ञ केवढ्या अधिकाराचा होता, हें लक्षांत येईल, स्वतः बऱ्या










श्रेणींतील मानसशास्त्रज्ञ असूनही त्याला देखील पाश्चिमात्यांची बुद्धि या कार्यास अपुरी पडत आहे असें वाटावें, अशी वस्तुस्थिति आहे यांत मात्र शंका नाही. कारण एकट्या अमेरिकेंत अमेरिकन सायकॉलॉजिकल ॲसोसिएशनचे दीड हजारापेक्षां अधिक संशोधक आहेत, आणि इंग्लंड-मधील ब्रिटिश सायकॉलॉजिकल सोसायटीचे एक हजारापेक्षां अधिक संशोधक आहेत. यांच्यांत त्यांच्या देशांतील इतर संस्थांचे संशोधक आणि फ्रान्स, जर्मनी, रशिया, ऑस्ट्रिया इत्यादि अनेक देशांतील मानसशास्त्रविषयक संशोधन करणाऱ्या संस्था व त्यांचे शेकडों संशोधक यांचा समावेश केला, म्हणजे मानसशास्त्राचा प्रदेश आक्रमण करण्याच्या कामीं मानसशास्त्रज्ञांचें केवढें प्रचंड सैन्य गुंतलें आहे, हें लक्षांत येतें. इतक्या बहुसंख्य शास्त्रज्ञांनीं या शास्त्रासंबंधीं केलेलें लेखन किती अवाढव्य असेल, याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. 'बिहेव्हिअरिझम्'चा पुरस्कर्ता प्रो. वॉट्सन् लिहितो—

"Literally, millions of printed pages have been published on the minute analysis of this intangible something called consciousness"

'"जाणीव" ही इंद्रियांना अगोचर असलेली वस्तु काय आहे याचा सूक्ष्म छडा लावण्याकरितां अक्षरशः लक्षावधि पृष्ठें छापून प्रसिद्ध झालीं आहेत.' एका मुद्यावर जर इतका ग्रंथविस्तार तर मानस-शास्त्रांतर्गत अनेक मुद्यांसंबंधीं केवढा अफाट ग्रंथ-सागर पाश्चिमात्य मानसशास्त्रज्ञांच्या अविरत प्रयत्नांनीं निर्माण झाला असेल! पण इतके बहुसंख्य शास्त्रज्ञ आणि त्यांनीं लिहिलेलें अपरंपार वाङ्मय असूनहि हल्लींचें मानसशास्त्र पूर्वीच्या कोणत्याहि काळांतल्या अवस्थेपेक्षां अधिक शोच-नीय अवस्थेंत असल्याचें मॅक्डुगल हा ग्रंथकार स्वानुभवानें सांगतो. तेव्हां पाश्चिमात्यांची बुद्धिच या कामाला असमर्थ आहे, हा त्याचा अभिप्राय मान्य करण्याजोगा नाहीं असें कोण म्हणूं शकेल!

## भारतीय मानसशास्त्राची दृष्टि

आणि यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. मानस-शास्त्राची सिद्धि करणारें प्रमुख साधन म्हणजे शास्त्र-ज्ञांचें मनच होय. पाश्चिमात्यांचा स्वभाव सामान्यतः बहिर्मुख व भोगप्रवण असल्यामुळें त्यांचीं मनेंही सामान्यतः रजोगुणभूयिष्ठ अशींच असतात. त्यांच्या ठिकाणीं शमदमादिसाधनसंपत्ति सांपडणें कठीणच. मन अंतर्मुख करून यमनियमादिकांच्या अनुष्ठानानें तें निष्किल्बिष करावें आणि मनाच्या धर्मांची व अवस्थांची आपल्या स्वतःच्या ठिकाणीं प्रतीति घेऊन मग मानसशास्त्राच्या सिद्धांतांची रूपरेखा तदनुसार जगापुढें मांडावी, ही कल्पनाही अजून त्यांच्या मनांत उत्पन्न झालेली नाहीं. भारतीय मानसशास्त्राची दृष्टि याहून फारच वेगळी आहे. भारतीयांत मानसशास्त्राचा विचार अति-प्राचीन काळापासून चालू झाला होता. कठ, छांदोग्य, श्वेताश्वतर इत्यादि उपनिषदांतून मानसशास्त्रविषयक अनेक प्रश्नांचा ऊहापोह समर्पकपणें झाला आहे. एक ज्ञानकलाच मनाच्या निरनिराळ्या आविष्कारांत कशी प्रकट होत असते, हें सांगत असतांना ऐतरेयोप-निषदांत या ज्ञानकलेचें हृदय, मन, संज्ञान, आज्ञान, विज्ञान, प्रज्ञान, मेधा, दृष्टि, धृति, मति, मनीषा, जूति, स्मृति, संकल्प, काम, ऋतु, असु व वश असे एकूण अठरा आविष्कार सांगितले आहेत. येथें एक गोष्ट लक्षांत घ्यावयास पाहिजे कीं, मनोव्यापारांचा हा अभ्यास, 'मानसशास्त्र' म्हणून कांहीं एक स्वतंत्र शास्त्र आहे, अशा दृष्टीनें भारतीय मुनींनीं केला नसून अध्यात्मविद्येचें तें एक अंग या दृष्टीनें त्यांनीं तो केला आहे. पाश्चिमात्यांचा दृष्टिकोन अगदीं वेगळा आहे. त्यांचे शास्त्रज्ञ धर्म (religion—कर्मकांड), मानसशास्त्र (Psychology उपासनाकांड) आणि तत्त्वज्ञान (Philosophy-ज्ञान-कांड) हीं तीन स्वतंत्र शास्त्रें आहेत, असें मानतात. यामुळें त्यांच्यांतील धार्मिक म्हणजे कर्मकांडाधिकारी मानसशास्त्र व तत्त्वज्ञान यांविषयीं उदासीन असतो, मानसशास्त्रज्ञ विहितकर्मानुष्ठानाचा व तत्त्वज्ञानाचा आपल्या शास्त्राशीं कांहीं संबंध नाहीं असें मानून चालतो. आणि तत्त्वज्ञानी धर्माचरण व उपासना यांविषयीं उपेक्षा बाळगून आपलें तत्त्वज्ञान प्रति-पादितो. म्हणून भारतीयांच्या दृष्टीनें असें ह्मणतां येईल कीं, आर्यऋषींची एतद्विषयक दृष्टि प्रवृत्ति-निवृत्तिलक्षण धर्मास धरून असते, तर पाश्चिमा-त्यांची एतद्विषयक दृष्टि अशा व्यापक धर्मास सोडून असते. यालाही कारण, पाश्चिमात्यांची धर्मकल्पना








आणि भारतीयांची धर्मकल्पना यांच्यांत मूलतःच असलेला भेद, हें होय. कर्म, उपासना व ज्ञान या तिहींचा समन्वय वैदिक धर्मांत जितक्या पूर्णपणें झालेला आहे, तसा तो इतर कोणत्याही धर्मात झालेला नाहीं; आणि याला ख्रिस्ती धर्महीं अपवाद नाहीं. वैदिक धर्मांत 'आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु। बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः-प्रग्रहमेव च। इंद्रियाणि हयानाहुर्विषयान् तेषु गोचरान्' (कठोपनिषत्) 'जीवात्मा हा रथांतून प्रवास करणारा स्वामी आहे, शरीर हाच रथ होय, बुद्धि हा सारथि असून त्याचा मन हा लगाम आहे. या लगामाच्या साहाय्यानें तो इंद्रियरूपी घोड्यांना आपल्या स्वाधीन ठेवीत असतो. आणि शब्दादि पांच विषय ही त्या घोड्यांची गोचरभूमि होय' अशी वैदिकांची व्यापक दृष्टि असल्यामुळें अंतरात्मा व बाह्य जगत् यांचा संधि घडवून आणणाऱ्या मनाच्या धर्मांचें निरीक्षण व परीक्षण, जीवात्म्याचें अंतिम ध्येय जो आत्मसाक्षात्कार, त्याच्या कसोटीवर भारतीय ऋषींनीं केलें आहे. आणि म्हणून प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंचा समावेश धर्मांत करून धर्माला फार व्यापक स्वरूप दिलें आहे. यामुळें वैदिक धर्मांत 'शास्त्रं युक्तिर्देशिकोक्तिः प्रमाणं। चान्तःसिद्धा स्वानुभूतिः प्रमाणम्' (श्री शंकराचार्य)—शास्त्र, युक्ति, देशिकोक्ति आणि अंतःसिद्धा स्वानुभूति या चार प्रमाणांनीं अध्यात्मशास्त्राचें प्रतिपादन निःसंदेहपणें झालें आहे व याच्या अंगभूत म्हणून मनोधर्मांचा विचार झाला असल्यानें तोही तसाच निःसंदिग्ध झालेला आहे. वरीलपैकीं स्वानुभूति या प्रमाणाचें सर्वांत अधिक महत्त्व आहे. आणि हजारों वर्षांपूर्वींच्या सनकादि मुनींपासून तों चालू काळांतील रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, रामतीर्थ, योगी अरविंद घोष इत्यादि महापुरुषांपर्यंतच्या शेंकडों ऋषिमुनींनीं व साधुसंतांनीं हा आत्मानुभूतीचा मार्ग चोखाळला असल्यामुळें त्या विषयीं व तदंगभूत मनोधर्मांविषयीं आतां कसलाच संदेह उरलेला नाहीं. अशा रीतीनें परिणत अवस्थेस पोहोंचलेलें भारतीयांचें प्रौढ मानसशास्त्र आणि परिणममान अवस्थेंतच असल्यानें जें 'अद्यापि बाल्यदशेंतच आहे' असे उद्गार योगी अरविंदांनीं एके ठिकाणीं ज्या विषयीं काढले आहेत, तें पाश्चिमात्यांचें मानसशास्त्र, यांची तुलना करून त्या दोहोंत साम्य व भेद कोणते आहेत, तें आपल्यास पहावयाचें आहे. अर्थात् साम्य फार थोडेंच असणार आणि भेद मात्र पुष्कळ असणार हें उघडच आहे.

## मनोगाहनशास्त्राचे अभिनव सिद्धान्त

चेतन जीवांच्या सर्व हालचालींची उपपत्ति, मनाची आवश्यकता न ठेवतां, उत्तेजक बाह्य निमित्त (Stimulus) व त्यामुळें इंद्रियविज्ञान-(Physiology)—शास्त्रानुसार नियमबद्धपणें शरीरद्वारां प्रतीत होणारी प्रतिक्षिप्त (reflex) क्रिया (response), या दोनच गोष्टींत समाविष्ट करणारा स्वभाववाद—(Behaviourism)—पक्ष सोडला तर आज मितीला बाकीचे मानसशास्त्रज्ञ, मन म्हणून कांहीं वस्तु आहे, असें मानणारेच आहेत. या शास्त्रज्ञांची एकोणिसाव्या शतकाअखेरपर्यंत मनाविषयीं एक सामान्य समजूत अशी होती कीं, जाणिवेच्या कक्षेंत जेवढे मनोव्यापार अनुभवास येतात तेवढ्यांचेंच बनलेलें मन होय. जाणिवेंत न येणाऱ्या अशा कांहीं गोष्टी मनांत अंतर्भूत असतील, अशी कल्पना त्यांची नव्हती. पण विसाव्या शतकाच्या आरंभीं डॉ. फ्राइड या महाबुद्धिमान् व महाव्यासंगी शास्त्रज्ञानें प्रथमच असा शोध लावला कीं, जाणिवेच्या कक्षेंत जे मनोव्यापार घडत असल्याचे दिसून येतात, ते मनाचा केवळ अल्प अंश असून या कक्षेच्या पलीकडे प्रसुप्तावस्थेंत मनाचा फारच मोठा भाग असून त्यांतच जाणीवपूर्वक होणाऱ्या मनोव्यापारांचें नियंत्रण व प्रेरण करण्याचें सामर्थ्य असतें. झाडाचें फळ खालीं पडलेलें पाहून गुरुत्वाकर्षणाचा सर्वव्यापक नियम ज्याप्रमाणें न्यूटनच्या प्रतिभेंत स्फुरला, त्याप्रमाणेंच एका सामान्य प्रसंगावरून वरील गोष्ट डॉ. फ्राइडच्या प्रतिभेला गोचर झाली. तो स्वतः व्हिएन्ना येथील प्रख्यात डॉक्टर असल्यामुळें त्याच्याकडे मनोव्यथेनें पिडलेले (neurotic) असे अनेक रोगी येत असत. त्या रोग्यांत श्रीमंत ज्यू लोकांच्या स्त्रिया प्राधान्यानें असत. सर्व कांहीं अनुकूल असतांना या स्त्रिया असमाधानी, चिरचिऱ्या आणि संत्रस्त मनाच्या कां असाव्यात याची चिकित्सा करीत असतां फ्राइडला असें आढळून आलें कीं, त्यांच्या












पूर्वआयुष्यांत निसर्गानुसार उत्पन्न होणाऱ्या कामवासनांना त्यांच्या समाजांत रूढ असलेल्या नैतिक व सांस्कृतिक कल्पनांमुळें योग्य अवसर न मिळतां त्या विच्छिन्न ( repressed ) झालेल्या होत्या. या वासना जरी पुढें स्मृतिक्षेत्रांत वावरत असलेल्या केव्हांही दिसत नसल्या, तरी त्या क्रियांच्या सर्व मनोव्यथांना त्याच कारण आहेत, असें त्यास आढळून आलें. या वस्तुस्थितीचा पडताळा तसल्याच मनोव्यथा असलेल्या अनेक रोग्यांच्या बाबतींत घेतल्यानंतर फ्राइडनें वरील सिद्धांत जगापुढें प्रथम व्याख्यानरूपानें व नंतर ग्रंथ लिहून मांडले. हे अभिनव सिद्धांत मानसशास्त्रज्ञांना मोठे विस्मयजनक वाटले; कारण त्यांमुळें मनोधर्मांविषयींच्या रूढ कल्पनांत अगदींच उलथापालथ होत होती. जाणिवेनें युक्त असलेल्या मनोव्यापारांना त्यायोगें फारच गौणत्व येत असून प्रसुप्तावस्थेंत असलेल्या वासनांना प्रमुख स्थान मिळत होतें, इतकेंच नव्हे तर त्या वासनांचें व त्यांच्या गूढावस्थेंतही होत असलेल्या खळबळीचें ठाकठकिपणें व्यक्त होणारें बाह्यस्वरूप म्हणजेच जाणिवेंतील मनोव्यापार होत, हें सिद्ध होतें. अर्थात् अनेक मानसशास्त्रज्ञांचें लक्ष याकडे वेधलें व कित्येक तज्ज्ञ तर फ्राइडचें शिष्यत्व पत्करून याच्या अभ्यासाला लागले. ( Analytical Psychology ) 'पृथक्करणात्मक मानसशास्त्रा'चा प्रवर्तक युंग (Jung) आणि ( Individual psychology ) 'व्यक्तिनिष्ठ मानसशास्त्रा'चा प्रवर्तक ॲड्लर हे आपआपल्या स्वतंत्र सांप्रदायामुळें पुढें प्रसिद्धीस आलेले शास्त्रज्ञ या आरंभींच्या काळांत फ्राइडचें शिष्यत्व पत्करून या दिशेनें परिश्रम करूं लागले. या संशोधनांत आणखी एक गोष्ट अशी दिसून आली कीं, मनाच्या या प्रसुप्त ( unconscious ) भागांत त्या व्यक्तीच्या पूर्वायुष्यांतील वासनाच केवळ असतात, असें नसून त्या व्यक्तीच्या पूर्वीच्या अनेक पिढ्यांच्या अनुभवांचे संस्कारही असतात. या गोष्टी सिद्ध करण्याला फ्राइडनें जी पद्धति स्वीकारली, तिलाच ( Psychoanalysis ) 'मनोगाहनशास्त्र किंवा मनोविश्लेषणशास्त्र' असें नांव देण्यांत येतें. वरील तिघे आणि इतर अनेक शास्त्रज्ञ यांनीं या दिशेनें केलेल्या संशोधनावरून इतकें निर्विवाद सिद्ध झालें कीं ( १ ) मनाचा जाणिवेच्या कक्षेंत येणारा ( Conscious ) जसा एक भाग आहे, तसाच त्या कक्षेच्या बाहेरचा (unconscious) असाही दुसरा भाग आहे, ( २ ) प्रसुप्त ( unconscious ) भागांतील अनेक वासनांचा समुचित परिणाम म्हणजेच जाणिवयुक्त ( conscious ) मनोव्यापार होत आणि ( ३ ) त्या प्रसुप्तावस्थेंतील भागांत त्या व्यक्तीच्या पूर्वानुभूत वासनासंस्कारांप्रमाणेंच पूर्वीच्या पिढ्यांच्या अनुभवाचेही संस्कार असतात.

## फ्राइडच्या अनुमानांतील दोष

फ्राइडला जे रोगी संशोधनार्थ मिळाले, ते श्रीमंत व विलासी अशा ज्यू लोकांमधून. तो स्वतः ज्यू व प्रख्यात डॉक्टर असल्यानें असें घडणें स्वाभाविक होतें. या रोगांत विलासीपणामुळें उद्भवलेली, पण नैतिक व सांस्कृतिक कल्पनांमुळें दडपलेली कामवासना व त्यामुळें होणाऱ्या मनोविकृती असणें, हें स्वाभाविक होतें. फ्राइडच्या हें ध्यानांत येतांच त्यानें त्यावरून असा सार्वत्रिक सिद्धांत बांधला कीं, सर्वच माणसांच्या मनांत अगदीं स्तनंधयावस्थेपासूनच हा निषिद्ध कामगंड ( Oedipus complex ) असतो. त्याच्या अवलोकनांत आलेल्या रोग्यांच्या बाबतींपुरतें त्याचें म्हणणें बरोबर असलें, तरी तेवढ्यावरून सार्वत्रिक सिद्धांत बसविणें ही फ्राइडची चूक होती. पण एकदां हा आग्रह धरल्यावर स्वमतसिध्यर्थ लेख, ग्रंथ मिळून आठदहा हजार पृष्ठें भरतील, येवढें प्रचंड लेखन केलें आहे. पण त्या सर्वांत हाच मोठा दोष आहे कीं, कांहीं थोड्या उदाहरणांवरून फ्राइड एखादा सिद्धांत सार्वत्रिक म्हणून प्रतिपादितो आणि मग पुढें कितीही विरुद्ध पुरावा उपस्थित झाला, तरी तो हरतऱ्हेच्या लटपटी करून आपल्यास अनुकूलच आहे, असें प्रतिपादितो. या विधानाच्या पुष्ट्यर्थ एक दोन उतारे पुरे आहेत. आपली पत्नी द्वारा हिनें स्वतःच्या मुलांच्या संबंधांत तपशीलवार ठेवलेल्या दैनंदिनीचा ( diaries ) नीट अभ्यास करून 'psychology of early childhood' हा अभ्यसनीय ग्रंथ लिहिणारा वुइल्यम् स्टर्न आपल्या ग्रंथांत म्हणतो—

" Everything can be symbolically








interpreted in every conceivable way and a preconceived opinion or a foregone hypothesis may easily determine the methods of interpretation. We see abundant instances of this in the different schools of psycho-analysis and especially in Freud's."

भारदस्त व समतोल म्हणून प्रसिद्ध असलेला विद्वान् ग्रंथकार मॅक्डुगल फ्राइडच्या या दोषांची संभावना "misdirected ingenuity proposing impossible explanations under the mis-guidance of a false dogma" अशा शब्दांनीं करितो.

## भारतीय मानसशास्त्राची एक उपपत्ति

तेव्हां फ्राइड व इतर मानसशास्त्रज्ञ यांच्यांत विवादास्पद असलेले सर्व मुद्दे सोडून दिले आणि सर्वांची निर्विवादपणें एकवाक्यता असलेले मुद्दे काढले, तर वर दिलेले तीन सिद्धांतच सर्व संमत होण्याजोगे उरतात. आणि ते भारतीय शास्त्रज्ञांना पूर्ण मान्य आहेत. पण त्यांनीं या बाबतींत आणखी थोडी महत्त्वाची भर घातली आहे. मानवी मनाचें सूक्ष्म निरीक्षण करीत असतां त्यांस असें आढळून आलें कीं, मनांतील प्रसुप्तावस्थेंत असलेल्या संस्कारांत असेही कांहीं संस्कार दिसून येतात कीं, ज्यांचा संबंध त्या व्यक्तीच्या पूर्वायुष्यांतील संस्कारांशीं तर नसतोच, पण त्या व्यक्तीच्या पूर्वपिढ्यांतही ते संस्कार नव्हते, असें निश्चितपणें सांगतां येतें. शिवाय त्यांचें स्वरूप असें असतें कीं, त्यांना सहजप्रेरणां(instincts)-मध्येंही घालणें शक्य नसतें. अशा प्रकारचे संस्कार पाहून भारतीयांनीं पुनर्जन्माच्या अस्तित्वाची जोड देऊन त्या संस्कारांची उपपत्ति लावली. 'जीवलोके जीवभूतः सनातनः । मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति । शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः। गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात्'—वायु फुलांतून जसा गंध घेऊन जातो, त्याप्रमाणें जीवात्मा पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन हीं घेऊन देहांतर करीत असतो. गणितशास्त्रज्ञ रामानुजम् याचें उदाहरण या कामीं समर्पक आहे. मॅट्रिक झालेला हा विद्यार्थी इंग्लंडमधील गणितज्ञांना न सुटणारे बीजगणितांतील कूटप्रश्न सहज लीलेनें सोडवीत होता. याबद्दलचा संस्कार त्याच्या पूर्वायुष्यांत त्याला झालेले नव्हते. त्यांचा अनुभव त्याच्या पूर्वजांनाही नव्हता. गणितशास्त्र—त्यांतही बीजगणितशास्त्र—अशा स्वरूपाचें आहे कीं, त्यांतले पुढील सिद्धांत सोडविणें हें त्या विषयाचें आवश्यक असलेले पूर्वशिक्षण असल्याशिवाय शक्य नसतें. तेव्हां रामानुजमूला हें ज्ञान आलें कोठून ? अर्थात् त्याला या विषयाचा ज्याअर्थी पूर्वाभ्यास असलाच पाहिजे, त्याअर्थी तो पूर्वजन्मार्जित असला पाहिजे. या व अशाच आणखी उपपत्तींच्या साहाय्यानें भारतीय मानसशास्त्रज्ञांनीं पुनर्जन्म अनुमानप्रमाणानें सिद्ध केला आणि मनाच्या जाणिवेच्या पलीकडे प्रसुप्तावस्थेंत असलेल्या वासनांत त्या व्यक्तीच्या पूर्वजन्मार्जित वासनांचेही संस्कार असतात, हें सिद्ध केलें.

येणेंप्रमाणें पौर्वात्य व पाश्चिमात्य मानसशास्त्रांतील कांहीं बाबतींतील तुलनात्मक चर्चा केली; आतां मनाच्या भूमिका किती व कोणत्या आहेत व त्यांचा विचार दोन्ही मानसशास्त्रांत किती झाला आहे, या संबंधीं चर्चा करूं.

## मनाच्या पांच भूमिका

जागृतावस्थेंत मनाचे जे व्यापार घडत असतात त्या संबंधीचें जें विवेचन पाश्चिमात्यांच्या मानसशास्त्रांत झालें आहे, त्याचें यथार्थ दर्शन जेम्स्, स्टाऊट, किंवा मॅक्डुगल अशासारख्यांच्या ग्रंथांतून सविस्तरपणें दृष्टीस पडतें. त्याचप्रमाणें बालांचें मानसशास्त्र, तरुणांचें मानसशास्त्र, प्रौढांचें मानसशास्त्र, सामाजिक मानसशास्त्र इत्यादि भिन्न नांवाखालीं, निरनिराळीं वयें व अवस्था यांतलि, मनोधर्मांविषयीं अतिसूक्ष्म विवेचन अनेक ग्रंथकारांकडून झालें असून तें वाचनीय व अभ्यसनीय झालें आहे. वर सांगितल्याप्रमाणें पाश्चिमात्यांचीं मनें रजोगुणी, बहिर्मुख व भोगप्रवण असल्यामुळें त्यांच्या मनोभूमिकेंत अनेक गुंतागुंतींचीं बीजें असतात. तीं सर्व उकलून त्यांतील निरनिराळ्या भावांच्या व्याख्या निश्चित करून त्यांचें स्वरूप सांगणें इत्यादि गोष्टी पाश्चिमात्यांच्या मानसशास्त्रांत सविस्तर प्रतिपादिल्या आहेत. मानसशास्त्रांतील या प्रकारच्या मनोव्यापारांचें इतकें सूक्ष्म, सविस्तर व प्रयोगसिद्ध विवेचन भारतीय मानसशास्त्रांत






सांपडत नाहीं. श्रुति, स्मृति, पुराणें आणि सांख्य–योग–वेदांत हीं शास्त्रें इत्यादिकांत हें विवेचन विखुरलेलें आढळतें. तें सर्व एकत्रित करून त्यासंबंधीं पाश्चिमात्यांप्रमाणें ग्रंथरचना करण्यास भरपूर वाव आहे. पण इकडे अद्यापि आपल्या विद्वानांचें लक्ष नाहीं आणि अशा ग्रंथांना मागणी असण्याइतकी मनाची उच्च पातळी मराठी वाचकांना अद्यापि लाभली नाहीं. जाग्रतावस्थेंतील मनोव्यापारांचें विवेचन करणाऱ्या या भागाला इंग्रजींत 'नॉर्मल सायकॉलजी' 'सामान्य मानसशास्त्र' असें नांव आहे. पौर्वात्यांत या भागाला क्षिप्तावस्थाविषयक मानसशास्त्र असें नांव आहे. या अवस्थेला 'क्षिप्त' असें म्हणण्याचें कारण असें कीं, या अवस्थेंत मन इंद्रियद्वारां बाह्य वस्तूंकडे जणूं फेकलें जातें. तेथें तें बाह्य वस्तूला व्यापतें व मग 'हें अमुक आहे' अशी जाणीव होत असते. 'मातुर्मानाभिनिष्पत्तिर्निष्पन्नं मेयमेति तत्। मेयाभिसंगतं तच्च मेयाभत्वं प्रपद्यते' असा प्रकार येथें होत असतो. 'प्रमाता' म्हणजे जीवात्मा याच्यापासून 'मान' म्हणजे बाह्य वस्तूंचें मापन करणारें मन, याची अभिनिष्पत्ति म्हणजे उत्पत्ति होते. निष्पन्न झालेलें मन इंद्रियद्वारां 'मेयं' म्हणजे ज्ञेय पदार्थापर्यंत 'एति' म्हणजे जातें. तेथें तें त्या मेय वस्तूशीं 'अभिसंगत' होतें आणि मग तेथें 'मेयाभत्व' म्हणजे 'हा असुक पदार्थ आहे' अशी 'भा' म्हणजे प्रकाश अथवा जाणीव उत्पन्न होते. या प्रकारामुळें या मनोऽवस्थेला 'क्षिप्तावस्था' अशी संज्ञा पौर्वात्य मानसशास्त्रकारांनीं दिली आहे. मनाच्या या क्षिप्त किंवा सामान्य अवस्थेपेक्षां वेगळ्या अशा आणखी दोन अवस्था नित्याच्या व्यवहारांत आढळतात. त्या 'मूढावस्था' आणि 'विक्षिप्तावस्था' या नांवांनीं पौर्वात्य शास्त्रकारांनीं वर्णिल्या आहेत. मन मोहग्रस्त होऊन त्यांच्या ठिकाणीं निद्रा, तंद्रा, मूर्छा, मोहनिद्रा ( hypnotic trance ), भ्रम, वेड इत्यादि विकृती दृग्गोचर होतात म्हणून अशा विकृत मनोवस्थेला 'मूढावस्था' असें म्हटलें आहे. पाश्चिमात्यांनीं मानसशास्त्राच्या एतद्विषयक शाखेला 'Abnormal psychology' असें नांव दिलें आहे. पण 'sub-normal Psychology' हें नांव अधिक यथार्थ झालें असतें. असो. विक्षिप्तावस्थेंत मनाच्या कांहीं विशेष शक्ती उत्तेजित झालेल्या आढळतात. दूरचें दिसणें, डोळे बांधून गर्दीतून सायकल अथवा मोटार भरधांव हाकणें, बसल्या ठिकाणाहून अति दूरचें ऐकूं येणें इत्यादि चमत्कार कित्येकदां दृष्टीस पडतात. डोळे बांधून लंडनच्या गर्दीच्या रस्त्यांतून सायकल भरधांव नेल्याचें सचित्र वर्णन ७।८ वर्षांपूर्वी एका इंग्रजी मासिकांत आलें होतें. शिवाजी महाराज निद्रावश असतां चाळीस मैलांवरील त्यांच्या ताब्यांतील बंदर शत्रूंनीं फितुरीनें तेथील दारुगोळा पेटवून उडवून दिल्याचा धडाका त्यांस रायगडावर ऐकूं आला, अशी इतिहासांत नोंद आहे. अशाप्रकारच्या मनाच्या उत्तेजित अवस्थेची मीमांसा 'विक्षिप्तावस्था'–विषयक मानसशास्त्रांत पौर्वात्यांनीं केली आहे. पाश्चिमात्यांनीं याची अगदीं थोडी केवळ उल्लेखमात्र–मीमांसा केली आहे. पण तिचा समावेश त्यांनीं वरील (abnormal psychology) मध्येंच केला आहे. या तीन अवस्थांच्या पलीकडे मनाच्या एकाग्र आणि निरुद्ध अशा आणखी दोन अवस्था आहेत. यांतील एकाग्रावस्थेचें लक्षण 'शांतोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रता परिणामः' असें शास्त्रकारांनीं बांधलें आहे. चित्त हें सदोदित वृत्तिरूपानें परिणाम पावणारें आहे. शांत झालेली वृत्ति आणि पुढल्या क्षणीं उदित होणारी वृत्ति या दोहोंत जर तुल्यप्रत्यय म्हणजे एकच अनुभव असेल तर ती एकाग्रता होय. पाण्यांत जर सतत लाटा उत्पन्न होत राहतील, तर त्या पाण्यांत कशाचेंच स्थिर प्रतिबिंब दिसणार नाहीं. पण तें जर स्थिर राहील तर त्यांत वस्तूंचें प्रतिबिंब दिसूं शकतें. असाच कांहीं प्रकार एकाग्रावस्थेंत होत असतो. चित्तांत क्षणाक्षणाला भिन्न प्रत्यय येणें हीच त्याची चंचलता होय. एकच प्रत्यय अनेक क्षणांपर्यंत टिकेल, तर तितक्या क्षणांपुरती मनाची एकाग्रता झाली. अशा एकाग्रतेला प्रशांतवाहिता प्राप्त झाली–म्हणजे पाण्याच्या संथ प्रवाहाप्रमाणें एकच प्रत्यय अखंडपणें दीर्घ काळ टिकवितां येऊं लागला–म्हणजे तेथें एक प्रकारच्या अननुभूत आनंदाचा अनुभव येऊं लागतो. त्याचप्रमाणें एकाग्रतेनें मनाचें सामर्थ्य वाढतें. तें ज्या मानानें वाढेल, त्या मानानें त्या मनाच्या ठिकाणीं लहान मोठ्या सिद्धींचें सामर्थ्य प्रकट होऊं लागतें. या एकाग्रतेचा अभ्यास कोणत्या साधनांनीं सुकर








होतो व अभ्यासबलानें कोणकोणत्या सिद्धी कसकशा प्रकट होऊं शकतात, याचा शास्त्रशुद्ध विचार भारतीय ऋषि-मुनींनीं 'एकाग्रभूमिका'–विषयक मानसशास्त्रांत केला आहे. पौर्वात्यांच्या परिभाषेंत याला Higher Psychology असें नांव देतां येईल. परंतु पाश्चिमात्यांनीं या भूमिकेसंबंधीं पद्धतशीर लेखन केलेलें आढळत नाहीं; आणि हें लेखन आणखी कित्येक वर्षें त्यांच्या हातून होईल असा संभव दिसत नाहीं. याचें कारण असें कीं, बौद्धिक पातळी-वरूनच मानसशास्त्राचा विचार करावयाचा, अशा अवस्थेंत पाश्चिमात्य राष्ट्रें अजून आहेत. स्वतःचें अंतःकरण शुद्ध करून तशा विशुद्ध अंतःकरणानें मनोधर्मांचा अभ्यास करणें अवश्य आहे, हा विचार त्यांच्या बुद्धीच्या टप्प्यांत अजून आलेला नाहीं. यामुळें बौद्धिक सामर्थ्याच्या जोरावर त्यांनीं Normal किंवा Abnormal Psychology वर जसें चिकित्सक, प्रयोगसिद्ध व विस्तृत लेखन केलें आहे, तसें या Higher Psychology संबंधींचें लेखन ते अद्यापि करूं शकले नाहींत. असलें लेखन करूं शकतील अशा थोरो, रोमारोलांसारख्या व्यक्ती म्हणजे भांगेंत तुळस या म्हणीप्रमाणें अपवादात्मक होत. बाकीचे सर्व शास्त्रज्ञ बौद्धिक बळावर मानस-शास्त्राचा जेवढा प्रदेश आक्रमितां येईल तेवढा प्रशंसनीयपणें आक्रमीत आहेत. एकाग्र भूमिकेच्या पुढची निरुध्द भूमि. चित्तांतलि बाहिर्मुखता निर्बळ झाली आणि तें अंतर्मुख झालें म्हणजे चित्तांत वृत्ती उठेनाशा होतात. अशा रीतीनें चित्तवृत्ति शून्य होऊन आत्माकार होणें याला निरुध्द भूमि म्हणतात. या निरुध्द भूमीवर चित्तांत आत्म-साक्षात्कार टळटळीतपणें उमटतो. येथें 'असंप्रज्ञात समाधि' पूर्णावस्थेला जातो. ही अवस्था म्हणजेच कैवल्यानुभव होय. या समाधींतून योगी देहभानावर येऊन प्राप्त जगद्व्यवहार करूं लागला, तर ती त्याची जीवन्मुक्तावस्था होय. अशा अवस्थेंतील मनाची चिकित्सा करणाऱ्या मानसशास्त्राला Meta-Psychology म्हणतां येईल. पाश्चिमात्यांच्या मानसशास्त्रांतील या Meta-Psychology चें बरेंचसें वर्णन–चिकित्सा नव्हे–Mysticism वरील ग्रंथांत आढळतें. पण त्याला शास्त्रीय उपपत्तीची जोड त्यांना अद्यापि देतां आलेली नाहीं. आपल्याकडे एकाग्र व निरुध्द या भूमिकांचें शास्त्रशुध्द व स्वानु-भवयुक्त विवेचन पातंजल योगशास्त्रांत प्रामुख्यानें केलेलें आढळतें. अशा तऱ्हेनें भारतीय मानसशास्त्रांत (१) क्षिप्त (२) मूढ (३) विक्षिप्त (४) एकाग्र आणि (५) निरुध्द या पांच भूमिकांचा विचार झालेला आहे. या भूमिकांच्या विचाराला पाश्चिमात्य मानसशास्त्रांत (१) नॉर्मल सायकॉलजी (२) सब्-नॉर्मल सायकॉलजी (३) ॲब्-नॉर्मल सायकॉलजी (४) हायर सायकॉलजी आणि (५) मेटॅ-सायकॉलजी अशीं नांवें देतां येतील. तुलनेनें पाहतां यांतील पहिल्या प्रकाराविषयींचें पाश्चिमात्यांचें लेखन पौर्वात्यांच्या लेखनापेक्षां पुष्कळच अधिक, विवेचक, विस्तृत व समर्पक आहे. दोन व तीन प्रकारांचें पाश्चिमा-त्यांचें विवेचन अधिक चिकित्सापूर्वक केलेलें व विस्तृत आहे, तर पौर्वात्यांचें अधिक मूलग्राही व सोपपत्तिक आहे. आणि चार व पांच या प्रकारांचें विवेचन पाश्चिमात्यांनीं अत्यल्प व चांचपडत केलेलें आहे, तर पौर्वात्यांचें विवेचन समर्पक, सोपपत्तिक व अनुभवाधिष्ठित आहे.

अशा प्रकारें दोन्ही मानसशास्त्रांचा तुलनात्मक विचार सामान्यपणें झाला. आतां कांहीं विशेष बाबींचें तुलनात्मक विवेचन करावयाचें आहे. पण त्यासाठीं भारतीयांच्या मानसशास्त्राची प्रक्रिया किंवा मांडणी कशा प्रकारची आहे, तें वाचकांस अगोदर निवेदन करणें आवश्यक आहे. कारण ही प्रक्रिया मराठी वाचकांस बव्हंशीं अपरिचितच आहे. तेव्हां ही प्रक्रिया प्रथम सांगून मग त्या महत्त्वाच्या बाबींचें विवेचन पुढील लेखांत करूं.

# सागरश्री

**श्री. ब्रिजलाल बियाणी**

भावनांचें अस्तित्व प्रकाशाच्या पलीकडे आहे व भावनांची प्रबलता आणि मनोरमता बुद्धीच्या आवांक्याबाहेर आहे. संभवतः याचमुळें अंधारांत, रात्रींच्या वेळीं, प्रकाशाच्या अभावांत प्रेममयी भावनेला आपलें विशाल रूप धारण करण्याचा अवसर मिळतो.

मींहि तोच अनुभव घेतला. रात्रीं निजण्याच्या वेळीं मनांत ईर्षा उठली, प्रातःकाळीं सूर्य सागरश्रीचें दर्शन घेईल, तिला मोहित करील; त्याच्या आधींच मी तिचें दर्शन घ्यावें अशी भावना मनांत जाग्रत झाली.

मानवी मनांत चंचलता निर्माण होते व अनेक मनोविकारांचें रूप ती धारण करते. सूर्याआधीं सागरश्रीचें दर्शन घेण्याची आकांक्षा उत्पन्न झाली व ती सूर्याशींहि स्पर्धा करूं लागली. मनोविकारांची केवढी ही गति !

मी हांसलों. विचारमग्न झालों. झोपेनें मला नकिव केलें. मी रात्रभर निजून राहिलों पण माझ्या स्पर्धेचा पूर्वसंकेत सूर्याला मिळाल्यामुळें कीं काय, सूर्य मात्र सारी रात्र चालतच राहिला.

प्रातःकाळीं जरा लौकर उठलों. भराभर आपल्या रंगभूमीकडे झपाट्यानें चालूं लागलों. सूर्याला क्षितिजावर येण्यास थोड्या मिनिटांचाच अवधि राहिला होता. मी सागरश्रीच्या जवळ पोहोंचलों.

सूर्याच्या अगोदर मी सागरश्रीचें मुखकमल पाहिलें. तिच्या अगदीं निकट जाऊन शीतल स्पर्शाचें सौख्यहि लुटलें.

सागरश्री शांत होती; ती लुब्ध झाली, असें मला वाटलें; तिची शांतता मी आकर्षणाचें द्योतक म्हणून मानलें. सूर्य हारला मी जिंकलों, असें मला वाटलें. आपल्या विजयावर मी हर्षित झालों; मनांतल्या मनांत आनंदलों. स्पर्धा काल्पनिक, विजय काल्पनिक, पण स्मित मात्र सत्य ! जीवनाच्या मनोरमतेचें मर्म मला कळलें !

कित्येक वेळां, सतत सान्निध्य सहनीय व सुखद नसतें. दीर्घ बिरह सहवासाची उत्कट उत्सुकता उत्पन्न करतो.

सागरश्रीच्या जवळून मी दूर गेलों. सागराचा विस्तीर्ण, वालुकामय, सुवर्णरंजित किनारा तो ! जणूं काय मोठ्यांच्या सान्निध्यांत मोठेपण प्राप्त होतें. जरा दूर जाऊन, सागरश्रीकडे तोंड करून, मघाच्या आपल्या भराभर चालण्याचा थकवा घालविण्यासाठीं मऊ वालुकामय बिछान्यावर मी बसलों. घरीं गादीवर वाळूचा कण देखील सहन होत नाहीं; पण आतां, सागरश्रीच्या सहवासांत वाळूचा बिछानाहि प्रिय वाटतो.

मी बसलों; सागरश्री वारा घालूं लागली; शीतलवायुलहरींमुळें आराम वाटूं लागला. मन प्रसन्न होऊं लागलें, शरीराला विसांवा मिळाला. डावा हात जमिनीवर टेकला व शरीराचा भार हलका केला. हात टेकवतांच डोकें हाललें, मान डावीकडे झुकली ! सृष्टींत किती समतोलता आहे ! ती जाणणाराच कोणीतरी हवा ! वांकड्या भुंवया करून सागरश्रीचें सौंदर्य निरीक्षण करण्यांतच मी दंग झालों.

आत्मविश्वास असल्यामुळें सूर्य आपल्या रोजच्या नियमित गतीनेंच चालत होता. चालतां चालतां तो क्षितिजावर–स्वयंवर मंडपांत येऊन पोहोंचला; सागरश्रीला आपल्या किरणनयनांनीं अवलोकिलें व किरणहस्तांनीं स्पर्श केला. सुप्त सागरश्री एकदम जागृत झाली. सूर्याच्या केवळ पहिल्या दर्शनानेंच ती त्याच्यावर मोहित झाली. सागरश्रीच्या तरंगा-तरंगांत, रोमरोमांत सूर्यकिरण नाचूं लागले. सागरश्रीच्या मुखाचा वर्ण बदलूं लागला. सूर्य आणि श्री दोहोंचा आरक्त वर्ण झाला. सागरश्रीचें सौंदर्य शतपटींनें खुलून उठलें. सागरश्रीनें सूर्याला जयमाला घातली व स्वतःला इतकें तन्मय केलें कीं, सूर्य पाण्यांत सामावला गेला व पाण्यानें सूर्याचा रंग धारण केला. सूर्य आकाशांत आहे कीं पाण्यांत आहे, हें सांगणें कठीण झालें. खऱ्या प्रेमसंमीलनाचें अलौकिक उदाहरण मी पाहिलें. मी माझी आशिर्वाद अंजलिहि अर्पण केली.

दुसऱ्यांच्या सुखांत आत्मविस्मरण ! दुसऱ्याच्या सुखानें सुखी होण्यांतच तर खरी मानवता आहे !

पण एवढ्यांत माझी तंद्री भंग पावली; रंग बेरंग झाला; माझें व्यक्तित्व जागृत झालें. रात्रीच्या स्पर्धेचें स्मरण झालें. प्रातःकालच्या झपझप चालण्याची आठवण झाली. सागरश्रीचें मी प्रथम घेतलेलें दर्शन तिचा स्पर्श–सर्व कांहीं मनःचक्षूंसमोर उभें टाकलें. इतका प्रयत्न केल्यानंतरहि, हृदयांतरीचें प्रेम इतकें दाखवल्यानंतरहि सागरश्रीनें माझ्या प्रथम आगमनाचा, माझ्या स्पर्शाचा आदर केला नाहीं; इतकेंच नव्हें, तर माझ्या आगमनाची तिनें पर्वाहि केली नाहीं. केवढी उपेक्षा ! सूर्याच्या आगमनामुळें ना ही चंचलता, हें सौंदर्यप्रदर्शन, हें स्वयंवरमाला–अर्पण आणि हें आत्मसमर्पण ?

माझ्या स्वाभिमानाला धक्का लागणें स्वाभाविक होतें. धांवण्यांत मी जिंकलें, पण सागरश्रीच्या प्रेम-प्राप्तींत सूर्याला संपूर्ण सफलता मिळाली. प्रातःकालचा माझा विजयोन्माद या महान् अपमानाच्या व्यथेमुळें विरून गेला.

उत्तेजित किंवा व्यथित भावनेला विवेकच शांत करून काबूंत ठेवतो. विचारानें भावनेला म्हटलें "तूं सागरश्रीवर प्रेम केलेंस याचा अर्थ असा नव्हे कीं, तिनेंहि तुझ्यावर प्रेम केलें पाहिजे. ज्याच्यावर तिचें प्रेम होतें, त्याला तिनें तें दिलें. प्रेमांत देणें प्रधान, घेणें गौण आहे. आणि समसमानांमध्येंच प्रेम जडणें अधिक संभवनीय आहे. सागर व सूर्य यांमध्यें समानता आहे. सागर व सूर्य दोन्ही महान् आहेत, तूं लहान आहेस." भावना जीवित ठेवण्यासाठीं विचारानें ध्वनित केलें "सागरश्रीला पारख नाहीं. ती सुंदर माणि–मोतीं आपल्या तळाच्या चिखलांत दडवून ठेवते व डोंगराचे मोठाले खडक आपल्या वक्षःस्थलावर धारण करिते."

सागरश्रीनें माझा त्याग केला पण मी तिचा त्याग करूं शकलों नाहीं. तिच्या सौंदर्यावर मी नेहमींच मोहित झालेलों आहे. आणि आज तर तिच्या स्वयंवर–पोशाखांत तिचें लावण्य इतकें चमकत आहे कीं, नीरस पत्थराच्या हृदयालाहि ती मोहित करील. मी आपला बसूनच राहिलों, निश्चलतेनें पाहतच राहिलों.

केवढी विशालता ! केवढा विस्तार ! क्षितिज हीच मर्यादा व हीच सीमा ! सागर आणि सीमा दोहोंचा रंग समान आहे. सागर सीमेमध्यें लीन झालेला दिसतो व सीमा सागरांतूनच वर उठलेली किंवा सागरांतच डुबलेली दिसते. सागराची संमिलनशक्ति अमर्याद आहे. तो सूर्यांत मिळून गेला; सूर्याला आपल्यांत विलीन करून टाकलें. तो सीमेमध्यें समाविष्ट झाला, सीमेला आपल्यांत मिळवून घेतलें. विलीन होण्याची किंवा विलीन करून घेण्याची ज्याच्यामध्यें इतकी महान् शक्ति आहे, त्याला भय कसलें ? सागराचें सौंदर्य निर्भयतेचें स्थान आहे.

या निर्भयतेमध्यें जडत्व नाहीं, चंचलता पराकाष्ठेची आहे. जललहरींची रीघच रीघ लागलेली आहे. एक लहर उठते, दुसरींत विलीन होते; दुसरी तिसरींत ! अशा तऱ्हेनें अनंत जन्ममृत्यूंचें दर्शन होतें. जन्माच्या मागोमाग मृत्यु आणि मृत्यूच्या मागोमाग जन्म आहे. जन्म आणि मृत्यु यांमध्यें जणूं काय शर्यत लागली आहे. सतत निर्माण आणि सतत नाश यांचें क्रीडांगण बनलेला हा सागर, विश्वाच्या विराट् स्वरुपाची साक्षात् स्वल्पावृत्ति आहे. हवा लहरी उत्पन्न करते व त्यांचा नाशहि करते. हवाच माझें जीवन आहे आणि तिची झुळुकच माझा जीवन–अंत आहे. जड–चेतनाच्या जन्म–मृत्यूंत








केवढी समानता ! मग चेतनाचाच अभिमान कां बरें ?

लहरींचें हिंदोळणें, तरंगाचें वर उचंबळणें व विलीन होणें, चंचलतेचें हें स्थायी नृत्य, परिवर्तनाचा हा परम प्रयत्न, नावीन्याचा हा सतत उन्माद— या सर्वांना सोडूं म्हटलें, तरी मी सोडूं शकत नाहीं. माझ्या नेत्रांना जणूं काय त्यांनीं जखडून टाकलें आहे. लहरींचा नाद कानांत गुणगुणतो आहे. जलाची शीतलता वायूबरोबर साऱ्या शरीराला स्पर्शसुख देत आहे. लवणमिश्रित प्राणवायु श्वासोच्छ्वासामुळें हृदयाला बलवान् करतो आहे. समुद्र माझ्यांत तन्मय झाला नसेल पण मी समुद्रमय झालों आहे.

जललहरींत केवढें सौंदर्य, केवढें आकर्षण, पण केवढी क्षणिकता ! सौंदर्य व क्षणिकता यांचा जणूं काय सहप्रवाह त्यामध्यें वहात आहे. ही क्षणिकता पाहूनच कीं काय, विद्वानांनीं संसाराला असार, असत्य, नाशवान् व माया असें म्हटलें आहे. पण इतक्या सुंदर लहरींना मी असार, असत्य म्हणून कां मानूं ? त्या क्षणिक आहेत पण असार, असत्य कां म्हणून ? त्या अस्थायी असूं शकतील पण असार नाहींत. त्यांच्यामध्यें तेंच सत्य आहे, जें स्थायी समुद्रांत आहे आणि लहरींचें सत्य अल्पकालीन ! जीवन अल्प म्हणून असारता आणि असत्यता कां बरें ? उलट अल्पतेमध्येंच असीमता आहे. जीवन—मृत्यूचें जेथें हस्तांदोलन आहे, तेथें खरें सौंदर्य आहे.

जीवनाच्या दीर्घतेमध्यें जर सत्य आणि सार आहे तर क्षणभर चमकणारी वीज असत्य व मेघ सत्य आहेत कां ? दरवर्षी गळणारीं पानें असत्य व झाडांचा दीर्घकाल टिकणारा बुंधा सत्य आहे कां ? एक दिवस टिकणाऱ्या गुलाब पुष्पाचें लावण्य असत्य आणि कित्येक दिवस टिकणाऱ्या गुलाबांच्या कांट्याची तीक्ष्णता सारमय आहे कां ? बाल्यावस्थेंतच कांहीं काळचें बोबडें बोलणें असार व अनेक वर्षे बोलली जाणारी स्पष्ट वाणी सारमय आहे ? क्षणभर टिकणारें उषेचें सौंदर्य असार व नीलाकाशाचें स्थायी रूप सारमय आहे ? सत्य—असत्य, सार—असार हें जीवनाच्या दीर्घतेवर अवलंबून नसून तें जीवनाच्या अस्तित्वावर व सौंदर्यावर निर्भर आहे.

सागर जर सत्य आहे, त्यामध्यें जर सार आहे, तर मग माझ्या क्षणविनाशिनी लहरीहि सत्य आहेत, त्यामध्येंहि सार आहे, विश्वांत चहूंवार सत्य भरलें आहे, सार भरलें आहे.

सागरश्रीनें स्वयंवरांत माझी उपेक्षा केली असली, तरी जीवनाचें सार व जीवनाचें सौंदर्य यांची अनुपम भेट मला तिनें अर्पण केली आहे. माझ्या निःसीम प्रेमाचें हेंच फळ आहे. माझे मनोभाव बदलले, माझा दृष्टिकोन बदलला, मी पुनः हांसलों.

सूर्याचें रूप बदलूं लागलें. स्वयंवराच्या वेळचा सुंदर पोशाख सागरश्रीनें उतरविला होता. चेहऱ्यावरील कांतींतहि फरक पडूं लागला. मधुरता आणि सौम्यता नष्ट होऊं लागली. सौंदर्य कमी होऊं लागलें. प्रखरता वाढूं लागली. माझ्या मनांत आलें कीं सूर्य कितीहि मोठा असला तरी काय झालें, तोहि पुरुषच आहे ना ? पुरुषस्वभावाला तो अपवाद कसा असणार ? विवाहाच्या अथवा प्रेमाच्या प्रारंभकालांत शांत, सुंदर, मनमिळाऊ आणि प्रियेला आराम देणारा पुरुष, विवाह होतांच, प्रायः कठोर होऊं लागतो. पुरुषार्थाचा अर्थ काय कठोरताच आहे कां ?

सूर्याचा ताप वाढतच गेला. पतिभक्तिपरायण सागरश्री पतिस्वभावानुसार स्वतः बदलूं लागली. सूर्याचें जें स्वरूप असावयाचें तेंच ती धारण करूं लागली. जिकडे पतीची नजर तिकडे तिची दृष्टि ! तिच्या शीतलतेमध्येंहि फरक पडूं लागला. शुष्कता वाढूं लागली. आत्मसमर्पणाचें ती संपूर्ण स्वरूप होती ! आत्मविस्मृतीचें साक्षात् दर्शन होतें तें !

सागरश्रीची ही अवस्था पाहून तिची सखी वायुलहरसुद्धां सहानुभूतीमुळें अंतर्दाहानें संतप्त होऊं लागली. सहानुभूतीचा परिणाम माझ्यावरहि घडूं लागला.

मी उठलों, जाण्याची तयारी केली. परंतु दृष्टि हटली नाहीं. सागरश्रीच्या अवस्थेची मला दया येऊं लागली. मला सोडून सूर्याची निवड केली, त्याचाच हा परिणाम होय ! यामुळें उपेक्षेचा एखादा तरंग माझ्या मनांत उमटूनहि गेला. आतां पुन्हां येथें येण्याचें कारण नाहीं, आतां आकर्षणहि कांहीं नाहीं, असा विचारहि मनांत उमटून गेला. परन्तु—







दर्शनाचें पाप मी कां करूं ? ही भावनाहि जागृत झाली. पण विचारांनीं कोलांटीउडी घेतली. सागरश्रीनें मला जीवनसार, भेट म्हणून, अर्पण केलें आहे, मग मी त्याला विसरून कसा जाऊं ? प्रेमाचा काय केवळ एकच प्रकार आहे ? एकच रूप आहे ? तें अनेकविध आहे.

मी उद्यां येईन, सागरश्रीच्या सौंदर्याला माझ्या निष्पाप नेत्रांनीं भावाच्या दृष्टीनें निश्चिततेनें पाहीन व तिच्याकडून जीवनाचें सार घेऊन स्वतःला धन्य मानीन.

जाण्याचा निश्चय केला. मनांतल्या मनांतच सागरश्रीला प्रेमपूर्ण संदेश दिला—" सागरश्री ! ताई ! सूर्य हवा तर बदलो, मी बदलणार नाहीं. माझें प्रेम सतत तुझ्या सौंदर्यावर आहे, क्षणिक लहरींवर आहे, तुझ्या चंचलतेवर आहे व तुझ्या परिवर्तनशीलतेवर आहे. तुला कुठें आश्रय न मिळाला, तर या तुझ्या भावाच्या अल्पशा हृदयांत तुझ्यासाठीं मोठा आसरा आहे. माझ्या छोट्या शरीराला पाहून तूं माझी उपेक्षा केलीस, माझ्या हृदयसागराला पाहिलें नाहींस. सागरश्री ! माझा हृदयसागर पवित्र भावनांनीं तुझ्यांत विलीन झाला आहे. "

लहरींनीं आवाज दिला " त्याला कोण पाहतो ? व पाहणारहि कसें ? "

---

## ★ ★ ★ काश्मीरमधील एक हुतात्मा

मीर मकबूल शेरवानी हे राष्ट्रीय सभेचे ( National Conference ) चे बारामुला येथील एक शूर तरुण नेते होते. नुकतीच त्यांची तिशी उलटलेली होती. काश्मीरवर स्वारी करणाऱ्या टोळीवाल्यांना, हा राष्ट्रीयसभेचा एक महत्त्वाचा पुढारी आहे, असें कळल्याबरोबर त्यांनीं निशात बोलपटगृहाजवळच्या जागीं त्याला दोन खांबांना बांधलें व प्रथम खूप चोपलें. " काश्मीर राष्ट्रसभा व शेर-ए-काश्मीर शेख अबदुल्ला यांचें पुढारीपण मी आजपासून सोडून दिलें असून यापुढें आझाद सरकारशीं मी इमानी राहीन अशी शपथ घे " असें त्यांनीं शेरवानीला फर्माविलें. " राष्ट्रीयसभा मी कधींही सोडणार नाहीं " शेरवानीनें खडखडीत जवाब दिला—" आमचे शेर-ए-काश्मीर यांच्या हातांत आतां सूत्रें आली आहेत. नुकतेंच हिंदी लष्करही येऊन पोहोंचलें आहे. तुम्हांलाच आम्हीं आतां पिटाळून लावतों." या उत्तरानें टोळीवाले चिडले आणि त्याच्यावर त्यांनीं चौदा गोळ्या झाडल्या. त्याचें नाक कापून, तोंड विद्रूप करून त्याच्या अंगावर अशी जाहीर सूचना डकविली कीं, " हा काफर बेइमान शेरवानी नांवाचा आदमी—याची जशी दशा झाली आहे, तशी सगळ्या काफरांची—बेइमान्यांची होईल." उलट्या काळजाचें हें कृत्य—हा अमानुष अत्याचार होऊन अठ्ठेचाळीस तास होत नाहींत तोंच शेरवानीचें भविष्य खरें झालें, हिंदी सैन्य येऊन थडकलें, व टोळीवाले जीव घेऊन बारामुलाहून पळत सुटले।

' हरिजन ' ३०।११।४७

अनुक्रमणिका






# गांधीजींची जीवनसाधना

श्री. शंकरराव देव

महात्मा गांधींनीं हिंदी जनमनावर जेवढें अधिराज्य मिळविलें, तेवढें अर्वाचीन काळांत अन्य हिंदी लोकनायकानें क्वचितच मिळविलें असेल. म. गांधींना ही जी असाधारण लोकप्रियता लाभली, त्याचें कारण हिंदी स्वातंत्र्यसंपादनकार्यांत त्यांनीं बजावलेली अभूतपूर्व कामगिरी, कीं त्यांची अढळ सत्यनिष्ठा व अहिंसेची प्रखर उपासना, यांबद्दल मतभेद होऊं शकेल. पण त्यांना जें ' महात्मा ' पद प्राप्त झालें, तें त्यांच्या सत्य—अहिंसेच्या उपासनेमुळेंच, याबद्दल दुमत होणें शक्य नाहीं.

## गांधीजींचें आंतरराष्ट्रीय नेतृत्व

महात्मा गांधींचें नेतृत्व केवळ राष्ट्रीय नसून तें आंतरराष्ट्रीय आहे. याचें मुख्य कारण मुद्दां ते आधुनिक भारताचे जनक व हिंदी स्वातंत्र्यसंग्रामाचे यशस्वी सेनापति, हेंच केवळ नसून ते सत्याचे शोधक व अहिंसेचे उपासक आहेत, हेंहि आहे. या देशांतल्याप्रमाणें अन्य अनेक देशांतहि शेंकडों हजारों स्त्रीपुरुष आज असे आहेत कीं, ज्यांना आपला जीवनपथ उजळविण्यासाठीं म. गांधींच्या जीवनज्योतीचा उपयोग होतो. ' मला पुढें प्रकाश दिसत नाहीं, मी अंधारांत चांचपडत आहे ' असें गांधीजी म्हणूं लागले कीं, जगांतील हजारों, लाखों जीव ज्ञानप्रकाशाच्या अभावीं जीवनमार्गावर ठेंचा खाऊं लागतात. याचें कारण, हे जीव म. गांधींना वाट पुसत किंवा त्यांच्या पावलांवर पावलें टाकीत आपली जीवनयात्रा सफल वा कृतार्थ करूं इच्छितात, एवढेंच नव्हे तर ज्यांत संपूर्ण समता व शाश्वत शांति नांदेल असा एक नवीन अहिंसात्मक समाज निर्माण करण्यासाठीं ते आपलें जीवन समर्पण करूं इच्छितात. म. गांधींच्या जीवनांत अशी कोणती विलक्षण वस्तु आहे कीं, जिच्यामुळें त्यांना हें गुरुपद प्राप्त व्हावें ?

## साधनेंत-सामान्य लोकही सहभागी

गांधीजींनीं आपल्या आत्मकथेला ' सत्याचे प्रयोग ' असें नांव दिलें आहे. कारण सत्याचा शोध हा आपल्या जीवनाचा एकमेव हेतु ते मानतात. ते सत्यालाच ईश्वर समजतात. म्हणून त्यांच्या दृष्टीनें ईश्वरप्राप्ति व सत्याचा शोध या दोन वेगवेगळ्या वस्तू नसून ती एकच आहे. पण ईश्वरप्राप्ति हें जीवनाचें साध्य मानणारे व त्यासाठीं अवश्य ती साधना करणारे म. गांधी हे जगांतील पहिलेच पुरुष नाहींत. सर्वकाळीं सर्वदेशीं असे असंख्य स्त्रीपुरुष आजपर्यंत झाले आहेत. पण म. गांधींचा विशेष हा कीं, आपल्या या साधनेंत त्यांनीं ज्या प्रमाणांत व ज्या पद्धतीनें सर्वसामान्य लोकांना सहभागी करून घेतलें आहे, तें प्रमाण व ती पद्धति अलौकिक असून तसें करणारे ते जगांतील पहिलेच पुरुष आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. सत्याच्या शोधासाठीं अगर ईश्वराच्या प्राप्तिसाठीं सामान्य जीवनव्यवहारांतून निवृत्त होऊन एखादी विशिष्ट साधना करीत बसण्याची जरूर नाहीं. जीवनाचा नित्यक्रमच सत्यानें शुद्ध व प्रेमभावनेनें पवित्र केला म्हणजे तो सत्याची अथवा ईश्वरप्राप्तीची साधना बनतो, असें त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें जगाला शिकविलें आहे. जगाच्या नित्यव्यवहारांतून, जो








असत्य व द्वेष यांशिवाय चालूंच शकत नाहीं असा सर्वसामान्य समज आहे, तो राजकीय व्यवहारहि गांधीजींनीं वगळलेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असें असल्यामुळें त्यांनीं हिंदी स्वातंत्र्यसंग्रामाला आपल्या चित्तशुध्दीची व तद्द्वारां सत्याच्या म्हणजेच ईश्वराच्या प्राप्तीची एक प्रभावी साधना बनविली व त्यामुळें हजारों हिंदी स्त्री-पुरुषांनाहि आपलें जविन शुध्द व उन्नत करण्याला मदत केली.

## हिंदु जीवनदर्शनाचा मुख्य सिद्धान्त

आपल्या नित्याच्या व्यवहारांत प्रत्येक स्त्री-पुरुषाला सत्याचें व अहिंसेचें पालन करण्यांत ज्या मानानें यश येईल, त्या मानानें त्यांच्या अंतकरणांतून भय व क्रोध नष्ट होतील व तो 'वीतराग' बनत जाईल. कारण भय आणि क्रोध यांचें मूळ राग अथवा आसक्ति यांतच असतें. आणि जो मनुष्य 'वीतरागभयक्रोध' झाला त्याला ईश्वरप्राप्ति होते, नव्हे तो ईश्वरस्वरूप होतो, असा हिंदु जीवनदर्शनाचा मुख्य सिध्दांत आहे.

"वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥"

असें गीतेचें वचन आहे. 'नराचा नारायण होतो' या हिंदु धर्माच्या आद्य सिध्दांताचा साक्षात्कार करून घेण्याची शक्यता वर्तमानकालांत म. गांधींनीं आपल्या जीवनानें सामान्य माणसाला सुध्दां पटवून देऊन मानवजातीची बिनमोल सेवा केली आहे व या सद्धर्माच्या द्वारां साऱ्या जगाचा गुरु होण्याची हिंदुस्थानची पात्रता हिंदवासियांना व परकियांना पुनः एकदां पटवून दिली आहे.

## समाजरूप बनणें हें व्यक्तीचें साध्य

नित्यव्यवहारांत मनुष्य दोन भूमिकांनीं वावरत असतो; एक, त्याची स्वतःची वैयक्तिक आणि दुसरी सामाजिक. या दोन भूमिका वास्तविक एकमेकांपासून अलग अशा कधींच नांदूं शकत नाहींत. कारण मनुष्यप्राणी, नव्हे सर्व सृष्टिजातच, मुळांत एकमेकाला सोडून नाहीं. त्यामुळें विचार, भावना यांसकट माणसाच्या होणाऱ्या सर्व हालचाली सामाजिक स्वरूपाच्या असतात. यामुळें अंतरांत स्वतःचें व्यक्तित्व माणसाला भासत असून सुध्दां तो सर्वांशीं—समाजाशीं एकरूप झालेला आहे. मानवी जीवनांतलि हें महान् सत्य आहे आणि त्या सत्याचा साक्षात्कार 'आत्मवत्सर्वभूतानि' पहाण्यानेंच होत असतो. प्राणिमात्रांशीं 'मद्भावा'नें वागण्यालाच प्रेम अथवा अहिंसा हें नांव देतां येईल. कोणत्याहि घटनेनें अथवा क्रियेनें ज्या सुखदुःखसंवेदना माझ्या अनुभवाला येतात, त्यांचा इतरांनाहि तसाच अनुभव येत असला पाहिजे, ही जाणीव उत्पन्न झाली आणि इतरांविषयीं समभाव वाटला म्हणजे माणसाच्या नित्यव्यवहारांत विषम आचार, पिळवणूक, द्वेष, स्पर्धा इत्यादींना स्थान राहात नाहीं. स्वतःविषयींची आसक्ति यांत सुटते आणि त्याचा परिणाम म्हणूनच भय आणि क्रोध आपोआप नष्ट होतात. सामाजिक व्यवहार हा 'आत्मवत् सर्वभूतानि' दृष्टीनें चालले, तर आज मानवाच्या हातून स्वार्थमूलक पायावर उभारल्या गेलेल्या सर्व आर्थिक, राजकीय आणि सामाजिक संस्था कोलमडून पडतील आणि केवळ मानवाच्या समानतेवर आणि म्हणून अहिंसेवर उभारलेल्या तेवढ्याच संस्था टिकून राहातील. ही दृष्टि ठेवूनच नवीन समाजरचना करण्याचा संदेश म. गांधींनीं नवभारताच्या द्वारां जगाला दिला आहे. एकमेकाला धरूनच मानवजीवन चालूं शकतें, हें सत्य; या सत्याची अखंड जागृति ठेवून आपलें व्यक्तित्व स्वेच्छेनें समाजस्वरूपांत विलीन करणें, हा त्या सत्याचा साक्षात्कार; ही विलीनीकरणाची क्रिया म्हणजेच अहिंसा, आणि या अहिंसेच्या पायावर म्हणजे समानतेच्या व न्यायाच्या पायावर करावयाची समाजरचना म्हणजेच गांधीजींनीं पुरस्कारलेला रचनात्मक कार्यक्रम होय. रचनात्मक कार्याचें सूत्र अशा रीतीनें नराचें साध्य जें नारायणरूप होणें, अथवा दुसऱ्या भाषेंत व्यक्तीचें साध्य जें समाजरूप बनणें, तेथपर्यंत जाऊन पोहोंचतें आणि त्या साध्याचें हा कार्यक्रम साधन बनतो. मानवाच्या सामान्य व्यवहारांतूनच या प्रकारें त्याची साधनापूर्ति होऊन त्याला सत्याचा साक्षात्कार अथवा ईश्वरप्राप्ति होते. त्यासाठीं नित्याच्या व्यवहारांतून निवृत्त होऊन विशिष्ट साधना करण्याची त्याला आवश्यकता राहात नाहीं. यांतच गांधीजींच्या जीवनदर्शनाचें वैशिष्ट्य आहे. अर्थात् या प्रकारें







होता. कारण पन्नास-साठ लोक जिवाची पर्वा न करतां कारखाना चालवीत होते. रोज आम्हांला शिव्या आणि धमक्या ऐकाव्या लागत होत्या. वस्तींतल्या दुसऱ्या मजुरांनीं आमच्यावर बहिष्कार घातला होता. एक-दोन वेळां आमच्यावर दगड-विटाहि फेंकण्यांत आल्या. पण मी म्हणालों, "कांहीं होवो, संप करून उपाशी मरण्यापेक्षां बरं."

मी कारखान्यांत लागलों खरा पण मला तें काम येत नव्हतं. खरं सांगायचं म्हणजे हरनामनं वीव्हिंगमास्तरला खोटंच सांगितलं होतं कीं, 'हा हें काम शिकला आहे आणि हा आतां एक मशीन सांभाळूं शकेल.' कारखानदारांना या दिवसांत एवढीच चिंता होती कीं, जास्तींत जास्त मशीनं कशीं ना कशीं तरी चालू ठेवायचीं. कारण मग वर्तमानपत्रांतून घोषणा करायला हरकत नाहीं, कीं संप अयशस्वी झाला आहे आणि कारखान्यांतून काम जसंच्या तसंच चालू आहे ! हरनामनं मला सांगून ठेवलं होतं कीं, कांहीं का होईना, मला सर्व काम माहीत आहे म्हणून ठोकून द्यायचं. माझं मशीन त्याच्या मशीनच्या जवळच होतं. मी त्याच्याकडे पाहात असे आणि तो जें करील तेंच मी करावयास लागत असे. त्यानं बटन दाबलं, मींहि दाबलं; त्यानं तेलाची बुधली घेऊन यंत्राच्या भागांत तेल सोडलं, मींहि तसंच केलं; त्यानं मशीन जोरांत सोडलं, मींहि जोरांत सोडलं. तीन दिवस तर मी तसेच घालविले. पगार आठवड्याच्या आठवड्याला मिळणार होता. पण स्ट्राइकअलावन्सचा रुपया रोजच्या रोज मिळत होता. मीं विचार केला, असाच स्ट्राइक नेहमीं चालावा !

तेवढ्यांत मला मशीनच्या कामाची थोडीशी माहिती झाली होती. कांहीं फार कठिण काम नव्हतं. सारं काम तर मशीनच करीत होतं. आम्हांला फक्त बटन दाबून मशीन चालू करून त्याची देखभाल करायची एवढीच कामगिरी होती. चौथ्या दिवशीं हरनामच्या मशीनचा एक भाग बिघडला आणि त्याला दुसऱ्या मशीनवर पाठविण्यांत आलं. जातां जातां त्यानं माझ्या कानांत हळूच विचारलं, "काय ममदू, सांभाळशील ना ?" मी म्हणालों, "तूं चिंता करूं नकोस, यांत काय मोठंस अवघड आहे ?" तरीपण तो जातां जातां परतला आणि म्हणाला, "जरा हात पाय संभाळून काम कर...."

तो दुसरं मशीन चालवायला गेला. आतां त्याचं पूर्वीचं मशीन इतर अनेक मशीनांप्रमाणंच स्तब्ध उभं होतं. आणि माझं मशीन मात्र खटाखट् काम करीत होतं.

खटाखट्, खटाखट् मशीन चाललं होतं आणि मीहि खुदाच्या दैवी शक्तीची तारीफ करीत होतों. या विलायतवाल्यांना काय अक्कल दिली आहे पण. माणसांचीं कामं मशीनकडून करून घेतात ! जेव्हां आम्ही घोंगड्या विणीत होतों, तेव्हां माझा बाप लोंकर धुऊन धुऊन तिच्यांतला मळ काढायचा, मग आई चरख्यावर लोंकर कांतायची, नंतर आम्ही सर्व भाऊ तागा तयार करायचों. मग मागावर माझा बाप घोंगड्या विणायचा आणि याप्रमाणं आमच्या सर्वांच्या कांहीं दिवसांच्या मेहेनती-नंतर दोन वार लांबीची घोंगडी तयार होत असे. आणि आतां इथं सर्व कामं मशीनं करीत होतीं ! कच्च्या तागाचा धागा आपोआप कांतला जात होता, ताणाबाणा तयार होत होता, कापड विणलं जात होतं, गुंडाळलं जात होतं. आणि किती भरभर ! माझा बाप, आई आणि सर्व भाऊ, शेजारीपाजारी, एवढंच कशाला, मुजफरनगरचे सगळे विणकरसुद्धां एक महिन्यांत कापड तयार करूं शकणार नाहींत कीं जेवढं हें मशीन एका तासांत विणत होतं. वा ! वा ! काय ईश्वराची लीला ! आतां या कापडाचीं पोतीं तयार होतील. त्या पोत्यांत धान्य, मिला डाळ, आणि मिरच्या आणि मीठ भरून दुसऱ्या प्रदेशांत पाठविण्यांत येतील.

खटाखट्, खटाखट्, मशीन चाललं होतं. मीं विजेची फिरकी फिरवून मशीनचा वेग आणखी वाढविला. त्या वाढलेल्या वेगाची मला मजा वाटत होती. कापड आतां जास्ती जलद विणलं जात होतं. त्या वेगांत माझे विचार धांवत होते. मी विचार करीत होतों, हा धागा कोणत्या देशाची सहल करील ? किती चांगलं झालं असतं कीं मीहि याच कापडांत लपेटून....

खटाखट्-खट्, खटाखट्-खट्. मशीनच्या







गाण्यांत मला एक बेसूर आवाज ऐकूं आला. समोर पाहिलं तर एका ठिकाणच्या ताण्याचा धागा तुटला होता. धाग्याची नळी इकडेतिकडे रिकामीच फिरत होती, पण विणाई तर होत नव्हतीच. आमच्या मागावर जेव्हां कधीं धागा तुटत असे तेव्हां माझा बाप चलाखीनं आणि सहज तुटलेल्या धाग्याशीं दुसरा धागा मिळवून एक पीळ द्यायचा. बस, लगेच ते मिळून जात आणि ताण्या-बाण्याचं काम पुन्हां सुरू होत असे. एकदम माझ्याहि डोक्यांत हाच विचार आला कीं, ममदू, तूंहि तसंच कर. आणि याचा मी अजिबात विचार केला नाहीं कीं हें विजेवर चालणारं मशीन आहे, बुंदू विणकराचा माग नव्हे! मशीन बंद न करतांच मीं हात लांबवून तुटलेल्या धाग्यांचीं तोंडं पकडण्याचा प्रयत्न केला. पण माझे हात आंखूड आणि मशीन लांब होतं. टांचा उचलून मला बरंच पुढं झुकावं लागलं. खटाखट्–खट्, खटाखट्–खट्. मशीन चाललं होतं. तुटलेल्या धाग्यांचीं तोंडं माझ्या हातांत आलीं नाहींत तोंच माझ्या पायाचा जमिनीचा आधार सुटला आणि वरच्या वजनामुळें मी ताणलेल्या कापडाकडे ओढला गेलों. खटाखट्–खट्, खटाखट्-खट्. मशीन चाललं होतं. कापडाला आणि त्याच्या-बरोबर मलाहि आंतल्या बाजूला तें मशीन ढकलत होतं. कापड लोखंडाच्या रोलरवर गुंडाळलं जात होतं. आणि मी मशीनच्या पोलादी जबड्याकडे ओढला जात होतों. त्या वेळीं, सरकार, माझा मृत्यु मला समोर स्पष्ट दिसत होता. मरणारा काय करीत नाहीं! हातपाय झटकले. पण कपड्याच्या घोळांत मी इतका गुरफटलों होतों कीं, कोणत्याहि तऱ्हेनं सुटायची संधि मिळाली नाहीं. मीं पाय जोरानं झटकले, तेव्हां माझा डावा पाय दुर्दैवानं मशीनच्या, कोणास ठाऊक, कोणत्या तरी एका भागांत सांपडला! मी लाख तो पाय सोडवूं पाहात होतों, पण पाय निघत नव्हता. उलट मीच फरफटत ओढला जात होतों. माझ्या तोंडून किंकाळी बाहेर पडली आणि कित्येक मजूर माझ्याकडे धांवले. वीव्हिंग-मास्तरचा आवाज आला, "बीज बंद करा, बीज बंद करा." आवाज आला आणि मला वाटलं कीं कोणत्या तरी भयानक हातानं माझ्या पायाचे दोन तुकडे केले आहेत. आणि मग मला अंधारी आली....

जेव्हां मी जागा झालों तेव्हां मी धर्मार्थ इस्पितळांत पडलों होतों आणि माझा उजवा पाय कापला होता असं मला आढळून आलं. हें पाहून प्रथम मला फार वाईट वाटलं. पण नंतर मीं विचार केला, खुदाची कृपा आहे. पायच गेला. जीव तर वांचला! आणि जर दोन्ही पाय गेले असते तर काय झालं असतं? आज मलाहि त्या लुळ्या रुल्दूप्रमाणं हात आणि कुल्ले यांच्या साहाय्यानं घसटत, घसटत चालावं लागलं असतं.

तर सरकार, पंधरा दिवसांनंतर जेव्हां मी इस्पितळांतून निघालों तेव्हां लंगडा झालों होतों. माझ्या खिशांत फक्त सात रुपये होते. सहा रुपये हरनामनं चार दिवसांच्या मजुरीचे आणून दिले होते आणि एक रुपया पहिल्यापैकीं शिलकींतला होता. हरनामनं हेंहि सांगितलं होतं कीं, मला कारखानदाराकडून कांहीं तरी मदत मिळावी म्हणून वीव्हिंगमास्तरशीं त्यानं बोलणं केलं होतं. पण "अडाणी मजूर जर स्वतःच्या चुकीमुळं आपला पाय अगर आमचं मशीन तोडील, तर आम्ही त्याला जबाबदार नाहीं" असं सांगून त्यानं साफ नकार दिला होता. मतलबाची गोष्ट एवढीच कीं मिलच्या मालकांकडून नुकसानभरपाईची आशा नव्हती. असो. मी माझ्या मनाची समजूत काढली कीं, "ममदू, खुदा तुझ्या संतुष्टतेची परीक्षा पाहत आहे, घाबरूं नकोस." जेव्हां मी वस्तींत आलों आणि गाडींतून उतरून भिंतीच्या आधारानं माझ्या खोलीपर्यंत पोंचलों, तोंच रहमत, मंगू आणि कित्येक मजूर माझी विचारपूस करावयास आले. थोडा वेळ तर सर्वजण माझ्या तुटलेल्या पायाकडे पाहातच गुपचूप उभे होते आणि त्यांना तशा तऱ्हेनं पाहतांना पाहिल्यावर, कां कोणास ठाऊक, माझ्या रागाचा पारा एकदम वर चढला आणि मी ओरडलों, "इथं उभं राहून काय पाहतां? याच्यापूर्वी कधीं एका पायाचा माणूस पाहिला नव्हता कीं काय? निघा येथून!" नंतर त्यांच्यापैकीं एकेकजण निघून गेला, पण रहमत तसाच उभा राहिला. मग तो हळूंच म्हणाला, "ममदू, ही संप: फोडल्याची शिक्षा







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुस्तकाचा अनुवाद जनाब अबुल अला चिश्ती यांनी केलेला आहे.

जिब्रानच्या जीवनाविषयीं अरबी साहित्यांतूनहि मला कांहींच माहिती मिळूं शकली नाहीं. अलीकडे This man from Lebanon हें पुस्तक प्रकाशित झाल्यापासून जिब्रानची जीवनकथा जाणण्याची उत्तम सोय झाली आहे. प्रस्तुत प्रस्तावनालेख लिहितांना या सर्वांगसुन्दर पुस्तकाचा मी भरपूर उपयोग केला आहे.

## जिब्रानचें अलौकिक जीवन

'बंडखोर आत्मे' या पुस्तकाला जिब्रानच्या जीवितांत आणि अरबी साहित्यांत सर्व दृष्टींनी महत्त्व प्राप्त झालेलें आहे. जिब्राननें आपल्या वयाच्या १८ ते २० वर्षांमध्यें (स. १९०१ ते १९०३) हें पुस्तक लिहून प्रकाशित केलें. या दोन वर्षांत तो पॅरिस येथें चित्रकलेचाहि अभ्यास करीत होता. या कथांतून जिवनाचा सर्वांगीण क्रान्तिवाद व्यक्त केलेला आहे. जिब्रानचें वय, त्याची कौटुंबिक परंपरा आणि त्याच्या देशांतील सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थिति—या सर्वांचा विचार करितां हा क्रांतिवाद त्याला स्फुरावा, यांतच त्याच्या अलौकिकत्वाचें दर्शन होतें. वयाच्या अकरा वर्षांपर्यंत अरबी, फ्रेंच आणि इंग्रेजी भाषांचा अभ्यास त्याचेकडून घरगुती रीतीनें करवून घेण्यांत आला होता. वयाच्या अकराव्या वर्षी (स. १८९४) तो आपली आई, भावंडें यांच्याबरोबर बोस्टन (अमेरिका) येथें गेला. पण दोनतीन वर्षांतच आपल्या जन्मभाषेचा अभ्यास करण्यासाठीं तो आपल्या मातृदेशाला अट्टाहासानें परत फिरला. बेरुतच्या मदरसतुल हिकमत—(ज्ञानशाला)—मध्यें त्यानें मॅट्रिक्युलेशनची परीक्षा दिली आणि त्यावेळीं अभ्यासक्रमाबाहेरील वैद्यक, आन्तरराष्ट्रीय कायदा, धर्मांचा इतिहास आणि संगीत वगैरे विविध विषयांचा अभ्यास केला. १९०१ मध्यें त्यानें आपलें उच्च शिक्षण पुरें केलें. आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षी त्यानें 'प्रॉफेट'ची अरबी भाषेंतील पहिली प्रत तयार केली. 'अल्हकीकत' (सत्य) या नांवाचें साहित्य व तत्त्वज्ञान या विषयांना वाहिलेलें मासिक वयाच्या सोळाव्या वर्षी चालविलें. सत्राव्या वर्षी त्याचें एक गद्यकाव्य वर्तमानपत्रांत झळकलें आणि त्याच सुमारास इस्लामच्या उदयापूर्वीच्या अरबी कवींची चित्रें त्यानें रेखाटलीं. या कवींची रेखाचित्रें कोठेंहि उपलब्ध नव्हतीं. आपल्या प्रतिभेनें त्यांच्या आकृती कल्पून जिब्राननें त्यांना प्रथमच आकार दिला. पदवी मिळविल्यानंतर पॅरिसला जातांना त्यानें ग्रीस, इटली व स्पेन या देशांना भेट दिली. जिब्रानचा जन्म मॅरोनाइट चर्चच्या संप्रदायांत झालेला होता. त्याच्या आईचा बाप हा त्या चर्चमधील एक पुरोहित होता. त्याच्या बापाचा बाप हा उत्तर लेबॅनानमधील एक मोठा धनाढ्य गृहस्थ होता. तो आपल्या मोठेपणाची जाणीव बाळगणारा होता. जिब्रानच्या आईचें नांव कामिला आणि बापाचें नांव खलील असें होतें. खलील—कामिला यांच्या प्रथम पुत्राचें नांव खलील असेंच ठेवण्यांत आलें. खलील याचा अर्थ 'निवडलेला, प्रिय मित्र' असा आहे. कामिला म्हणजे 'परिपूर्णा' आणि जिब्रान या शब्दानें 'आत्म्यांना रोगमुक्त करणारा अथवा समाधान देणारा' असा अर्थ सूचित होतो. अरबी भाषेमध्यें प्रत्येक नांवाला नेहमीं निश्चित अर्थ असतो. अरबी भाषेंत 'ग' वर्ण नसल्यामुळें 'गिब्रान' असा उच्चार होऊं शकत नाहीं. अरबींतील उच्चार 'जब्रान' हा आहे. अरबीमध्यें महाकवि जिब्रान याचें नांव जब्रान खलील जब्रान असें लिहिलें जातें. इंग्रजीमध्यें खलील याचे वर्ण Khalil या ऐवजीं Kahlil असे पुढें कवीनें स्वतःच बदलून घेतले.

कवि जिब्रानच्या जीवनावर त्याची आई कामिला आणि त्याची बहीण मॅरियाना (Marianna) यांचा विशेष परिणाम झालेला आहे. कामिला ही अनेकभाषाकोविद होती. ती अतिशय रूपवती होती आणि तिचा आवाज अत्यंत मधुर होता. कामिलानें मधुर आवाजाची देणगी आपल्या पुरोहित पित्याकडून संपादिलेली होती. कामिला लहानग्या खलीलला सायंकाळी तासन् तास गाणीं म्हणून दाखवीत असे. हारून अलरशीदच्या पुराणकथा आणि अरबी जीवनांतील लोककथा कामिलाच्या तोंडूनच जिब्राननें बालपणीं ऐकिलेल्या होत्या. आपला मुलगा कोणीतरी अलौकिक पुरुष आहे, अशी तिची खात्री झालेली होती. "If








there is a Saint living upon this earth, it is Marianna Gibran, the daughter of my mother " असे जिब्रान आपल्या बहिणीविषयीं अभिमानानें उद्गार काढीत असे. जिब्रानचें व्यक्तिमत्त्व ज्या कौटुंबिक वातावरणांत विकसित होत होतें, त्याचें स्वरूप या प्रकारचें होतें.

## लेबनानची सांस्कृतिक परंपरा

जिब्रानच्या देशाचें नांव लेबनान. या देशाची सांस्कृतिक परंपरा हजारों वर्षांइतकी प्राचीन आहे. मिसर, असुर, खाल्डिया या देशांतील संस्कृतीच्या साऱ्या परंपरा लेबनानच्या अतिप्राचीन इतिहासांत पुंजीकृत झालेल्या आहेत. मौंट लेबनान आणि त्याच्या आसपासचा प्रदेश ही यहुदी प्रेषितांची पुण्यभूमि आहे. ख्रिस्ती धर्माचा संस्थापक येशू याच भागांत जन्माला आला. येशूची जन्मभाषा (Aramaic) आजहि तेथें प्रचलित आहे. ग्रीक आणि रोमन संस्कृतीचे बरेवाईट सारे अवशेष येथील संस्कृतींत सामावलेले आहेत. यहुदी आणि ख्रिस्ती धर्मांनंतर त्याच सेमेटिक वंशांत उदय पावलेला अत्यंत प्रभावी असा इस्लाम धर्महि या प्रदेशावर आपला खोल परिणाम करुन गेला आहे. लेबनानमधील प्रमुख भाषा आजहि अरबीच आहे; आणि तेथील लोक यहुदी, ख्रिस्ती, इस्लामी अशा भिन्न भिन्न धर्मसंप्रदायांचे असूनहि संस्कृतीनें ते सारे एकच आहेत. आज त्यांचें एक स्वतंत्र राष्ट्रहि बनलेलें आहे. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचा देखील या देशाच्या संस्कृतीवर फार परिणाम झालेला आहे. असा हा संस्कृतिसमृद्ध प्रदेश कित्येक शतकें तुर्कांच्या साम्राज्याच्या जोखडाखालीं खितपत पडला होता. राजकीय पारतंत्र्य, धार्मिक अंधश्रद्धा आणि सामाजिक रूढींची गुलामगिरी—यांच्या दडपणाखालीं सामान्य जनतेचें जीवन पूर्णपणें जड व बधिर होऊन गेलें होतें. जिब्राननें ज्या सामाजिक व राजकीय परिस्थितीच्या विरुद्ध आपलें व्यक्तिमत्त्व उभें केलें, तिचें स्वरूप या प्रकारचें होतें.

## आध्यात्मिक बंडखोरी

सामाजिक परिस्थिति आणि वैयक्तिक मनःस्थिति यांच्या संघर्षांतून जीवनांतील नानाविध ध्येयवाद जन्म पावत असतात. सामाजिक परिस्थिति अत्यंत जड व बधिर झालेली असेल, तर त्या परिस्थितीशीं झुंज घेणारें मन बंडखोरीचें स्वरूप धारण करतें. ही बंडखोरी प्रथम आध्यात्मिक वेषांत प्रकट होते. आणि त्या आध्यात्मिक स्वरूपांतूनच पुढें यथाकाळीं भौतिक व व्यावहारिक चळवळी जन्म पावतात. अशा आध्यात्मिक बंडखोरीचें प्राथमिक स्वरूप स्वाभाविकच साहित्यसृष्टींत आकार पावतें. जिब्रानच्या प्रारंभींच्या साहित्यसृष्टीचें स्वरूपहि अशाच प्रकारचें आहे. ' बंडखोर आत्मे ' या कथासंग्रहांत ही आध्यात्मिक बंडखोरी उत्कट सामर्थ्यानें प्रकट झालेली आहे. जीर्ण आणि जड बनलेल्या समाजांतील सत्ताधारी संस्था बुद्धिद्रोही आणि चैतन्यविरोधी असतात. त्या स्थितिप्रियतेच्या इतक्या आहारीं गेलेल्या असतात कीं, कोणत्याहि प्रकारची गति सहन करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उरलेलें नसतें. यामुळें अशा समाजांतील बंडखोर आत्म्याला सर्व बाजूंनीं दडपण्याचे व चिरडण्याचे प्रयत्न केले जातात. हाच अनुभव खलील जिब्रान यालाहि आला. ' बंडखोर आत्म्या 'च्या प्रकाशनानंतर थोड्याच दिवसांत पुरोहित वर्गाकडून बैरुतच्या बाजारांत त्याची होळी करण्यांत आली. तें पुस्तक घातक, क्रांतिकारक आणि तरुणांच्या मनांत विष कालविणारें (dangerous, revolutionary and poisonous to youth) आहे, असें ठरविण्यांत आलें. पॅरिसमध्यें रोदिन (Rodin) चा मित्र आणि शिष्य म्हणून शांतपणानें चित्रकलेच्या अभ्यासांत मग्न असलेल्या जिब्रानला ज्यावेळीं या होळीची वार्ता समजली, त्यावेळीं त्यानें इतकेच उद्गार काढले कीं, 'त्या पुस्तकाची ताबडतोब दुसरी आवृत्ति काढण्याला हें एक उत्तम कारण झालें.' पण या ग्रंथाची होळी होऊनच प्रकरण थांबलें नाहीं. चर्चमधून बहिष्कृत केल्याचें वृत्तहि त्याला पॅरिसमध्यें कळविण्यांत आलें; आणि तुर्की साम्राज्याच्या जुलुमी सत्ताधीशांकडून त्याला स्वदेशांतून निर्वासित करण्यांत आल्याचें कळविलें गेलें. १९०८ सालीं तुर्कस्तानमध्यें नवीन सरकार काम करूं लागल्यानंतर त्याच्या हद्दपारीची आज्ञा पुनः जारी करण्यांत आली. तथापि जिब्रानचा लौकिक वाढतच गेला. त्याची लेबनानमधील तरुणांच्या मनावरील पकड अधिकच दृढ होत गेली







आणि त्यानें पेटविलेल्या क्रान्तीची ज्वाला वाढत जाऊन तिनें लेबनानच्या साऱ्या जीर्णतेचा व जडतेचा ग्रास करून टाकला.

१९१० मध्यें त्यानें न्यू यॉर्कमध्यें कायमची वस्ती केली आणि अंतकाळापर्यंत (१९३१ पर्यंत) अमेरिका हीच त्याची कर्मभूमि झाली. या सुमारें दोन तपांच्या काळांत चित्रकार आणि साहित्यकार म्हणून त्याची उत्तमोत्तम कामगिरी होत गेली. अरबी व इंग्रजी अशा दोनहि भाषांत त्यानें विविध प्रकारचें साहित्य निर्माण केलें आणि अरबी व इंग्रजी या दोनहि साहित्यांत आपलें नांव अजरामर केलें. त्याच्या देशांतील सहस्रावधि तरुण अमेरिकेंत येऊन राहिलेले होते, त्यांचा तो मार्गदर्शक झाला होता. अमेरिकेंत असलेल्या अरबी साहित्यकारांतील प्रतिभाशाली तरुणांचा तो स्फूर्तिदाता बनला होता.

## नवराष्ट्राचा निर्माता

तुर्की साम्राज्याच्या विनाशांतून मध्यपूर्वेंत जीं नवीं राष्ट्रें जन्मास आलीं, त्यांत लेबनानच्या प्रजासत्ताक राज्याची गणना प्रामुख्यानें करावी लागेल. या नवराष्ट्राच्या निर्मात्यांमध्यें खलील जिब्रान याचें स्थान विशेष उच्च प्रकारचें आहे. या 'बंडखोर आत्म्या'च्या जन्मदात्याला त्याच्या स्वतंत्र राष्ट्रानें विलक्षण आदरानें गौरविलें. जिवंतपणीं त्याचा सत्कार करण्याची संधि त्याच्या देशबांधवांना न मिळाल्यामुळें त्यांनीं जिब्रानच्या मृत्यूनंतर त्याचें शव अमेरिकेंतून दरबारी थाटानें त्याच्या मायदेशीं आणिलें आणि अत्यंत अभूतपूर्व जयजयकारांत त्याच्या बिशेरी (Bsherri) या जन्मगांवीं तेथील ख्रिस्ती मठाच्या शेजारींच त्याची स्थापना केली. जिवंतपणीं देशभक्तीच्या गुन्ह्यामुळेंच बहिष्कृत झालेल्या या बंडखोराच्या सत्कारांत यावेळीं सरकारचे सर्व अधिकारी, चर्चचे प्रमुख धर्मगुरु आणि सर्व धर्मांचे व सर्व पंथांचे नागरिक यांनीं अहमहमिकेनें भाग घेऊन जिब्रानवरील आपलें प्रेम व्यक्त केलें. महाकवि खलील जिब्रान याचें माहात्म्य सिद्ध करण्यास याहून आणखी कोणत्या पुराव्याची गरज आहे ?

## सर्वोदयकारी जीवनपद्धति

'द्री पा( आत्से' या पुस्तकांत जो जीवनाचा सर्वांगीण क्रान्तिवाद व्यक्त झाला आहे, त्याच्याविषयीं येथें थोडा विचार करणें योग्य होईल. मानवी जीवनाचा विचार करितांना व्यक्तीला प्राधान्य द्यावयाचें कीं समाजाची श्रेष्ठता स्वीकारावयाची, असा प्रश्न प्रारंभींच उपस्थित होतो. या प्रश्नाच्या वेगवेगळ्या उत्तरांप्रमाणें वेगवेगळीं जीवनदर्शनें निर्माण झालेलीं आहेत. माझ्या समजुतीप्रमाणें व्यक्ति विरुद्ध समाज असा आत्यंतिक विरोध संभवतच नाहीं. व्यक्तीचा जन्म समाजांत होतो आणि व्यक्तीच्या सर्वांगीण विकासाला समाजाच्या सहकार्याची सदैव अपेक्षा असते. म्हणून समाजाच्या विघातावर कोणाहि व्यक्तीचा विकास कधींच उभारला जाणें शक्य नाहीं. त्याचबरोबर ही गोष्ट देखील तितकीच ध्यानीं बाळगण्यासारखी आहे कीं, समाजाचा विकास म्हणजे कांहीं अमूर्त, अव्यक्त अशी घटना नव्हे. समाजाचा विकास म्हणजेच त्यांतील घटकांचा, व्यक्तींचा विकास होय. ज्या समाजांत व्यक्तीचा विकास घडून येणार नाहीं, तो समाज जड समजला पाहिजे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखी आहे. समाजांतील कांहीं थोड्या व्यक्तींच्या विकासासाठीं त्यांतील बहुसंख्य घटकांचा विनाश होत असेल, तरी देखील ती गोष्ट समाधानकारक मानतां येणार नाहीं. तात्त्विक दृष्ट्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीला आपल्या अंतर्गत शक्तींचा विकास करण्याची समान संधि आणि समान साधनें उपलब्ध झालीं पाहिजेत. ज्या समाजांत अशा प्रकारची सर्वोदयकारी जीवनपद्धति निर्माण झालेली असेल, तोच समाज खरोखर सुसंस्कृत झाला आहे, असें म्हणतां येईल. अशा सर्वोदयकारी जीवनदर्शनाचें स्वरूप कशा प्रकारचें असूं शकेल ? समाजविकासाला प्रेरणा देणारी जीवनशक्ति कोणती ? त्या शक्तीची उपासना कोणत्या साधनांनीं होऊं शकेल ? हेच प्रश्न जीवनदर्शनाच्या शोधांत अत्यंत महत्त्वाचे ठरतात.

## व्यक्तीला विश्वमय बनविणाऱ्या प्रेरणा

तसें पाहिलें तर समाज ही एक निर्गुण वस्तु आहे, ती निराकारहि आहे. सगुण आणि साकार अशा वस्तु म्हणजे व्यक्तीच. म्हणून वरील प्रश्नांचें








उत्तर व्यक्तीच्याच जीवनांत सांपडलें पाहिजे. यामुळेंच मानवी जीवनांतील सारी संपत्ति वैयक्तिक आणि आध्यात्मिकच असलेली आढळून येते. **विश्वाला गवसणी घालूं शकणारा व्यक्तिवाद** हेंच मानवी जीवनाचें यथार्थ दर्शन होय. मानवी व्यक्ति आपल्या विकासासाठीं इतर व्यक्तींची आणि निसर्गाची अपेक्षा राखते. या अपेक्षेंतच मानवाचीं सारीं दुःखें आणि सारा आनंद सामावलेला आहे. जिजीविषेची मूलभूत प्रेरणाच सामाजिक आहे. यामुळें व्यक्तीच्या जीवनप्रेरणा जितक्या उत्कट आणि प्रामाणिक बनत जातील, तितकें व्यक्तीचें व्यक्तित्व कमी होत जातें आणि ती विश्वमय होऊं लागते. व्यक्तीला विश्वमय बनविणाऱ्या या प्रेरणा, खलील जिब्रानच्या भाषेंत सांगावयाच्या तर, 'Faith, Love and Work' या होत. श्रध्दा, प्रेम आणि कर्म या तीन शब्दांत जीवनाचें सारें तत्त्वज्ञान खरोखरच सांठवलेलें आहे. जगण्यासाठीं नानाविध कर्मांची आवश्यकता इतकी उघड आहे कीं, त्याविषयीं विवेचन करणें हास्यास्पद होईल. पण हें कर्म प्रेमानें, स्वेच्छेनें, अन्तरींच्या उमाळ्यानें झालें, तरच तें जीवनाला कृतार्थ करितें. ज्यावेळीं हा उमाळा आटून जातो, त्यावेळीं कर्म दुःखमय बनतें आणि मग कर्मसंन्यासाचें रडकें तत्त्वज्ञान जन्म घेतें, अथवा कर्माची सक्ति केली पाहिजे अशा प्रकारचीं भौतिक जड तत्त्वज्ञानें निर्माण होतात. म्हणून जीवनांत कर्मापेक्षांहि या अन्तरींच्या उमाळ्याला खरें महत्त्व आहे. प्रारंभीं या उमाळ्याचें स्वरूप संकुचित आणि म्हणूनच स्वार्थमय भासतें. यालाच वासना म्हणतात. या वासनांचें यथार्थ स्वरूप न जाणल्याकारणानें त्या अनर्थकारक आहेत, असें म्हणणारें एक वैरागी तत्त्वज्ञान जगानें निर्माण करून ठेवलें आहे. वासना अनर्थकारक नाहीं. वासनेची दुर्बळता ही अनर्थकारक आहे, वासना हीच जीवनशक्ति होय. ती जितकी उत्कट आणि प्रबळ होत जाईल, तितकी ती डोळस बनत जाते आणि वासना डोळस झाली म्हणजेच तिला श्रध्दा म्हणतात. ही श्रध्दा व्यक्तीला विश्वाशीं एकरूप करून सोडते आणि आपल्या व्यापकतेंत आपल्या व्यक्तित्वाचें विसर्जन करून घेते. जीवनाच्या नित्यत्वावर आणि अखंडितत्वावर आरूढ झालेली श्रध्दा हें माणसाला प्राप्त होऊं शकणारें सर्वांत मोठें ज्ञान म्हणतां येईल. यांतच त्याचें सामर्थ्य आणि त्याची शांति सामावलेली आहे.

### विवाह हा समाजाचा पाया

'बंडखोर आत्म्यां'त जिब्रानचें हें जीवनदर्शन आपणाला संपूर्ण स्वरूपांत पहावयास मिळतें. मानवानें आपल्या विकासासाठीं निरनिराळ्या सामाजिक संस्था निर्माण केलेल्या आहेत. आदिमानवापासून तों आजपर्यंतच्या सहस्रावधि वर्षांच्या समाजविकासांत त्यांचाहि विकास होत आलेला आहे. स्थूल मानानें या सामाजिक संस्था चार रूपांमध्यें आढळतात. विवाह (Marriage), वित्त (Property), दंड (State) आणि धर्म (Church)—अशीं त्यांचीं नांवें सांगतां येतील. समाज या चार संस्थांनीं रचला आणि बांधला गेलेला आहे. जिब्रानच्या या कथासंग्रहांत या चारहि संस्थांविरुध्द बंडखोरी शिकविलेली आढळते. या चारहि संस्थांची मानवाच्या आदर्श जीवनांत गरज नाहीं, असें प्रतिपादन करणारीं तत्त्वज्ञानें आपणाला परिचित आहेत. विवाह आणि वित्त यांचा निषेध सांगणाऱ्या संप्रदायांना दंडसंस्थेची आवश्यकताच नाहीं. खरोखर विवाहामुळेंच वित्ताची आवश्यकता उत्पन्न होते. विवाहाची आवश्यकता जर मानवसमाजांतून नष्ट झाली, तर निसर्गतः उत्पन्न होणाऱ्या चाऱ्यावर मानव प्राणी देखील आपला निर्वाह करूं शकेल. मानवाला विवाहाच्या आकांक्षेनेंच वित्ताचा शोध करण्यास भाग पाडलें. विवाहासाठींच तो वतनाला चिकटून राहात आहे. विवाह आणि वित्त यांच्या आवश्यकतेंतूनच दंडसंस्थेची उत्पत्ति झालेली दिसून येईल. आणि जेथें दंडशक्तीनें देखील काम होईना, त्या ठिकाणीं धर्मसंस्था निर्माण करावी लागलेली आहे. म्हणून विवाहाचा छेद करितां आला, तर या साऱ्याच संस्था विराम पावणें शक्य आहे. विवाहाची प्रेरणा ही पापमय आहे, हा विचार माणसानें आपल्या मनांत फार वर्षें वागवलेला आहे. तथापि त्याला ती प्रेरणा नष्ट करण्यांत मुळींच यश आलेलें नाहीं. म्हणून अपवादात्मक व्यक्ती वगळल्या, तर मानवी समाजाला विवाह वर्ज्य मानतां येणार नाहीं. नव्हे, विवाह हा समाजाचा पायाच







आहे. विवाहबंध नसेल तर मानवी व्यक्ती या आकाशांतील ढगांप्रमाणें भटकत राहतील. विवाहामुळेंच स्त्री आणि पुरुष यांचें मिलन होतें आणि त्यांतूनच कुल, गोत्र, जाति अशी समाजाची निष्पत्ति होते. नाहीं ! विवाहाशिवाय समाजजीवनच नाहीं; आणि विवाह मान्य केला म्हणजे वित्ताचा प्रश्न आलाच. मानवी समाजाच्या आदर्श अवस्थेंतहि विवाह आणि वित्त या संस्था राहणार व राहिल्या पाहिजेत. पण दंडसंस्थेची मात्र तशी स्थिति नाहीं. विवाह आणि वित्त या संस्था यथार्थ स्वरूपांत निर्माण करितां आल्या, तर दंडसंस्थेची आवश्यकता उरणार नाहीं. आणि धर्मसंस्थेची (Church) देखील उपयुक्तता संपेल.

## विवाहसंस्थेचा पाया

'बंडखोर आत्म्यां'त जिब्राननें दंडसंस्था आणि धर्मसंस्था यांच्या संपूर्ण विलयनाची घोषणा केलेली दिसते. विवाह आणि वित्त या संस्थांचें यथार्थ स्वरूप काय असावें, याचें स्पष्ट दिग्दर्शन त्यानें केलें आहे. विवाह हा परस्परांच्या आत्मिक प्रेमावरच उभारला पाहिजे, असें त्यानें स्पष्ट सांगितलें आहे. 'करावें आणि भरावें' या सूत्रावर वित्तसंस्थेची उभारणी झाली पाहिजे, अशी त्याची शिकवण आहे. ज्या अर्थी राबल्याशिवाय अन्न निर्माण होत नाहीं, त्या अर्थी राबणाऱ्यालाच अन्न सेवन करण्याचा अधिकार आहे, असें त्याचें सोपें अर्थशास्त्र आहे. विवाहसंस्था आणि वित्तसंस्था यांचा मूलभूत पाया म्हणून जिब्राननें सांगितलेले प्रेम आणि श्रम हे दोन सिद्धान्त सर्वमान्य होण्यासारखे आहेत. प्रेमावर विवाह आणि श्रमावर वित्त उभारण्याच्या कामीं मानवजातीला अद्यापि यश आलेलें नाहीं. आणि म्हणूनच आज देखील मानवसमाजांत न्यायाची प्रस्थापना झालेली दिसत नाहीं. प्रेम आणि श्रम यांचा पाया न मिळाल्यामुळें विवाह आणि वित्त या दोनहि संस्था विकृत झालेल्या आहेत आणि त्या विकृतींतून सारे अन्याय पैदा झाले आहेत. दंडसंस्था आणि धर्मसंस्था यांचें कार्य समाजांत न्यायप्रस्थापना करण्याचें असल्यामुळें त्यांनीं सर्व अन्यायांच्या मुळाशीं असलेली ही विकृति दूर केली पाहिजे. पण हें लक्षांत न घेतां या दोनहि संस्था केवळ बाह्य दडपणानें समाजांत शांति प्रस्थापित करण्याचा चुकीचा मार्ग अवलंबितात आणि मग जिब्रानसारख्या क्रान्तिकारकांना या संस्थांच्या विरुद्ध बंड पुकारावें लागतें.

## विवाहादि संस्थांचा ऐतिहासिक विकास

विवाह, वित्त, दंड आणि धर्म या चार संस्थांचा ऐतिहासिक दृष्टीनेंहि विचार करिता येतो. मानवानें जीवनसंग्रामांत आपल्या सुखासाठीं आणि प्रतिष्ठेसाठीं या संस्था हळूहळू निर्माण केल्या आणि निरनिराळ्या सामर्थ्यांच्या आधारावर त्यांना वेगवेगळीं रूपें चढविलीं. वरवर पाहतां 'बळी तो कान पिळी' या न्यायावर म्हणजे तात्त्विक दृष्ट्या अन्यायावरच या संस्थांची रचना झालेली दिसते. पुरुषानें आपल्या पाशवी बळाच्या जोरावर स्त्रीला अंकित करून आपल्या भोगविलासाचें भाजन बनविलें. विवाहसंस्थेचें हें अगदीं प्राथमिक स्वरूप होय. जमिनीच्या मालकी हक्काच्या जोरावर यांच माणसानें इतर माणसांच्या श्रमावर ऐदीपणानें जगण्याचा मार्ग शोधून काढला. वित्तसंस्थेचें हेंच पाहिलें रूप. खरोखर स्त्री हेंच पुरुषाचें पाहिलें वित्त होय. या दोनहि संबंधांतील अन्यायाची परंपरा चालू राखण्यासाठीं माणसानें जें शारीरिक बल वापरण्याचें ठरविलें, तेंच दंडसंस्थेचें प्राथमिक स्वरूप होय. आपल्या सामर्थ्याच्या उन्मादानें बेहोष होऊन 'मी या सर्व सुखाचा आणि सुखसाधनांचा जन्मतःच प्रभु आहे. माझ्यामागें कोणी दिव्य शक्ति माझ्या रक्षणासाठीं उभी आहे आणि तिचा मी लाडका पुत्र असल्यामुळें माझा विजय घडवून आणणें हेंच त्या शक्तीचें प्रयोजन आहे'—असल्या धुंद श्रद्धेलाच प्रारंभीं धर्मसंस्था हें नांव लाभलें असलें पाहिजे.

मानवाच्या विकासांत हळूहळू या संस्था भिन्न भिन्न रूपें घेत्या झाल्या आणि प्रारंभीं एकाच व्यक्तीमध्यें पुंजीभूत झालेल्या या चारहि संस्थांचे पृथक पृथक् प्रतिनिधी निर्माण झाले. तथापि शुद्ध पाशवी बळावर जीवन फार काल जगूं शकत नाहीं आणि ज्यांच्यापासून भोग-विलासाची अपेक्षा करावयाची, त्यांच्या खुषीच्या सहकार्याची प्राप्ति झाल्याशिवाय भोगविलासहि यशस्वी रीतीनें पदरीं







पडत नाहींत. म्हणून स्वार्थासाठीं देखील बळाच्या बरोबरीनेंच अनुनयाचा, खुशामतीचा आश्रय करावा लागतो. ऐतिहासिक विकासांत या चारहि संस्थांच्या स्वरुपांत उत्तरोत्तर, बलामध्यें अनुनयाचें मिश्रण केलेलें आढळून येतें, तें यामुळेंच. यामुळें मूळच्या अन्यायाची उग्रता कमी होते आणि गुलामगिरीतहि थोडी रंजकता निर्मिली जाते. यांतच दुर्बलांच्या व्यक्तित्वाला अवसर मिळूं लागतो आणि त्यांचें बल वाढीस लागतें. अशा रीतीनें मानवसमाजांत सत्तेचें समतोलन सतत वाढत आणि बदलत चाललेलें आढळून येईल. पण मानवी जीवनाच्या या भौतिक अंगाबरोबरच त्याचें आध्यात्मिक अंगहि विकसित होत चाललेलें आहे. या आध्यात्मिक अंगाचें दर्शन माणसाच्या मानासिक विकासांत आढळून येतें. 'जसें आपल्याला तसेंच दुसऱ्याला' ही भावना देखील त्याच्या बुद्धी-मध्यें थोडी थोडी स्थिर होऊं लागते आणि त्याच्या ठिकाणीं न्यायबुद्धीचा प्रादुर्भाव होतो. **या न्याय-बुद्धीचा विकास होत जाणें हाच मानवी मनाचा आध्यात्मिक विकास होय.** भौतिक अनुकूलतेचा या आध्यात्मिक न्यायबुद्धीला आधार मिळाला म्हणजे ती न्यायबुद्धि सामाजिक क्षेत्रांत स्थिर होऊं लागते. विवाह, वित्त, दंड आणि धर्म या चारहि संस्थांच्या विकासामध्यें मानवाच्या विकसित झालेल्या न्यायबुद्धीनें हळूहळू पण निश्चयानें परिवर्तन घडवून आणलेलें आहे, हें देखील आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.

## विवाहसंस्थेचें प्राणतत्त्व

विवाहसंस्था ही संपूर्णपणें न्यायबुद्धीवर उभारली जावयाची असेल, तर पुरुषानें स्त्रीला आपल्या पाशवी बळावर अंकित करुन ठेवण्याची दुराशा अंतःकरणांतून कायमची सोडून दिली पाहिजे. आणि केवळ प्रेमानेंच तिची प्राप्ति करुन घेण्याचा मार्ग चोखाळला पाहिजे. विवाहसंस्थेचें प्राणतत्त्व कोणतें? 'प्रेम' असें जिब्रानचें उत्तर आहे. स्त्री आणि पुरुष मिळून पूर्ण मानव होतो. 'अर्धेन नारी व्यभ-वत्' याचा अर्थ हाच आहे. आणि म्हणूनच स्त्री व पुरुष यांच्यामध्यें स्वयंभू आकर्षण आढळतें. हें आकर्षण अगदीं स्वाभाविक आहे. याची लाज वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. स्त्रीच्या पूर्णतेला पुरुषाची आणि पुरुषाच्या पूर्णतेला स्त्रीची गरज आहे, हें जीवनसत्य नाकारण्यांत अर्थ नाहीं. हें आकर्षण केवळ शारीरिक आहे असें समजणें, हें केवळ बुद्धिमांद्य होय. या आकर्षणाचें अंतिम स्वरुप आध्यात्मिक आहे. याची प्रचीति आली म्हणजे या आकर्षणाची भीति नष्ट होते आणि त्यांतील दिव्यता अनुभवास आल्यानंतर हें आकर्षण आध्यात्मिक विकासाचें साधन म्हणून निर्भयपणानें वापरतां येतें. जिब्रानसारखे महाकवी ज्यावेळीं स्त्रीपुरुषांमधील प्रेमाला आध्यात्मिक पावित्र्य अर्पण करितात, त्या-वेळीं त्यांची दृष्टि अशीच असते, यांत शंका नाहीं. ही प्रेमभावना प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या हृदयांत वास करीत असते. ही प्रेमभावना केवळ प्रणयवृत्तीपासून भिन्न आहे, हें ओळखण्याचें सामर्थ्य शिक्षणानें आणि संस्कृतीनें प्रत्येक मानवाला मिळालें पाहिजे. स्त्री-पुरुषांचा विवाह हा कुल, जाति, वर्ण, संपत्ति, प्रतिष्ठा अथवा केवळ ऐन्द्रिय सुख यांवर उभारण्याचे प्रयत्न कधींच सफल झालेले नाहींत. परस्परांच्या शुद्ध प्रेमावरच आधारलेलें वैवाहिक जीवन परस्परांना कृतार्थ करूं शकतें. पुरुषापेक्षां स्त्रीला ही प्रेमवृत्ति अधिक सुलभ असते. कारण तिचें जीवन निर्मिती-साठीं आहे. उलट पुरुष सत्तेच्या आणि पराक्रमाचा लोभी असतो. म्हणून शुद्ध प्रेमावर आधारलेल्या विवाहानें स्त्रीचें जीवन कृतार्थ होतें आणि पुरुषाच्या जीवनाला उदात्तता लाभते. जिब्रानच्या पुढील कथांत हा प्रेमाचा सिध्दांत निरनिराळ्या रुपांनीं मांडलेला आढळून येईल.

## विवाहसंस्थेच्या विकृतीचे परिणाम

सामान्यपणें मानवसमाजांत विवाह हें एक पवित्र बन्धन मानलें जातें. त्याचा धर्मामध्यें समावेश केलेला आढळतो. विवाहबन्धन हें ईश्वरी बन्धन आहे, अशी समजूत प्रचलित आहे. विवाहामध्यें निष्ठेला अत्यंत श्रेष्ठ स्थान दिलेलें आढळतें. म्हणूनच व्यभिचार हें पातक समजलें गेलें आहे. पण विवाहसंस्थेची आध्यात्मिक उपपत्ति मान्य करावयाची झाल्यास विवाहाचा प्राण, प्रेम हाच, मानावा लागेल. प्रेमानेंच मनुष्याचें हृदय शुध्द होत असल्यामुळें प्रेम हेंच ईश्वरी तत्त्व समजावें लागतें. या तत्त्वाचा मानवी







# खलील जिब्रानचा क्रांतिवाद

हृदयांत आविष्कार झाला म्हणजे निष्ठा सहजच निर्माण होते आणि व्यभिचार संभवत नाहीं. पण सामाजिक दृष्ट्या विवाहसंस्था ही कोठेंच अद्यापि शुध्द प्रेमावर उभारण्यांत आलेली नाहीं. अद्यापि बाह्य आणि कृत्रिम साधनांनींच निष्ठा निर्माण करण्याचे प्रयत्न चालले आहेत. कारणाशिवाय कार्याची उपलब्धि होईल, अशी दुराशा या वृत्तीच्या मुळाशीं आहे. प्रेमाची प्रतीति न आल्यामुळें विवाह हा एक केवळ ' शरीरसंबंध ' ठरतो. आणि मानसिक निष्ठेच्या अभावीं त्याला तत्त्वतः व्यभिचाराचेंच स्वरूप प्राप्त होतें. विवाहसंस्थेच्या या विकृतिमुळें समाजांत नेहमींच स्त्रीपुरुषांचा—विशेषतः स्त्रीचा—छळ होत आला आहे. आश्चर्याची आणि दुःखाची गोष्ट ही कीं, हा छळ, धर्म, ईश्वरेच्छा, पावित्र्य इत्यादि बड्या नांवाखालीं चाललेला आढळून येतो. शरीर एकीकडे आणि मन दुसरीकडे अशा अवस्थेंत समाजांत ढोंग, फसवणूक यांना ऊत येतो. हें ढोंग दडपण्याचे बाह्य उपाय यशस्वी होण्यासारखे नसल्यामुळें समाजांत जडता आणि क्रूरता यांची वाढ होत जाते. आणि सारेंच समाजजीवन उथळ, पुरुषार्थशून्य व विलासप्रवण बनतें. अशा वेळीं रूढ विवाह हेच पापमय होतात आणि आत्मिक कल्याणासाठीं प्रेमाच्या नांवानें रूढ विवाहसंस्थेविरुध्द बंड पुकारण्याची आवश्यकता निर्माण होते. जिब्रानच्या साऱ्या वर्णनांत हीच बंडखोरी आपणाला आढळून येईल. ' आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ' या वृत्तीनें प्रेरित होऊन जिब्रानच्या स्त्रीपुरुष पात्रांची चाललेली सारी हालचाल वाचकांच्या अंतःकरणाला आकर्षित करते, उल्हसित करते, उदात्त बनविते. प्रेम ही सौदा करण्यासारखी वस्तु नाहीं. ती एक आकाशींची ज्वाला आहे. तिला बाह्य उपाधींनीं निर्माण करूं पाहणें अथवा अडवून ठेवूं पाहणें हा शुद्ध वेडेपणा आहे. ती ज्वाला ज्यावेळीं हृदयांत अवतीर्ण होते, त्यावेळीं ती हृदयाला जाळून पवित्र करते. यांतून लाभणारी कृतार्थता इतकी आकर्षक असते कीं, या प्रेमाचा साक्षात्कार होण्यासाठीं आणि झाल्यानंतर माणसें आपल्या शरीराचें संपूर्ण बलिदान करण्यांत आनंद मानतात. जिब्रानने हे सारे प्रकार दाखविले आहेत.

## ' गुलबदन '

' गुलबदन ' नांवाच्या जिब्राननें लिहिलेल्या कथेंत प्रेमाच्या बंडखोरीचें एक आत्यंतिक स्वरूप चित्रित केलेलें आढळतें. गुलबदनचें लग्न ज्या पुरुषाशीं झालें होतें, तो पुरुष चांगला आहे. त्याला प्रेमाची जाणीव आहे. गुलबदनचें प्रेम मिळावें म्हणून त्यानें सर्व प्रयत्न केले. पण गुलबदनच्या हृदयांत त्याच्याविषयीं प्रीतीची भावना कधींहि उमलूं शकली नाहीं. त्याच्यासाठीं आपल्या मनांत प्रेम उत्पन्न व्हावें, असा तिनें प्रामाणिक प्रयत्नहि केला. पण तो सफल झाला नाहीं आणि दुसऱ्या एका दरिद्री, सद्गुणी तरुणाविषयीं तिच्या मनांत प्रेम निर्माण झालें. अशा स्थितींत तिनें काय करावें ? प्रेमानें प्राप्त होणारी जीवनाची कृतार्थता मिळवावी कीं प्रेमाचा त्याग करून आपलें हृदय शुष्क, बधिर आणि जड बनवावें ? जीवनाच्या विकासाच्या दृष्टीनें तिनें प्रेमाचा स्वीकार करावा, असेंच म्हणावें लागेल. जिब्राननें हाच निर्णय दिला आहे आणि तो आध्यात्मिक दृष्ट्या बरोबर आहे, असें माझें मत झालें आहे.

## दंडसंस्थेची आध्यात्मिक उपपत्ति

' कसेल त्याची जमीन ' या तत्त्वाचा जिब्राननें आपल्या कथेंत पुरस्कार केला आहे, तो आजच्या जगांत सर्वमान्य झालेला आहे. दंडसंस्थेची ऐतिहासिक उपपत्ति ' बळी तो कानपिळी ' अशी असली तरी त्याविषयींची आध्यात्मिक उपपत्तिहि दाखविली जाते. माणसामध्यें स्वार्थबुद्धि आणि न्यायबुद्धि यांची परस्पर झुंज नेहमीं चाललेली असते. न्यायबुद्धीचा आश्रय करून स्वार्थबुद्धीला लगाम घालणें ही माणसाची संस्कृतिसाधना आहे. समाजांत अशा सुसंस्कृत नागरिकांची संख्या वाढत जाणें हाच समाजाचा विकास होय. या विकासाच्या आदर्शावस्थेंत न्यायबुद्धीचें आधिराज्य प्रस्थापित होईल आणि अन्तरींच्या उमाळ्यानें न्यायबुद्धीचा स्वीकार झाल्यामुळें बाह्य दडपणाची आवश्यकता उरणार नाहीं. हाच आत्मदंड होय. परंतु अशी अवस्था प्राप्त होईपर्यंत सामाजिक व्यवहाराच्या नियमनासाठीं बाह्य दंडाची आवश्यकता राहते. सामाजिक न्यायप्रस्थापनेसाठीं समाजांतील लोकांनीं







स्वखुषीनें लादून घेतलेला राजदंड हा आत्मदंडाचाच सामाजिक आविष्कार आहे. म्हणून लोकमतानुवर्ती राज्यसंस्था ( Democratic state ) आजच्या सुसंस्कृत मानवानें पसंत केली आहे. मात्र ही शुद्ध राखण्यासाठीं सारे वैयक्तिक मालकी हक्क तत्त्वतः नष्ट केले पाहिजेत. वित्तसंस्था सामुदायिक मालकीची मानल्याशिवाय राज्यसंस्था सामाजिक न्यायनिर्मितीचें कार्य करूं शकणार नाहीं. हा निष्कर्षहि आतां सर्वमान्य झाला आहे. खलील जिब्रानचे दंडसंस्थेविषयींचे विचार याच दिशेनें चालले होते, असें आपणाला या कथांवरून दिसून येतें.

## जीवनांतील सारें कर्म हाच धर्म

शेवटीं धर्मसंस्थेचा विचार राहिला. धर्मासंबंधीं आणि धर्मसंस्थेसंबंधीं मोठमोठ्या विचारी माणसांच्या डोक्यांतहि अद्यापि फार गोंधळ माजलेला आहे. जगांतील बहुतेक धर्मसंस्था थोड्याफार विकसित झाल्यानंतर तेथेंच खिळून पडलेल्या आहेत. नानाविध शुष्क विधींच्या आहारीं जाऊन धर्मसंस्थेनें आपला प्राण गमाविला आहे. सामाजिक, आर्थिक, आणि राजकीय अन्यायांचा मूढपणानें पाठपुरावा करण्यांत बहुतेक धर्मसंस्थांनीं आपली सारी शक्ति वेंचलेली आहे. यामुळें आधुनिक काळीं सामाजिक क्रान्तिकारक धर्मसंस्थेचे वैरी झाले आहेत. धर्मसंस्थेचा विरोध करणारा आणखी एक वर्ग पुरातन काळापासून चालत आलेला आहे. तो वर्ग म्हणजे साक्षात्कारी सन्तांचा होय. मीमांसक आणि वेदान्ती, शास्त्री आणि सन्त—यांचे झगडे वैदिक धर्मांत चालत आलेले आपणाला माहितच आहेत. इस्लामी आणि खिस्ती धर्मांतहि हें द्वंद्व पहावयास मिळतें. इस्लामच्या कर्मकांडाला कंटाळलेल्या साक्षात्कारी लोकांचा पंथ सूफी या नांवानें ओळखला जातो. खिस्ती धर्मांतहि सांप्रदायिक सिद्धान्तांच्या पलीकडे गेलेले लोक खिश्चन मिस्टिक्स या नांवानें प्रसिद्ध आहेत. खलील जिब्रान हा याच खिश्चन मिस्टिक्समधील एक साक्षात्कारी पुरुष होता. तो म्हणतो, "Religion? What is it? I know only life. Life means the field, the vine-yard and the loom" जीवन आणि जीवनांतील सारें कर्म हाच त्याचा धर्म होता. हें सारें जीवन एकात्म आहे, अशी त्याची धारणा होती. सारें दृश्य विश्व त्या जीवनसागरावरील उसळते तरंग होत, अशी त्याची जीवनदृष्टि होती. व्यक्तीचा बिन्दु विश्वाच्या सिन्धूमधून निघाला आहे आणि सिन्धूंतच विलीन होणारा आहे, असें त्याचें जीवनदर्शन होतें. तो म्हणतो, 'The Church is within you. You yourself are your priest. All that is worth while is a free spirit.' कोणत्याहि बाह्य प्रलोभनानें विचलित न होणारें व अंतरींच्या कोठल्याहि उर्मीनें न झाकोळणारें मुक्त मानस हीं व्यक्तीच्या विकासांतील अत्यंत उच्च अवस्था होय. असा मुक्त आत्मा निर्माण करणें हेंच धर्मभावनेचें कार्य आहे. असा मुक्त पुरुष हृदयांतील विश्वप्रेमानें परिपूर्ण झालेला असतो आणि त्याचे हात बाह्य विश्वांत कल्याणनिर्मितीच्या कार्यांत सदैव गुंतलेले राहतात. खलील जिब्रानचा धर्म या जातीचा होता. हा धर्म मानवी समाजाला आवश्यक आहे. रूढ धर्मसंस्थांबद्दल तसें म्हणतां येणार नाहीं.

## नांवांत काय आहे ?

'बंडखोर आत्मे' या पुस्तकांत खलील जिब्रानचा जीवनाचा सर्वांगीण क्रांतिवाद कसा प्रगटला आहे, हें आपण आतांपर्यंत पाहिलें. साहित्यांतील तंत्रविशारद असा प्रश्न उपस्थित करतील कीं, या कथांना कथा म्हणतां येईल काय? या प्रश्नाचें उत्तर देण्याची मला मुळींच जरूरी वाटत नाहीं. या कृतींना कोणतें नांव द्यावयाचें हा प्रश्न माझ्या दृष्टीनें अप्रस्तुत व असमंजसपणाचा आहे. हें उच्च प्रकारचें साहित्य आहे, याविषयीं माझी खात्री पटली आहे. यांत जिव्हाळा आहे, जिवंतपणा आहे, जीवनाचे खोल प्रश्न रोचकतेनें गळीं उतरविण्याचें सामर्थ्य आहे, सामाजिक जनतेला उलथून पाडण्याची क्रांतिकारक शक्ति यांतून प्रतीत झालेली आहे. यांच्या वाचनानें केवळ करमणूक होणार नाहीं. जीवनाची दृष्टि मिळेल, स्फूर्ति मिळेल आणि पुरुषार्थाला अवश्य लागणारी प्रेरणाहि लाभेल. महाराष्ट्राला या साऱ्या गोष्टी या ग्रंथापासून मिळतील अशी मला उमेद आहे.*

---

* कोल्हापूरच्या 'महाराष्ट्र ग्रंथभांडारा'तर्फे लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या 'बंडखोर आत्मे' या पुस्तकाची प्रस्तावना.

आणि जिझिया कर वसूल करण्यासाठीं आला होता. परंतु जेव्हां मी त्याच्या दृष्टीस पडल्यें, तेव्हां तो मजकडे भयानक अभिलाषेनें पाहूं लागला. त्यानें माझ्या वडिलांकडून कराची फार मोठी रक्कम येणें काढली. माझे गरीब वडील ही रक्कम देऊं शकत नव्हते म्हणून त्या अंमलदारानें क्रुद्ध होऊन त्या पैशाच्या ऐवजीं अमीराच्या झनानखान्यांत भरती करण्यासाठीं मलाच ताब्यांत घेतलें. मी रडून त्याच्याकडे दयेची याचना केली. परंतु त्याला दया आली नाहीं. वडिलांच्या म्हातारपणाकडे तरी बघ, म्हणून मी त्याची प्रार्थना केली. पण त्यानें तें ऐकलें नाहीं. मी मोठमोठ्यानें आकांत करून गांवच्या लोकांसमोर माझें गाऱ्हाणें मांडलें. त्याबरोबर ज्याच्याशीं माझा वाङ्‌निश्चय झालेला होता, तो हा तरुण पुढें आला आणि त्यानें मला अंमलदाराच्या तावडींतून सोडविलें. अंमलदारानें रागानें बेभान होऊन त्याला ठार मारण्याचा प्रयत्न केला. परंतु हा तरुण त्यांतून बचावला. नंतर त्यानें भिंतीला टांगलेली जुनाट तलवार काढून घेऊन स्वतःवरील हल्ल्याच्या प्रतिकारासाठीं आणि माझी इभ्रत वांचविण्यासाठीं त्या अंमलदाराला ठार केलें आणि सत्याच्या प्रतिष्ठेसाठीं तो त्या अंमलदाराच्या प्रेताजवळ उभा राहिला. नंतर शिपायांनीं त्याला गिरफदार करून तुरुंगांत टाकलें. ''

इतकें बोलून तिनें मजकडे हृदयद्रावक नि प्रभावकारक नजरेनें पाहिलें आणि घाईघाईनें पाठ फिरवून ती निघून गेली. तिचा करुण स्वर तेथील वातावरणांत घुमत राहिला.

थोड्या वेळानंतर एक तरुण येत असलेला मला दिसला. त्यानें आपला चेहरा कपड्यानें झांकलेला होता. तो त्या व्यभिचारिणीच्या प्रेताजवळ जाऊन थांबला. त्यानें आपल्या अंगांतील लांब सदरा काढून त्यानें त्या नग्न स्त्रीचें शरीर झांकून टाकलें आणि आपल्या खंजीरानें तो जमीन खोदूं लागला. कबर तयार होतांच त्यानें त्या स्त्रीला तिच्यांत पुरून टाकलें. एवढें काम पुरें झाल्यानंतर त्यानें इकडून तिकडून कांहीं फुलें गोळा करून त्यांचा गुच्छ बनविला आणि तो त्या थडग्यावर ठेवून दिला...जेव्हां तो परत जाऊं लागला तेव्हां मी त्याला थांबवून विचारलें, "तुझा या स्त्रीशीं असा काय संबंध होता कीं, ज्यासाठीं अमीराच्या मर्जीविरुद्ध आणि स्वतःचा जीव धोक्यांत घालून तूं इतकी तसदी घेतलीस आणि तिचें शरीर कावळ्यांचें नि घारींचें भक्ष्य बनूं नये म्हणून व्यवस्था केलीस ! ''

तरुणानें मजकडे पाहिलें. तो खूपच रडला असावा आणि सारी रात्र त्यानें जागून काढली असावी, असें त्याच्या डोळ्यांवरून दिसत होतें. तो अत्यंत दुःखपूर्ण व थरथरत्या आवाजांत म्हणाला, "ज्याच्यापायीं या बिचारीला संगसार व्हावें लागलें, तोच मी दुर्दैवी प्राणी. आम्ही लहानपणीं एकत्र खेळत–बागडत असूं. त्या वेळेपासूनच आमचें एकमेकांवर प्रेम होतें. पुढें आम्ही वयांत आलों आणि आमच्या प्रीतीलाहि बहर आला. परंतु एकदां मी परगांवीं गेलों असतां मुलीच्या बापानें बळजबरीनें तिचें लग्न दुसऱ्या एका माणसाशीं लावून दिलें. मी परत येऊन जेव्हां ही बातमी ऐकली, तेव्हां मला असें वाटूं लागलें कीं आतां आपलें जीवन वैराण झालें. मला जगणेंसुद्धां अवघड वाटूं लागलें. मी माझ्या स्वाभाविक प्रवृत्तींशीं युद्ध करूं लागलों. परंतु त्यांत मी पराभूत झालों आणि एखाद्या डोळस माणसानें आंधळ्या माणसाचा हात धरून त्याला वाट दाखवावी, त्याप्रमाणें माझें प्रेम मला घेऊन निघालें. आपल्या प्रियतमेच्या नेत्रांचें सौंदर्य पहावें आणि तिचा मधुर स्वर ऐकावा या हेतूनें मी लपत छपत तिच्या घरीं गेलों. त्यावेळीं ती एकटीच घरीं होती. ती आपल्या नशिबाच्या नांवानें खडे फोडीत होती आणि आपल्या जन्माचें वाटोळें झाल्याबद्दल शोक करीत होती. मी तिच्याजवळ बसलों. आम्ही शांतपणें बोलण्यांत गुंग झालों होतों आणि ईश्वर साक्षी आहे कीं आमचीं अंतःकरणें पवित्र होतीं. परंतु एका तासानंतर तिचा नवरा अचानकपणें त्या ठिकाणीं आला. त्यानें जेव्हां मला तिथें पाहिलें, तेव्हां तो रागानें अगदीं वेडा झाला. त्यानें त्या स्त्रीच्या गळ्याला कपडा बांधून जोरजोरानें आरडाओरडा करण्यास सुरुवात केली कीं, "लोकहो ! या आणि ह्या कुलटेला नि तिच्या जाराला प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहा ! '' त्याबरोबर शेजारीपाजारी गोळा झाले आणि थोड्याच वेळांत पोलिसांना बातमी लागतांच

तेंहि येऊन हजर झाले. त्या माणसानें आपल्या बायकोला पोलिसांच्या कठोर हातीं दिलें, तेव्हां ते तिला फरफटत पोलिस चौकीकडे घेऊन गेले. परंतु कोणीहि माझ्या केसाला देखील धक्का लावला नाहीं; कारण आंधळा कायदा आणि नीच रूढि हीं फक्त स्त्रीच्याच मागें हात धुऊन लागतात आणि पुरुषाला मात्र सर्व कांहीं माफ असतें. ''

ही हकीगत सांगून झाल्यानंतर तो तरुण आपलें तोंड झाकून घेऊन शहराकडे गेला आणि मी झाडाच्या फांदीला लोंबकळत असलेल्या त्या प्रेताकडे पहात राहिलों. वाऱ्याच्या झोतामुळें झाडाच्या फांद्या हलूं लागल्या कीं तें प्रेतहि हलूं लागे. त्या ओसाड मैदानांतील आत्म्यांकडे जणूं तें दयेची याचना करीत होतें. आपल्याला झाडावरून खालीं काढून शीलरक्षणासाठीं झगडत मेलेल्या व प्रेमासाठीं हुतात्म्याचें मरण पत्करलेल्या त्या लोकांच्या शेजारीं पुरण्यांत यावें, अशीच जणूं तें आपली इच्छा प्रदर्शित करीत होतें.

सुमारें तासाभरानें एक अत्यंत मरतुकडी बाई तेथें आली. तिच्या शरीरावरील कपड्यांच्या अगदीं चिंध्या झाल्या होत्या. झाडाला टांगलेल्या प्रेताजवळ येऊन ती थांबली आणि मोठमोठ्यानें आक्रोश करून तिनें आपलें हृदय हलकें केलें. नंतर ती झाडावर चढली, आणि तिनें आपल्या हातांनीं ती रेशमी दोरी सोडली. ओल्या कपड्याप्रमाणें तें प्रेत जमिनीवर कोसळलें. ती स्त्री झाडावरून खालीं उतरली आणि तिनें दोन थडग्यांमध्यें एक तिसरें थडगें तयार केलें आणि तें प्रेत त्यांत दफन केलें. जेव्हां थडग्यावर माती सारण्याचें काम संपलें, तेव्हां तिनें लाकडाच्या दोन काटक्या घेऊन त्यांचा क्रूस बनविला आणि तो थडग्याच्या उशाशीं पुरला. जेव्हां ती परत जाऊं लागली, तेव्हां मी पुढें होऊन तिला विचारलें, '' हे स्त्रिये, अशी कोणती गोष्ट घडली कीं ज्यामुळें तुला येथें येऊन एका चोराला मूठमाती द्यावी लागली ? ''

त्या बाईनें मजकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत चिंता आणि विचारमग्नता दिसून येत होती. ती म्हणाली, '' हा मनुष्य माझा नवरा, माझ्या आयुष्याचा सोबती आणि माझ्या मुलांचा बाप आहे. आमचीं पांच मुलें भुकेनें मरत आहेत. त्यांतील सर्वांत मोठा आठ वर्षांचा आणि सर्वांत लहान अद्यापि अंगावर पिणारा आहे. माझा नवरा चोर नव्हता. तो चर्चच्या जामिनींत शेतीभाती करीत असे. चर्चमधील पाद्री लोक त्याच्या कामाबद्दल फार थोडी मजुरी देत असत; ती इतकी कीं जर आम्हीं रात्रीं पोटभर जेवलों, तर सकाळीं आमच्याजवळ कांहींच शिल्लक उरत नसे. त्यावेळीं माझा नवरा अगदीं तरणाबांड होता. तो चर्चच्या जामिनींतील झाडांना आपल्या निढळाच्या घामानें पाणी देत असे आणि आपल्या बाहूंतील शक्ति खर्च करून चर्चची बाग नेहमीं हिरवीगार व टवटवीत ठेवीत असे. परंतु जेव्हां तो म्हातारा झाला आणि वर्षोनुवर्षे केलेल्या मेहनतमुळें त्याची सर्व शक्ति नष्ट झाली नि त्याला रोगांनीं घेरलें तेव्हां चर्चमधील पाद्र्यांनीं त्याला नोकरीवरून काढून टाकलें. ते त्याला म्हणाले, '' चर्चला तुझ्या नोकरीची आतां गरज नाहीं. तूं आतां निघून जा. तुझे मुलगे मोठे झाले कीं, त्यांना इकडे पाठवून दे. म्हणजे ते तुझ्या जागीं काम करूं लागतील.'' माझा नवरा त्यांच्यासमोर खूप रडला—भाकला. येशु ख्रिस्ताचें नांव घेऊन आपल्यावर दया करण्याची त्यानें त्यांना विनंति केली आणि त्यांना देवदूतांच्या व येशूच्या सहकाऱ्यांच्या शपथा घातल्या. परंतु त्यांनीं त्याच्यावर दया केली नाहीं. किंवा मजवर अथवा आमच्या मुलांबाळांवरहि मेहेरबानी केली नाहीं.

'' एखादी नोकरी मिळाल्यास पहावी म्हणून माझा नवरा शहरांत गेला; पण निराश होऊन परत आला. कारण मोठमोठ्या हवेल्यांतून राहणारे लोक फक्त धट्टयाकट्टया नि तरुण लोकांनाच नोकरीस ठेवतात. नंतर तो येणाऱ्याजाणाऱ्यांकडून कांहीं भिक्षा मिळेल, या आशेनें सडकेवर बसला. परंतु त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. कारण लोक म्हणत असत कीं ' जो आजपर्यंत गृहस्थाश्रमांत वाढला आहे अशा माणसाला दान देणें हें धर्मांत निषिद्ध समजलें गेलें आहे. '

'' अखेर अशी एक रात्र येऊन ठेपली कीं, जेव्हां आमचीं मुलें भुकेनें व्याकुळ होऊन जमिनीवर तडफडूं लागलीं. माझा तान्हा मुलगा माझे स्तन चोखत होता. परंतु त्यांत दूधच नव्हतें. हें दृश्य



अनुक्रमणिका






पाहून माझ्या नवऱ्याचा चेहरा पालटला आणि तो गडद अंधारांत लपत छपत निघाला नि चर्चच्या अन्नवस्त्राच्या भांडारांत घुसला. त्या ठिकाणीं पाद्री लोक आपलें धान्य आणि दारू सांठवून ठेवतात. माझ्या नवऱ्यानें एका झोळींत धान्य भरून ती खांद्यावर टाकली व तो बाहेर पडूं लागला. परंतु कांहीं पावलें जातो न जातो, तोंच पहारेकरी जागे झाले आणि त्यांनीं त्या बिचाऱ्याला पकडलें. शिवी-गाळी देऊन नि मारपीट करून त्यांनीं त्याची अगदीं दुर्दशा केली. सकाळ होतांच त्यांनीं त्याला पोलिसांच्या ताब्यांत दिलें आणि सांगितलें कीं 'हा चोर आहे. चर्चमधील सोन्याचीं भांडी चोरण्या-साठीं काल रात्रीं हा येथें आला होता.'

पोलिसांनीं त्याला तुरुंगांत टाकलें. त्यानंतर गिधाडांनीं याचें मांस खाऊन आपली भूक भागवावी या हेतूनें त्याला या झाडाला टांगण्यांत आलें; आणि याचें कारण काय ? तर त्यानें चर्चची नोकरी करीत असतां स्वतःच्या बाहुबळानें जें धान्य पिकाविलें होतें, तें धान्य आपल्या उपाशीं मरणाऱ्या मुलाबाळांना खाऊं घालण्याचा त्यानें प्रयत्न केला.''

इतकें बोलून ती गरीब बाई निघून गेली. परंतु तिच्या हकीगतीनें सगळें वातावरण विषादमय झालें. असें वाटत होतें कीं जणूं तिच्या तोंडांतून धुराचे ढग निघून वातावरणामध्यें दुःखाची छाया पसरवीत आहेत.

मी त्या थडग्यांजवळ उभा राहिलों. त्याच्या मातीच्या कणाकणांतून गाऱ्हाण्याचे सूर ऐकूं येत होते. मी उम्याउम्या विचार करीत होतों कीं जर या मैदानांतील झाडांना माझ्या हृदयांतील आगीची ज्वाला स्पर्श करील, तर हीं झाडें सजीव होतील व आपली जागा सोडून अमीर त्याचे शिपायी यांच्याशीं लढूं लागतील आणि चर्चच्या भिंती जमीन-दोस्त करून त्याखालीं पाद्र्यांना गाडून टाकतील.

मी त्या नवीन थडग्यांकडे पहात होतों. माझ्या डोळ्यांतून सहानुभूतीचें माधुर्य आणि दुःखाचा व शोकाचा कडवटपणा पाझरत होता.

हें एका तरुणाचें थडगें आहे. यानें एका असहाय स्त्रीच्या शीलाचें रक्षण करण्यासाठीं स्वतःचें बलिदान दिलें. यानें एका स्त्रीला लांडग्याच्या ताव-डींतून सोडविलें आणि त्याच्या या बहादुरीबद्दल त्याचें डोकें उडविण्यांत आलें ! त्या स्त्रीनें आपल्या रक्षणकर्त्याच्या थडग्यावर तलवार पुरली आहे ! ती त्याच्या शौर्याचें सूचन करिते.

हें एका तरुण स्त्रीचें थडगें आहे. हिचें अस्तित्व नाहींसें केलें जाण्यापूर्वीं ही प्रेमाची एक मूर्ति होती. हिला संगसार करण्यांत आलें. कारण ती अखेरपर्यंत पवित्र राहिली. हिच्या प्रियकरानें हिच्या थडग्यावर फुलांचा एक गुच्छ ठेवलेला आहे. तो प्रेमाच्या सुवासाचें सूचन करतो.

आणि हें त्या दुर्दैवी गरीबाचें थडगें आहे, जो आपल्या मनगटांत ताकत असेपर्यंत चर्चची शेती-वाडी करीत होता. त्याच्या शरीरांतील शक्ति नाहींशी होतांच त्याला हाकून लावण्यांत आलें. तो कामधंदा करून आपल्या मुलाबाळांचें पोट भरूं इच्छीत होता. परंतु त्याला काम मिळालें नाहीं. म्हणून त्यानें भीक मागण्यास सुरुवात केली. परंतु त्याला कोणींहि भीक घातली नाहीं. अखेर शेवटीं जेव्हां त्याची निराशा पराकोटीला जाऊन पोहोंचली, तेव्हां त्यानें स्वतःचा घाम गाळून आणि हाडाचीं काडें करून उत्पन्न केलेल्या धान्यांतून थोडेसें धान्य घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला पकडण्यांत आलें आणि त्याचा जीव घेतला गेला. त्याच्या पत्नीनें त्याच्या थडग्यावर क्रूस बनविला आहे. त्यामुळें रात्रीच्या शांत वेळीं आकाशांतलि तारे, येशू ख्रिस्ताच्या शिकवणुकीचा प्रचार करीत असल्याचा दावा कर-णाऱ्या परंतु वस्तुतः दुःखी आणि दुबळ्या लोकांचीं डोकीं तलवारीनें छाटून टाकण्याचेंच कार्य करीत असणाऱ्या पाद्र्यांचा जुलूम व अत्याचार पाहतील.

सूर्य क्षितिजावर पलीकडे लपत होता. जणूं मानवाचे अन्याय व अत्याचार पाहून तो अगदीं त्रासून गेला होता व मानवासंबंधीं त्याच्या मनांत किळस उत्पन्न झाली होती. संध्याकाळ आपल्या बुरख्यामध्यें सगळ्या जगाला झांकून टाकीत होती. मी वर आकाशाकडे पाहिलें आणि त्या थडग्यांच्या रहस्यांच्या नांवानें हात चोळीत जोरांत ओरडून म्हणालों, "हे बहादूर वीरा, ही पहा तुझ्या थडग्यावर पुरलेली तुझी तलवार ! हे स्त्रिये, ज्यांतून प्रेमाचे किरण निघत आहेत, अशीं ही तुझीं फुलें पहा ! आणि हे प्रभु येशु, रात्रीच्या अंधारांत पुसट होत जाणारा हा तुझा क्रूस पहा ! ''








# माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

## महर्षि धोंडो केशव कर्वे

परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्। हा माझा धर्म. सार्वजनिक कार्याची हौस ही माझी प्रेरक शक्ति.

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णाः
त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयन्तः।
परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यम्
निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः[1] ॥

असे सत्पुरुष आणि

जो सर्वा भूतांचे ठायीं। द्वेषातें नेणेचि कांहीं।
आपपर जया नाहीं। चैतन्या जैसें ॥
कीं गाईची तृषा हरूं। व्याघ्रा विष होऊनि मारूं।
ऐसें नेणेचि गा करूं। तोय जैसें[2] ॥

असे स्थितप्रज्ञ—हे होकायंत्राप्रमाणें आचरणाची दिशा दाखविणारे. " आकाशावर नेम धर म्हणजे तुझा बाण झाडापर्यंत तरी जाईल, " ह्या उपदेशाप्रमाणेंच वरील ध्येयवचनें मी मार्गदर्शक ठरविलीं होतीं.

### सार्वजनिक कार्याचें बाळकडू

माझी बुद्धि बऱ्यापैकी पण ती खोल पाहणारी, मूलग्राही नाहीं. माझें वाचन बेतावाताचें. श्रवण फारच थोडें. मननही फारसें नाहीं. निदिध्यास, हातीं असलेल्या सार्वजनिक कार्याचें पाऊल पुढें कसें पडेल—ह्याबद्दल. माझा आयुष्यक्रम इतरांहून थोडासा भिन्न. बाराव्या वर्षीं माझा मराठी शाळेंतील अभ्यासक्रम संपला. त्याच्या आधीं एक वर्ष सोमण-मास्तर ट्रेनिंग कॉलेजांतील पहिल्या प्रतीची परीक्षा देऊन प्रथमच आमच्या शाळेंत हेडमास्तर होऊन आले. वर्तमानपत्राच्या वाचनानें त्यांनीं नवीन विचार आत्मसात् केले होते. त्यांच्याकडे मी अभ्यासाला जात असें व त्यांचें इतरांशीं अनेक विषयांवर संभाषण होई, तें मी ऐकत असें. मी पांचसहा वर्षें आमच्या मुरुड गांवीं रिकामाच होतों. ह्या मुदतींत सोमणमास्तरांनीं मला सार्वजनिक कार्याचें बाळकडू पाजलें व आपल्या देखरेखीखालीं दोन धडे शिकविले. गांवांतील मुख्य देवळांत लोक दर्शनासाठीं जात, त्यावेळीं त्यांना वर्तमानपत्रें वाचून दाखविण्याचें काम त्यांनीं मजकडून करून घेतलें; व गांवांतील लोकांकडून पांच रुपयांचा एक भाग ( शेअर Share )—याप्रमाणें पांच-सहाशें रुपयांच्या भांडवलाच्या दुकानाचा बिनपगारी दुकानदार म्हणून मजकडून काम करवून घेतलें. मी १८ व्या वर्षी इंग्रजी शिकूं लागलों. २४ व्या वर्षी मॅट्रिक्युलेशन व २७ व्या वर्षी बी. ए. झालों.

बाराव्या वर्षींच मुंबईंत झालेल्या पुनर्विवाहाची इंदुप्रकाशांत आलेली चटकदार हकीकत वाचल्यानें मजमध्यें विधवांविषयीं व विधवाविवाहाविषयीं सहानुभूति उत्पन्न झाली. माझे मित्र, सहाध्यायी व हल्लींचे मेहुणे नरहरपंत जोशी यांना मिल, हर्बर्ट स्पेन्सर यांच्या ग्रंथांची गोडी लागली व त्यांच्या सहवासानें माझे विचार बुद्धिवादी बनूं लागले. ह्या

( १ ) हा श्लोक १९१५ त प्रसिद्ध झालेल्या आत्मवृत्ताच्या पहिल्या आवृत्तींत दिला आहे. ( २ ) त्या आवृत्तींत स्थितप्रज्ञाचें लक्षण संस्कृत श्लोक उद्धृत करून दिलें आहे. येथें त्याचेंच ज्ञानेश्वरींतील लक्षण दिलें आहे.








विचारांना, पुढें आगरकरांचा सहवास लाभल्यानें, पुष्टि मिळाली.

## मुरुड फंड

माझें शिक्षण प्रौढपणींच झाल्यानें विचारांना कृतीचें स्वरूप देण्याचे प्रयत्न विद्यार्थिदशेंतच सुरू झाले. हायस्कुलांत स्कॉलरशिप मिळाली किंवा त्यावेळीं शिकवणीचे पैसे हातीं आले, तर दर रुपयास एक पैसा याप्रमाणें मी वेगळे काढून ठेवण्यास सुरवात केली. ह्या पैशाचा उपयोग एकाद्या सत्कार्याकडे करावयाचा, हा हेतु होता. आमच्या मुरुड गांवाच्या हितासाठीं मुरुड फंड ही संस्था काढण्याचा विचार, मी मॅट्रिक्युलेशनच्या वर्गांत असतानांच, माझ्या मनांत आला. एका मित्राच्या व माझ्या सहीचीं पत्रें आधीं दूर ठिकाणीं नोकरी करीत असलेल्या अनेक ग्रामस्थांस पाठविलीं. पण कोणीच उत्तेजन न दिल्यामुळें तें काम तसेंच राहिलें. पुढें बी. ए. झाल्यावर दोन वर्षांनीं तें काम पुन्हा हातीं घेतलें व त्या कामीं चांगलें यश आलें. या फंडाचा निधि सुमारें वीस हजार झाला असून त्या फंडाचा हीरकमहोत्सव गेल्या मे महिन्यांत झाला. त्यासाठीं मी मुद्दाम मुरुडगांवीं गेलों होतों.

## स्नेहसंवर्धक मंडळ

मुरुड फंडाचें काम करीत असतांनाच आपल्या दापोली तालुक्यासाठीं कांहीं करावें, असें मनांत आलें व मी तालुक्यांतील सुशिक्षित लोकांशीं व तालुक्यांतील नोकरीसाठीं दूर गेलेल्या लोकांशीं पत्रव्यवहार करून स्नेहसंवर्धक मंडळ स्थापन केलें. नोकरीवर असलेले बरेच लोक मे महिन्याच्या सुटींत आपापल्या गांवीं येत. अशा लोकांनीं तालुक्यांतील एका गांवीं एक रात्र व एक दिवस एकत्र घालवावा व परस्परांत दळणवळण उत्पन्न होऊन विचारविनिमय व्हावा, असा ह्या मंडळाचा हेतु होता. तीन वर्षें मंडळाच्या सभा तीन गांवीं चांगल्या पार पडल्या. चवथ्या वर्षीं माझा पुनर्विवाह झाल्यानंतर मी त्या सभेला गेलों. मला भोजनगृहांत येऊं न देतां शेजारच्या घरीं माझ्या जेवणाची सोय केली. मला सभेंत बसूं देण्यास थोडे लोक अनुकूल होते. पण अखेरीस सभा न होतांच सर्व लोक आपापल्या गांवीं गेले. पुढच्या वर्षीं एक सभा माझ्यावांचून झाली व पुढें ती संस्था कोणी चालविण्यास न मिळाल्यामुळें लयास गेली.

## आमचें संयुक्त कुटुंब

मला अमुक एक कार्य करावयाचें आहे, असा माझा निश्चय कधींच झाला नाहीं. परिस्थिति बदलली व नवीन अनुभव आले कीं, नवीं कार्यें माझ्या मनाची पकड घेत व नवीं नवीं कार्यें मी हातीं घेत असें; मात्र पूर्वींचीं कार्यें लयाला जाऊं नयेत म्हणून मी काळजी घेत आलों आहे. मी हातीं घेतलेल्या कार्यांची कल्पना येण्याला माझ्या आयुष्यक्रमाचें थोडें सिंहावलोकनच केलें पाहिजे. मी मुंबईंत स्थायिक झाल्यावर मला बरे पैसे मिळूं लागले व माझ्या काटकसरी वृत्तीमुळें उरलेल्या पैशाचा सदुपयोग करण्याचें मी योजिलें. माझ्या गरीबीमुळें माझ्या शिक्षणांत अडचणी आल्या. त्यांची जाणीव असल्यामुळें कांहीं विद्यार्थ्यांना मदत करण्याचें मी ठरविलें. एक मामेभाऊ—पुढें रँग्लर परांजपे झाले ते, एक पहिल्या संबंधाचा मेहुणा, एक भावाचा जांवई व एक शेजारच्या गांवचा वन्यापैकीं मुलगा—असे चार विद्यार्थी आमच्या संयुक्त कुटुंबांत घेतले. नरहरपंत, त्यांची बायको व दोघे भाऊ, मी, माझी बायको व मुलगा असें आमचें संयुक्त कुटुंब होतें. ही परिस्थिति अशीच चालूं राहती, तर कदाचित् माझें मुंबईस राहणें झालें असतें व हीं मुलें मार्गाला लागल्यावर दुसरीं घेतलीं असतीं. पण परिस्थिति एकदम बदलली.

## विधवाविवाहप्रतिबंधनिवारकमंडळी

बी. ए. झाल्यावर सात वर्षें मी मुंबईंत काढलीं. शेवटल्या चार महिन्यापूर्वी माझी प्रथम पत्नी वारली. तरी संयुक्त कुटुंब चालू होतें. माझी पत्नी वारल्यावर विधवा मेहुणी संयुक्त कुटुंबाच्या मदतीस आली. अशा स्थितींत अगदीं ध्यानींमनीं नसतां प्रो. गोखले यांनीं मला फर्ग्युसन कॉलेजांत गणितविषयाच्या अध्यापकाचें काम करण्यास बोलाविलें व सर्व मुलांसह मी पुण्यास येऊन राहिलों व स्वतः विधवेशीं लग्न करून विधवाविवाहाचें कार्य हातीं घेतलें. विधवाविवाहप्रतिबंधनिवारकमंडळी








स्थापन केली व तिच्यासाठीं सारखा अडीच-वर्षे झटलों. कॉलेजला सुटी झाली म्हणजे फिरतीवर जावें, व्याख्यानें द्यावीं, फंड जमवावा, असा क्रम चालत होता. पण शेवटीं असें दिसून आलें कीं, हा प्रश्न धार्मिक असल्यामुळें तो सुटणें कठीण आहे. सुशिक्षित विधुर त्या कामीं पाऊल टाकायला भितो; तेव्हां अशिक्षित विधवेला पुढें यायला धैर्य कसें यावें ? अशा स्थितींत आपलें सर्व सामर्थ्य ह्या कामीं खरचण्यापेक्षां तें विधवा–शिक्षणाच्या कामीं खर्च केलें, तर बरें होईल असें वाटून मी विधवाशिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला व अनाथबालिकाश्रमाच्या संस्थेवर विशेष भर दिला. विधवाविवाहाची संस्था बंद न करितां मी तिचा सात वर्षे चिटणीस राहिलों व पुढें ती संस्था प्रो. भाटे ह्यांचे हवालीं केली. त्या संस्थेचें हल्लींचें नांव विधवाविवाहमंडळ असें आहे. **ह्या संस्थेचा सुवर्णमहोत्सव दोन वर्षांपूर्वी साजरा झाला** व आतां ह्या संस्थेच्या मालकीचें घर नातूंच्या बागेंत बांधलें असून संस्थेचें काम चांगलें चाललें आहे.

## अनाथबालिकाश्रम व महिलाविद्यालय

विधवाविवाहाचा प्रश्न सोडवीत असतां विधवा–शिक्षणाच्या प्रश्नाकडे माझें मन वळलें; व हिंगणें–बुद्रुक येथें आश्रमाची स्थापना झाली. आश्रमाचें काम चांगल्या रीतीनें चालूं लागलें. व संस्थेंत ५७ विधवा व १९ अविधवा अशा विद्यार्थिनी झाल्या. बहुतेक विधवा गरीब असून आश्रमावरच अवलंबून असत. अविधवा विद्यार्थिनी मात्र स्वतःचा खर्च देऊन येत. आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीनें आग्रह धरला कीं, अविधवा विद्यार्थिनींची संख्या एकंदर विद्यार्थिनींच्या संख्येच्या चतुर्थांशापेक्षां अधिक असूं नये. कुमारिकांच्या शिक्षणाकडेहि माझें मन ओढ घेऊं लागलें होतें. विशेषतः त्यांच्या लग्नाच्या वयाची मर्यादा पुढें ढकलल्याशिवाय त्यांच्या शिक्षणाला पुरेसा वाव मिळणार नाहीं, हे विचार मनांत येऊन, मी आपल्याच जबाबदारीवर पुणें शहरांत महिलाविद्यालयाची संस्था काढली. आश्रमाची जबाबदारी मजवर होतीच. पण विद्यालयासाठींहि मी निधि जमवूं लागलों. त्यांतच आणखी ब्रह्मचर्य-फंड म्हणून काढला. जीं गरीब आईबापें, आपल्या मुली, त्यांचें वीस वर्षांचें वय होईपर्यंत त्यांची लग्नें करावयाचीं नाहींत या अटीवर, महिलाविद्यालयाच्या स्वाधीन करण्यास तयार असतील, त्यांच्या मुली विद्यालयानें ताब्यांत घेऊन त्यांचा खर्च विद्यालयानें ह्या फंडांतून करावयाचा. अशी अट न पत्करितां खर्च देऊन येणाऱ्या मुलीही विद्यालयांत घेतल्या जात. विद्यालयांतील मुलींची संख्याही वाढूं लागली व आश्रमाशेजारीं जागा घेऊन इमारत बांधून तींत विद्यालय नेण्यांत आलें.

## निष्कामकर्ममठ

विद्यालय सुरू झाल्यानंतर वर्षदीडवर्षानेंच 'निष्कामकर्ममठ' या नांवाची संस्था मी सुरू केली. ह्या संस्थेचा हेतु आश्रम–विद्यालयासारख्या संस्था चालविण्यास योग्य अशीं माणसें तयार करणें, हा होता. आश्रमांत शिकणाऱ्या कांहीं विद्यार्थिनींचीं मनें मी ह्या मठाचे घटक होण्यासाठीं वळविलीं. शिक्षण पुरें झाल्यावर काम करूं लागावयाचें, तेव्हां पगार न घेतां सर्वांनीं एका कुटुंबाप्रमाणें रहावयाचें व प्रत्येकीला थोडा किरकोळ खर्चासाठीं पॉकेटमनी म्हणून द्यावयाचा. मी स्वतः, विद्यालयांत काम करणारीं दोन पतिपत्नींचीं जोडपीं, व सहासात विद्यार्थिनी अशांचा हा मठ होता. आश्रम व विद्यालय या दोन संस्था शेजारीं शेजारीं पण अगदीं स्वतंत्रपणें दोन वर्षे काम करीत होत्या. दोन शाळा वेगळ्या, दोहोंचे शिक्षक वेगळे, असा प्रकार चालला होता. शेवटीं आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीनें आपला आग्रह सोडला व विद्यालयाचा अंतर्भाव आश्रमांत करून घेतला. मठाचें ध्येय साध्य होणें कठीण म्हणून मठाची कल्पना सोडून देऊन मठाचे घटक आश्रमाचे आजीव सेवक झाले. ह्या रीतीनें महिला-विद्यालय व निष्कामकर्ममठ ह्या संस्था आश्रमांत विलीन होऊन गेल्या, आणि विधवांच्या शिक्षणाची संस्था असें आश्रमाचें स्वरूप होतें, तें सामान्यतः स्त्रियांच्या शिक्षणाची संस्था असें झालें.

गेल्या वर्षी संस्थेच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळीं त्या संस्थेचें ' हिंगणें स्त्रीशिक्षणसंस्था ' असें नवें नामकरण झालें. **हिंगण्याच्या माळावर एका लहान झोपडींत पांचसहा मुलींसह आश्रमाला सुरुवात झाली, तेथें आतां तीन लाखांच्या**








इमारती उभारल्या जाऊन पांचशें माणसांची वसाहत झाली आहे.

## महिलाविद्यापीठासाठीं पृथ्वीप्रदक्षिणा

ह्या सुमाराला मी फर्ग्युसन कॉलेजांतून सेवानिवृत्त होऊन मोकळा झालों; व पुढील वीस वर्षें माझें सर्व सामर्थ्य मला महिलाविद्यापीठ—म्हणजे स्त्रियांची युनिव्हर्सिटी—ह्या संस्थेच्या कामीं लावितां आलीं. जपानांतील स्त्रियांच्या युनिव्हार्सिटीचें १२ वर्षांचें इंग्रजी भाषेंतील इतिवृत्त वाचून आपल्या देशांत अशी संस्था असावी असें मनांत आलें व वयाच्या ५८ व्या वर्षी ह्या मोठ्या जबाबदारीच्या कामाला हात घातला. मुंबई येथें १९१५ च्या अखेरीस भरलेल्या राष्ट्रीय सभेनंतर त्याच मंडपांत भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत जपानांतील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या कार्याचा त्रोटक इतिहास देऊन लवकरच येथें महिलाविद्यापीठ स्थापन करण्याचा हेतु जाहीर केला; व लागलींच त्या उद्योगाला लागलों. विधवाविवाहाची संस्था व हिंगण्याचा आश्रम—ह्या संस्थांच्या प्रचारासाठीं व द्रव्यसाहाय्य मिळविण्यासाठीं मी महाराष्ट्रभर हिंडलों. पण महिलाविद्यापीठासाठीं कन्याकुमारीपासून पेशावरपर्यंत व कराचीपासून कलकत्त्यापर्यंत सगळ्या देशभर हिंडलों. बंगाल्यांत फक्त कलकत्त्यासच गेलों. पण बाकीचे इलाखे व संस्थानें ह्यांतील जिल्ह्यांच्या सर्व ठिकाणीं गेलों व प्रचार करून द्रव्यसाहाय्य मिळविलें. वयाच्या ७१ व्या वर्षी यूरोप, अमेरिका, जपान, चीन, जावा, मलाया, सेलिबीज आणि फिलिपाइन वगैरे देशांना भेटी देऊन तेरा महिन्यांत पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली. ह्यावेळीं माझा कनिष्ठ चिरंजीव बरोबर होता; व त्याच्या मदतीनेंच हें सर्व पार पाडतां आलें. नंतर ७३ व्या वर्षी पूर्व व दक्षिण आफ्रिकेंत १४ महिन्यांचा प्रवास एकट्यानेंच केला. माझा एक मुलगा मुंबासा येथें डॉक्टर होता व अजून तेथेंच आहे. त्याच्या ठिकठिकाणीं ओळखी असल्यामुळें माझी सर्व ठिकाणीं चांगली सोय झाली.

## महिलाविद्यापीठाची महत्त्वाची कामगिरी

मातृभाषेच्या अभ्यासाला प्रथम स्थान देऊन मातृभाषा हेंच शिक्षणाचें माध्यम असलें पाहिजे, हा महिलाविद्यापीठाचा कटाक्ष होता. उच्च शिक्षण देखील मातृभाषेंतून देण्याचा पहिला प्रयत्न हरिद्वारजवळील कांगडी येथील गुरुकुलानें केला. आपल्या देशांतील असा दुसरा प्रयत्न महिलाविद्यापीठानें केला. नंतर लवकरच दक्षिण हैद्राबादेंत उस्मानिया युनिव्हर्सिटींत उर्दू भाषा माध्यम करण्यांत आली. वास्तविक उर्दू ही येथील राज्यकर्त्यांची भाषा. लोकांची भाषा नव्हे. त्यानंतर राजकीय चळवळींतून निघालेल्या पुण्यांतील टिळक युनिव्हर्सिटी व अहमदाबादचें गुजराथ विद्यापीठ—ह्यांनीं मातृभाषेचें माध्यम सुरू केलें. महिलाविद्यापीठ सुरू झालें त्यावेळीं—म्हणजे १९१६ सालीं—सर्व सरकारमान्य युनिव्हर्सिट्यांतून व हायस्कूलांतून सुद्धां इंग्रजी माध्यम सुरू होतें. आतां ही सुधारणा मान्यता पावली आहे. महिलाविद्यापीठानें केलेली दुसरी महत्त्वाची सुधारणा म्हणजे चित्रकला, गायन-वादन व गृहशास्त्र—म्हणजे प्रपंचशास्त्र, आरोग्यशास्त्र आणि बालसंगोपन, ह्यांचा अभ्यासक्रमांत परीक्षेचे विषय म्हणून अंतर्भाव करणें ही होय.

महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराचा खाजगी प्रयत्न पहिल्यानें हिंगण्याच्या संस्थेनें केला व त्याला महिलाविद्यापीठानें जोड दिली. भारतामध्यें स्त्रियांचें मुख्य कर्तव्य सुगृहिणी व सुमाता—होणें ह्या दृष्टीनें शिक्षणाला निराळी दिशा लावण्याचा भारतामध्यें जोरदार प्रयत्न प्रथम महिलाविद्यापीठानें केला. मातृभाषेच्या द्वारें शिक्षण मिळत असल्यामुळें व शिक्षणांतील गणितविषयाचें महत्त्व कमी केल्यामुळें कितीतरी अधिक स्त्रियांना उच्च शिक्षण घेतां आलें. खाजगी रीतीनें अभ्यास करून परीक्षा देऊन पदवीधर होण्याची सोय महिलाविद्यापीठांत आहे. ४ कॉलेजें, शिवाय कॉलेज-शिक्षणाचे खाजगी वर्ग आणि महिला विद्यापीठाला जोडलेलीं २० हायस्कूलें—इतक्या संस्थांतून विद्यापीठाचा अभ्यासक्रम शिकविला जातो. आतांपर्यंत पदवीधर स्त्रिया एक हजार व मॅट्रिक्युलेशनच्या बरोबरीच्या प्रवेशपरीक्षा पास झालेल्या तीन हजार आहेत. बी. ए., एम्. ए. व बी. टी. ह्यांच्या बरोबरीच्या जी. ए. ( गृहीतागमा ), पी. ए. ( प्रदेयागमा ) व डी. टी. ह्या परीक्षांना सरकारी








व निमसरकारी नोकरींत बरोबरीचें स्थान सरकारनें दिलें आहे. ह्या विद्यापीठाला सनदशीर मान्यता देण्याचा प्रश्नही विचारांत घेतला जात आहे.

## महाराष्ट्रग्राम–प्राथमिकशिक्षणमंडळ

विद्यापीठावर आलेलें गण्डांतर टळून सर्व स्थिर-स्थावर झालें, त्यावेळीं मला ७८ वें वर्ष होतें. तेव्हां विद्यापीठाशीं जरूरीपुरता संबंध ठेवून मुख्य जबाबदारींतून मोकळें व्हावें, असें मी ठरविलें. परन्तु जबाबदारी तर फार नसावी, तरी अगदींच रिकामें न बसतां मनाजोगें कांहीं काम काढावें असें योजून महाराष्ट्रग्राम–प्राथमिकशिक्षणमंडळ ह्या नांवाची संस्था १९३६ च्या आरंभीं काढली. लहान लहान खेड्यांतून प्राथमिक शिक्षणाचा प्रसार व्हावा, हा या संस्थेचा हेतु होता. कोणत्याही प्रकारची शाळा नसलेल्या गांवांत खाजगी शाळा काढण्याचा कोणी प्रयत्न केला, तर त्याला संस्था मदत करी. अशा रीतीच्या ४० शाळा हल्लीं ह्या संस्थेच्या देखरेखीखालीं चालल्या आहेत. संस्थेला द्रव्यबळ मिळविण्यासाठीं एकादा स्वयंसेवक बरोबर घेऊन शहराच्या निरनिराळ्या पेठांतून दररोज सकाळीं मी दोन तास हिंडत असें व आण्याअर्धा-आण्यापासून मिळालेल्या मदतीचा स्वीकार करीत असें. काँग्रेस सरकारचें राज्य सुरू झाल्यावरोबर संस्थेच्या शाळांना सरकारी मदत मिळूं लागली. आज संस्थेचा निधि सोळासतरा हजार आहे.

## समतासंघ

' सोसायटी टु प्रमोट ह्यूमन ईक्वॅलिटी ' " मानवी समतेचें पुरस्कारमंडळ "—ही संस्था लंडन येथें १९३४ सालीं स्थापन झाली. माझे परिचित एक इंग्रज गृहस्थ ह्या संस्थेच्या उत्पादकां-पैकीं एक होते. ते मजकडे संस्थेचीं पत्रकें व त्रैमासिक पाठवीत असत. तीं मी नियमितपणें वाचीत असें. ग्रामशिक्षणसंस्थेचा जम चांगला बसला व भयंकर महागाईमुळें पुण्यांत घरोघर हिंडणें बंद करावें लागलें. तेव्हां ग्रामशिक्षणमंडळाचें काम मित्रांवर सोंपवून, ह्या लंडनच्या संस्थेच्या स्फूर्तीनें **समतासंघ नांवाची संस्था वयाच्या** ८६ व्या वर्षी १ जानेवारी १९४४ रोजीं सुरू केली. हल्लीं ह्या संस्थेचेंच काम मी करीत आहे. ह्या संस्थेच्या मुंबई व उपनगरें मिळून एक शाखा मुंबईस व महाविदर्भासाठीं दुसरी शाखा अकोला येथें–अशा दोन शाखा काम करीत आहेत. ' मानवी समता ' नांवाचें आठ पृष्ठांचें लहान मासिक संस्थेचें मुखपत्र म्हणून गेल्या जुलैपासून सुरू झालें आहे. सध्यां ह्या संस्थेच्या कामांतच माझें मन रमून जात आहे.

## माझे श्रम निमित्तमात्र

बाजारहाटासकट संसाराची सर्व जबाबदारी माझ्या पत्नीनें स्वीकारल्यामुळें मला सर्व वेळ सार्वजनिक कामांत घालवितां आला.

ज्यावेळीं जें जें कार्य हातीं असेल, त्यावेळीं सर्व लक्ष त्या कार्याकडे लावून तें चिकाटीनें करीत रहावें, असें मी करीत आलों आहे. आणि माझे श्रम फुकट न जातां फलद्रूप झाले, हें पाहून मला समाधान वाटत आहे. माझे श्रम निमित्तमात्र आहेत हें मी जाणतों. यशाचीं कारणें माझ्या श्रमाव्यतिरिक्त आहेत : तीं म्हणजे परिस्थिति, इतरांची मदत वगैरे.

**मी आशावादी ( optimist ) आहे.** एकंदरींत समाजाची प्रगतिच होत आहे व स्त्रीशिक्षणाचे परिणाम चांगलेच झाले आहेत, असें मला वाटतें. तुरळक व्यक्तींचें अनिष्ट वर्तन हा स्त्रीशिक्षणाचा परिणाम म्हणतां येणार नाहीं. महाराष्ट्राला व भारताला चांगले दिवस येतील, असें मला वाटतें.

## माझा मधला मार्ग

मी समाजकार्याला सर्वस्वीं वाहून घेतलें नाहीं. **संसारी मनुष्य आणि संन्यासी म्हणजे त्यागी मनुष्य ह्या दोघांच्या मधला मार्ग स्वीकारला.** मी संसार ' नेटका ' केला नाहीं. कसाबसा करीत राहिलों व अजूनही करीत आहे. कुटुंबासाठीं घरदार किंवा द्रव्यसंचयही मी केलीं नाहींत. डे. ए. सोसायटीची तीन हजारांची पॉलिसी होती. तरी वेडावांकडा प्रसंग आला असतां उपयोगी पडावी म्हणून आणखी पांच हजाराची केली. पण ती लवकरच हिंगण्याच्या आश्रमाला स्थैर्य आणण्यासाठीं








त्याला देऊन टाकली. अत्यंत जरूरीपुरतेंच वैयक्तिक व कौटुंबिक स्वार्थाकडे लक्ष देऊन बाकीचें सामर्थ्य व उर्वरित द्रव्य लोकहिताच्या कामीं खरचणें, हा माझा स्वभाव बनून गेला आहे. आज माझ्याजवळ अडीअडचणीला उपयोगी पडावे म्हणून दोनशें रुपयेच आहेत व तेंही एका मित्राला उसनवार दिले आहेत.

## कांहीं गूढ प्रश्नांविषयीं माझीं मतें

माझ्या ९० व्या वर्षी अत्यंत गूढ अशा प्रश्नांविषयीं माझ्या मनाचा कल कसा आहे, हें स्पष्टपणें नमूद करावें, असें मला वाटतें. आत्मा आणि परमेश्वर ह्या केवळ कल्पना असाव्या. प्राणी जन्माला येतो, तो पूर्वजन्माच्या पापपुण्याचें गांठोडें बरोबर घेऊन येत नाहीं. तो आई, बाप ह्यांच्या उभय कुलांतील पूर्वजांपासून आनुवंशिक संस्कार बरोबर घेऊन येतो. जन्म आणि मरण ह्यांच्यामधला काळ एवढेंच त्याचें आयुष्य. त्याला मागेंपुढें धागादोरा नाहीं. कार्यकारणभावावर आधारलेला सृष्टिक्रम धडाक्यानें चालू आहे. धरणीकंप, मोठाल्या आगबोटी समुद्रांत गडप करणारीं वादळें—हे जसे जड सृष्टींतील प्रकार, तसेच महायुद्धें, अणुबॉंब, बंगाल, बिहार, पंजाब, दिल्ली वगैरे ठिकाणचीं अंगावर शहारे उठविणारीं अमानुष कृत्यें—हे अमूर्त सृष्टींतून मूर्त सृष्टींत स्वरूप धारण करणारे सृष्टिचमत्काराचेच आविष्कार आहेत. सृष्टीचे व्यवहार ज्या नियमांनीं चालले आहेत, त्यांत न्याय, नीति ह्यांना स्थळ नाहीं. मनुष्याचें शरीर ज्याप्रमाणें उत्क्रांत होत होत त्याला आजचें स्वरूप प्राप्त झालें, त्याप्रमाणें **मन, बुद्धि, भावना, ह्यांचें उत्क्रमण होत होत न्यायाच्या आणि नीतीच्या कल्पना बनल्या आहेत.** १९१५ सालीं प्रसिद्ध झालेल्या आत्मवृत्तांत पुढील वाक्य आहे.

"माझ्या कल्पनासृष्टींतील चित्र या जन्मींच जड सृष्टींत पाहण्याचें भाग्य जर मला लाभलें नाहीं, आणि पुनर्जन्माच्या कल्पनेंत जर सत्य असेल, तर या वासनेनें युक्त अशा माझ्या जीवात्म्यानें पुनः नवशरीर धारण करून प्रारब्धकर्म संपूर्ण करावें व नंतर जड शरीराचा त्याग करून परमात्मस्वरूपीं लीन व्हावें एवढीच माझी इच्छा आहे."

ह्या वाक्यांत 'पुनर्जन्माच्या कल्पनेंत जर सत्य असेल तर' असे शब्द आहेत. ह्यावरून त्यावेळीं मन साशंक होतें, असें दिसतें. सृष्टीमध्यें जें घडून येत आहे, तें वज्रलेप आहे, ह्या आज घडणाऱ्या घटनांचा पुढें कोठें फेरविचार होऊन न्याय मिळणार आहे, ही केवळ कल्पना दिसते.

हे माझे विचार पोरकट आहेत, असेंच पुष्कळ थोर, विचारी पुरुषांना वाटेल. असें म्हटलें तर मी पोरच आहे. माझें ज्ञान तें काय आणि माझा अनुभव तो किती! पण मला वाटतें कीं, आपली सदसद्विवेकबुद्धि व मनावर घडलेले जुनेनवे संस्कार ह्यांमुळें जें आपणांस पटेल, तें आचरण चुकीचें असलें व त्याचे परिणाम वाईट झाले तरी पुरवले. पण विचार न करतां रुळलेल्या मार्गानें जाणाऱ्यांचें आचरण बरोबर असलें तरी तें घातक. **समाजांत जिवंतपणा उत्पन्न होण्यास समाजाला न पटणाऱ्या गोष्टींचें विचारपूर्वक आचरण करणारीं माणसेंच पाहिजेत.**

## श्रद्धावंत कार्यकर्त्यांबद्दल आदरबुद्धि

असे माझे विचार असले तरी विचारपूर्वक आपली मतें बनवून त्याप्रमाणें श्रद्धायुक्त अंतःकरणानें आचरणाऱ्या व्यक्ती व त्यांनीं चालविलेल्या संस्था—ह्यांबद्दल मला आदर वाटतो. मग त्या व्यक्ती व संस्था जुन्या मतांचा पुरस्कार करणाऱ्या असोत किंवा नव्या मतांचें प्रतिपादन करणाऱ्या असोत. बंगाल्यांतील ब्राह्मसमाज, आपल्या प्रांतांतील प्रार्थनासमाज, आर्यसमाज, पंजाबांतील देवसमाज, थिऑसॉफी, वेदशास्त्रोत्तेजक मंडळी वगैरे संस्था व त्या चालविणाऱ्या व्यक्ती यांजबद्दल मला आदर आहे. माझें म्हणणें एवढेंच कीं, विचार करून प्रामाणिकपणें आपलीं मतें व श्रद्धा बनवून तदनुरूप आचरणें व्हावें. मनुष्याचीं मतें काय आहेत, तो बोलतो काय व लिहितो काय ह्यांवर मनुष्याची किंमत करतां कामा नये. **मनुष्य करतो काय आणि वागतो कसा, ह्यांवर त्याची योग्यता ठरविली पाहिजे.**

## मनाची शांति हाच मोक्ष

'श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः।',








'श्रद्धावान् लभते मोक्षम्'—हीं वचनें! अर्थपूर्ण आहेत. पूर्वसंस्कारांमुळें श्रद्धा जशी रूढ आचार-विचारांवर बसूं शकते, त्याप्रमाणें नव्या विचारांचा पगडा मनावर बसल्यानें नव्या आचारविचारांवरही ती बसूं शकते. खिस्ताचें चरित्र वाचून व खिस्ती मिशनऱ्यांचे निःस्वार्थी प्रयत्न पाहून खिस्ती धर्माचा स्वीकार केलेले व त्यांत रमलेले कित्येक विद्वान् पहिल्या अमदानींत होऊन गेले. श्रद्धायुक्त आचरणानें आपलें आयुष्य घालविणाऱ्या माणसाला संसारांतील दुःखें व अडचणी भेडसावित नाहींत. त्याला मनाची शांति लाभते. मनाची शांति हेंच जीवनसर्वस्व, हाच मोक्ष.

कळत न कळत, प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष जे संस्कार मनावर घडत गेले, त्यांचा परिपाक म्हणजे माझीं आजचीं मतें.

सरते शेवटीं मला एवढेंच सांगावेसें वाटतें कीं, माझ्या ह्या विचारांनीं माझ्या मनाला आजपर्यंत तरी पूर्ण शांति लाभली आहे. पुढचें कोणी सांगावें!

———

## ★ ★ ★ महर्षि कर्वे हे व्यवहाराला अत्यंत चोख

" कर्व्यांनीं आपल्या मुलांना बी. ए. नंतरच्या शिक्षणाला पैसे दिले, ते कर्जाऊ म्हणून. शंकर डॉक्टरीकडे गेला, तेव्हां तो म्हणाला, " कर्जाऊ तरी देतात ना ? देऊं देत, मी फेडीन. " पण बापानें मुलाला कर्ज द्यावें, याचें मला दुःख होई. असें मनांत येई, कीं मी नानातऱ्हेनें काटकसर करून वागतें, जिवापलीकडे दळणकांडण करून लोकांच्या पोरांना बाळगून पैसा जमवतें, तरी डॉक्टरी शिक्षणाला पैसा कर्जाऊ घे म्हणतात. मला वाईट वाटे. पण करायचें काय ? ज्याच्या हातांत ससा तो पारधी, हा न्यायच जगाला दिसतो.......

कर्वे व्यवहाराला, पैशाला, अत्यंत चोख. एक पैचीसुद्धां अफरातफर होणार नाहीं. संस्थेच्या हिशेबांत हें ठीक आहे; पण ते घरींसुद्धां असेंच वागतील. मुलांच्या घरीं जेवले, तरीसुद्धां हिशेबानें त्याला पैसे पोहोंचवतील. इतकेंच काय पण एखाद्या मुलाच्या घरीं न्हाव्याकडून केस कापून घेतले, तरी त्याचे पैसे सुद्धां मुलानें देतां कामा नये. "

—सौ. आनंदीबाई कर्वे ' माझें पुराण ', पान ७२-७३








# राक्षसी व्यूहाणु

प्रा. दि. धों. कर्वे

आजकालच्या नव्या युगांत आपण जीं निरनिराळ्या प्रकारचीं द्रव्यें वापरतों त्यांतील बरींचशीं कारखान्यांत व प्रयोगशालांत तयार केलीं जातात. केवळ सृष्टींत सांपडणाऱ्या द्रव्यांनीं आपलें काम भागत नाहीं. एवढेंच नव्हे, तर सृष्टींत सांपडणाऱ्या द्रव्यांच्या बदलीं वापरतां येतील किंवा कित्येक बाबतींत त्यांच्याहीपेक्षां जास्त उपयुक्त होतील, अशीं द्रव्यें आज शास्त्रज्ञ तयार करीत आहेत. सृष्टिजन्य घृषीच्या ( रबर ) ऐवजीं कृत्रिम घृषि, कापसाऱ्याऐवजीं कृत्रिम रेशीम ( कौशाथव किंवा रेयॉन ) इत्यादि द्रव्यें गेल्या कांहीं वर्षांत मोठ्या प्रमाणावर तयार होऊं लागलीं आहेत, हें पुष्कळ वाचकांस ठाऊक असेल. त्याशिवाय अगदीं नवीनच अशींही अनेक द्रव्यें आतां उपलब्ध झालेलीं आहेत. उदाहरणार्थ, निरनिराळ्या प्रकारचीं कृत्रिम लुकणें ( आभिघटना, प्लॅस्टिक्स् ) तयार करून त्यांपासून विजेचीं निरनिराळीं उपकरणें, चाकू, सुऱ्यांच्या मुठी, गुंड्या ( बटणें ), मोटारीच्या ( यंत्राच्या ) सजावटीचे भाग इत्यादि तयार करतात. ह्या सर्व कल्पनांत ( कल्पन = मॅन्युफॅक्चर ) तयार होणाऱ्या द्रव्यांच्या रासायनिक संरचनेबद्दल सूक्ष्म अभ्यास व्हावा लागतो व त्यानंतरच योग्य गुणधर्मांचें द्रव्य बनवितां येतें. कृत्रिम द्रव्यांचे घटक कोणचे, त्यांच्या संयोजनानें कृत्रिम द्रव्यें कशीं बनतात व त्यांचे गुण कशावर अवलंबून असतात, ह्याबद्दलची थोडक्यांत माहिती प्रस्तुत लेखांत देण्याचें योजिलें आहे.

## परमाणु आणि व्यूहाणु

आपल्या सभोंवतीं आपल्याला जे निरनिराळे पदार्थ दिसतात अगर ज्यांच्याबद्दलचें ज्ञान आपल्याला इतर इंद्रियांनीं होतें, त्यांच्यांतील घटकद्रव्यें शोधून काढणें व विश्लेषणानें त्या घटकद्रव्यांचें परस्परांशीं असलेलें प्रमाण ठरविणें--इत्यादींचा अभ्यास " रसायनशास्त्रांत " केला जातो. गेल्या २–३ शतकांत ह्या अभ्यासानें महत्त्वाचें ज्ञान उपलब्ध झालेलें आहे. त्यांतील एक मुख्य सिद्धांत म्हणजे सृष्टींतील सर्व द्रव्यें ब्याण्णव निरनिराळ्या तत्त्वांच्या संयोजननें बनलेलीं असतात, हा होय. ह्यापैकीं कांहीं स्वतंत्र अवस्थेंतही ठाऊक आहेत. उदाहरणार्थ : शुल्वारि (गंधक), ताम्र, रजत (रुपें), स्वर्ण ( सोनें ), त्रपु ( कथील ), अयस ( लोखंड ), जंबुकी ( आयोडीन ) इत्यादि. इतर कांहीं आपल्या नेहमींच्या व्यवहारांत फारशीं ठाऊक नसतात. उदाहरणार्थ, भास्वर ( फॉस्फरस ), उदजन ( हायड्रोजन ), प्रांगार ( कार्बन किंवा कोळसा ), जारक ( ऑक्सिजन किंवा प्राणवायु ), रूपक ( निकेल ), तेजातु ( रेडियम् ), किरणातु ( युरेनियम् ) इत्यादि.

ह्या निरनिराळ्या तत्त्वांचें परस्परांशीं संयोजन होऊन जीं द्रव्यें बनतात, त्यांना संयोग असें नांव आहे. उदाहरणार्थ, पाणी ( उदजन + जारक ), मीठ ( नीरजी + क्षारातु ), साखर ( प्रांगार + जारक + उदजन ) इत्यादि. तत्त्वांची संरचना कणात्मक असते व तत्त्वाचा जो सर्वांत लहान कण








त्याला परमाणु असें म्हणतात. पूर्वी परमाणू अवि-भाज्य समजले जात असत व प्रत्येक तत्त्वाचा परमाणु इतरांपासून पूर्णपणें वेगळा असतो, अशी कल्पना होती. आतां मात्र असें स्पष्ट झालें आहे कीं, परमाणू अविभाज्य नसून त्यांचेंही विभाजन होऊं शकतें व त्यांचे घटककण बाहेर निघूं शकतात. ह्या घटककणांत मुख्य दोन प्रकार आहेत; वजनदार असे केवळ भूतद्रव्या-( Matter )-चे कण व धन किंवा ऋण विद्युतचे कण. निरनिराळ्या तत्त्वांच्या कणांत जो फरक असतो, तो फक्त त्यांत भूत-द्रव्याचे कण किती व विद्युत्कण किती एवढ्या-पुरताच असतो.

तत्त्वांचे परमाणू जेव्हां एकमेकांना जोडले जातात, तेव्हां त्यांपासून संयुक्त द्रव्यें ( संयोग ) निर्माण होतात, हें आपण पाहिलें. अर्थात् संयोगाचा सर्वांत लहान कण जरी घेतला तरी त्या कणांत एका अगर अधिक तत्त्वांचे प्रत्येकीं एक अगर अधिक परमाणू असणार, हें सहज कळेल. रासायनिक विश्ले-षणानें संयोगांतील तत्त्वें कोणचीं व त्या प्रत्येकाचे किती परमाणू एकमेकांशीं संयुक्त झालेले आहेत, हें ठरवितां येतें. हीच गोष्ट संयोगाच्या सूत्रांत दर्शविली जाते. जसें मीठ : क्षनी; पाणी : उ$_{2}$ज; तिक्ताति ( म्हणजे अमोनिया ) : भूउ$_{3}$; उसाची साखर : प्र$_{12}$उ$_{22}$ज$_{11}$ इत्यादि. ह्या सूत्रांत तत्त्वाच्या नांवाचें आद्याक्षर त्याचें चिन्ह म्हणून वापरतात व उजव्या हाताला खालीं त्याच्या परमाणूंचा आंकडा घातलेला असतो. जेथें आंकडा नसेल, तेथें १ समजावा असा संकेत आहे.

संयोगाच्या जो सर्वांत लहान कण त्याला व्यूहाणु असें म्हणतात. वर जीं सूत्रें सांगितलीं, तीं व्यूहा-णूंचींच होत. पाण्याच्या एका व्यूहाणूंत उदजनाचे दोन परमाणु व जारकाचा एक परमाणु असतो, हें उ$_{2}$ज ह्या सूत्रावरून कळतें.

## व्यूहाणूंतील परमाणूंची मांडणी

रासायनिक संशोधनानें आणखीहि एक गोष्ट कळून आली कीं, संयोगाच्या व्यूहाणूंतील निरनिराळ्या प्रकारच्या परमाणूंची नुसती संख्या कळून व्यूहाणू-बद्दलची संपूर्ण माहिती मिळत नाहीं. कारण व्यूहाणूंतील परमाणूंच्या संख्येप्रमाणेंच त्यांच्या मांडणीला म्हणजे विन्यासालाही फार महत्त्व आहे. लहान मुलांच्या खेळण्याच्या ठोकळ्यांची एक पेटी घेतली, तर तेच तेच ठोकळे वापरून अनेक निर-निराळ्या प्रकारचीं घरें बांधतां येतात, ही गोष्ट आपल्या परिचयाची आहे. ह्याचें कारण एवढेंच कीं, घटकांची संख्या एकच असली, तरी त्यांची मांडणी बदलल्यामुळें अखेरची रचना वेगळी वेगळी होते. "प्र$_{2}$उ$_{6}$ज" (म्हणजे प्रांगाराचे दोन, उद-जनाचे सहा व जारकाचा एक परमाणु असलेला व्यूहाणु ) हें व्यूहाणुसूत्र घेतलें, तर तसे दोन वेगवेगळे व्यूहाणू अस्तित्वांत असूं शकतात असें दिसतें. म्हणजे ह्याच घटकांपासून दोन प्रकारची मांडणी होऊं शकते : उ$_{3}$प्र–ज–प्रउ$_{3}$ अशी एक मांडणी व उ$_{3}$प्र–प्रउ$_{2}$–जउ अशी दुसरी मांडणी. कोण-त्याहि द्रव्याचे गुण ज्या निरनिराळ्या गोष्टींवर अव-लंबून असतात, त्यांत ह्या मांडणीला फार महत्त्व आहे. वर जे दोन संयोग सांगितले, त्यांच्या निरनि-राळ्या मांडणीमुळें त्यांच्या गुणधर्मांतही फरक असतो हें सांगावयास नकोच. हीच गोष्ट आणखी एक दोन उदाहरणांच्या मदतीनें स्पष्ट करतां येईल. चिंच, आंबट लिंबू, कैरी वगैरे फळांत जीं निर-निराळीं अम्लें, म्हणजे आंबट द्रव्यें असतात त्या सर्वांच्या व्यूहाणूंत नेहमीं "प्र ज ज उ" अशी संरचना आढळते. म्हणजे प्रांगाराचा एक, जारकाचे दोन व उदजनाचा एक परमाणु एका विशिष्ट पध्दतीनें एकमेकांशीं जोडले गेले म्हणजे त्यामुळें अम्ल गुण उत्पन्न होतात. तसेंच अमोनिया (तिक्ताति) ह्या तिखट वासाच्या वायूंत भूयातीच्या ( नायट्रोजनच्या ) एका परमाणूशीं उदजनाच्या तीन परमाणूंची जोडणी झालेली असते. भूयाति व उदजन हे परमाणू एकत्र आले कीं, त्या संरचनेचे गुण–म्हणजे तिखट वास, अम्लांशीं संयुक्त होणें इत्यादि नेहमीं एका विशिष्ट प्रकारचेच असतात, असें दिसून येतें. ह्यावरून व्यूहाणूंतील परमाणूंच्या मांडणीवरून द्रव्यांचे गुणधर्म कसे ठरतात, ह्याची कल्पना येईल. विशिष्ट प्रकारची संरचना झाली कीं, विशिष्ट प्रकारचे गुणधर्म हे सांपडावयाचेच.

## प्रांगारिक व अप्रांगारिक द्रव्यें

गेल्या दोनशें वर्षांत रसायनज्ञांनीं ज्या अनेक

द्रव्यांचें संशोधन केलें, त्यांचे मुख्यत्त्वें दोन वर्ग आहेत. जीं द्रव्यें जीवियांपासून ( म्हणजे वनस्पति अथवा प्राणि ) प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतिनें मिळतात, त्यांत प्रांगार म्हणजे कार्बन हें तत्त्व नेहमीं असतें. ह्यांच्या उलट खनिज द्रव्यांत प्रांगाराव्यतिरिक्त इतर तत्त्वेंच फक्त असूं शकतात. अशा लक्षावधि द्रव्यांचें विश्लेषण व संशोधन होऊन त्यांतील घटक तत्त्वें कोणचीं, त्या प्रत्येकाचे किती परमाणू एका व्यूहाणूंत विद्यमान असतात व त्यांची मांडणी काय हें ठरविण्यांत आलें. त्याचप्रमाणें सृष्टींत कधींही विद्यमान नसलेले असेही अनेक संयोग प्रयोगशालेंत व कारखान्यांत निर्माण करण्यांत आले. जीवियांपासून (प्राणी वा वनस्पति) मिळालेल्या ( व अर्थात् ज्यांत प्रांगार हें तत्त्व आहे अशा ) संयोगांना प्रांगारिक व त्याशिवाय इतरांना अप्रांगारिक अशा संज्ञा दिल्या जातात. खालील तक्त्यांत अशा कांहीं ठळक संयोगांच्या घटनेची माहिती पुढें दिली आहे :

| | | | |
|---|---|---|---|
| अप्रांगारिक : | मोरचूद:— ( ताम्र शुल्वीय ) | ताम्राचा १ परमाणु<br>गंधकाचा १ परमाणु<br>जारकाचे ४ परमाणू | सूत्र—ताशुज$_{४}$ |
| | नवसागर:— ( तिक्तातु नीरेय ) | भूयातीचा १ परमाणु<br>उदजनाचे ४ परमाणू<br>नीरजीचा १ परमाणु | सूत्र—भू उ$_{४}$ नी |
| प्रांगारिक : | उसाची साखर:— ( खण्डशु ) | प्रांगाराचे १२ परमाणू<br>उद्जनाचे २२ परमाणू<br>जारकाचे ११ परमाणू | सूत्र—प्र$_{१२}$ उ$_{२२}$ ज$_{११}$ |
| | विज्वरी ( कोयनेल ):— | प्रांगाराचे २० परमाणू<br>उदजनाचे २४ परमाणू<br>जारकाचे २ परमाणू<br>भूयातीचे २ परमाणू | सूत्र— प्र$_{२०}$ उ$_{२४}$ भू$_{२}$ ज$_{२}$ |
| | पर्णशाद ( पानांतील हिरवा रंग ):— | प्रांगाराचे ५५ परमाणू<br>उदजनाचे ७२ परमाणू<br>जारकाचे ५ परमाणू<br>भूयातीचे ४ परमाणू<br>भ्राजातीचा १ परमाणु | सूत्र— प्र$_{५५}$ उ$_{७२}$ ज$_{५}$ भू$_{४}$ भ्रा |

वरील विवेचनावरून सहज समजून येईल कीं, अप्रांगारिक संयोगांचीं सूत्रें सर्वसाधारणपणें साधीं म्हणजे कमी परमाणू असलेलीं अशीं असतात. ह्याच्या उलट प्रांगारिक संयोगांच्या सूत्रांतील परमाणूंची संख्या बरीच अधिक असते. पर्णशादाच्या व्यूहाणूंत १३७ परमाणू असतात तर, मोरचुदाच्या व्यूहाणूंत फक्त ६ परमाणू असतात. ह्यावरून हा फरक सहज लक्षांत येईल. पर्णशादाच्या व्यूहाणूंतील १३७ परमाणूंची मांडणी ठरविणें हें काम अत्यंत कठीण आहे. पण तें रसायनज्ञांनीं पार पाडलें आहे.

## शृंखला-व्यूहाणू व त्यांचें औद्योगिक महत्व

अशा रीतीनें निरनिराळ्या प्रांगारिक संयोगांचें संशोधन करतांना असें आढळून आलें कीं, जरी बहुतेक सर्व प्रांगारिक संयोगांतील व्यूहाणूंची संख्या ठरविणें शक्य झालें, तरी कांहीं व्यूहाणूंतील परमाणूंची संख्या ठरवितां आली नाहीं. कारण ती अतोनात मोठी असल्याचें आढळून आलें. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे कांहीं संयोगांचे व्यूहाणू इतके प्रचंड असतात कीं, त्यांतील परमाणूंची संख्या








अवाढव्य असते. उदाहरणार्थ कापूस ( कोशाधु ), पिष्ट ( मण्डधु ), घृषि ( रबर ), प्रोभूजिनें ( प्रोटीन ) इत्यादि द्रव्यांचे व्यूहाणू इतके मोठे असतात कीं, त्यांत हजारों परमाणू असतात असें आढळून आलें आहे.

ह्या प्रकारच्या संयोगांचें जेव्हां अधिक संशोधन करण्यांत आलें, तेव्हां त्यांच्या व्यूहाणु-संरचनेबद्दल बरीच आणखी माहिती उपलब्ध झाली. ह्या सर्व व्यूहाणूंमध्यें सांखळीसारखे निरनिराळे दुवे असल्याचें दिसतें. प्रत्येक दुव्यांतील, म्हणजे एककांतील, परमाणूंची संख्या अगदीं मर्यादित अशी असते. पण असे शेंकडों किंवा हजारों एकक एकाला एक जोडले जाऊन एकच व्यूहाणु बनल्यामुळेंच एक प्रचंड संरचना उत्पन्न होते. उदाहरणार्थ, कोशाधु-मधील ( कापूस ) एककाचें सूत्र प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ असें आहे. पण कोशाधु-व्यूहाणूंत असे असंख्य एकक एकमेकाला जोडलेले असतातः—

—प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ —प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ —प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ —प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ —प$_{6}$ उ$_{10}$ ज$_{5}$ —तसेंच घृषि ( रबर )मध्यें प$_{5}$ उ$_{8}$ हा एकक असतो व त्यांच्या ग्रथनानें घृषीचे व्यूहाणू बनतात—

—प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$—

अशा प्रकारचे राक्षसी व्यूहाणू सृष्टींत सांपड-णाऱ्या द्रव्यांतच आढळतात असें नाहीं, तर ते कृत्रिम रीत्या तयारही करतां येतात. कृत्रिम रेशीम ( कौशाधव ), कृत्रिम घृषि, निरनिराळीं लुकणें ( आभिघटना ) इत्यादि द्रव्यांच्या कल्पनांत अशा प्रकारचे शृंखलाव्यूहाणू त्या त्या विशिष्ट एक-कांच्या ग्रथनानें बनविण्यांत येतात. गेल्या कांहीं वर्षांत ह्या शृंखला-व्यूहाणूंचें महत्त्व फार वाढलें आहे. बलांशुक ( नायलॉन ) हें अशाच प्रकारचें एक द्रव्य आहे व शांततेंत व युद्धांत तें अत्यंत उपयुक्त ठरलेलें आहे.

कापसापासून कृत्रिम रेशीम किंवा दुधाच्या साक्यापासून कृत्रिम लोकर बनवितांना सृष्टींत आपो-आप बनलेल्या शृंखला-व्यूहाणूंचाच उपयोग केला जातो. फक्त त्यांच्या संरचनेंत किंचित् फरक करून आपल्याला इष्ट असे गुणधर्म त्यांच्यांत येतील, अशी योजना केलेली असते. ह्याच्या उलट कृत्रिम घृषि किंवा निरनिराळ्या आभिघटना ( उदाहरणार्थ, बेके-लाइट किंवा दर्शयास ) अथवा बलांशुक—हीं कृत्रिम द्रव्यें तयार करतांना लहान लहान व्यूहाणू असलेली द्रव्येंच घेतलीं जातात व कांहीं विशिष्ट प्रकारच्या प्रतिक्रियांनीं हे व्यूहाणू एकाला एक जोडून त्यांच्या शृंखला बनतील अशी योजना केली जाते. उदाहर-णार्थ, कृत्रिम घृषि तयार करतांना प$_{5}$ उ$_{8}$ असे वेगळे वेगळे व्यूहाणू ज्यांत असतात, असा संयोग घेऊन त्यावर प्रतिक्रिया करून हे वेगळे वेगळे तुकडे अगर दुवे एकाला एक जोडले जाऊन—प$_{5}$ उ$_{8}$—प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —प$_{5}$ उ$_{8}$ —अशा संरचनेचा शृंखला—व्यूहाणु तयार केला जातो व तोच कृत्रिम घृषि.

हाच प्रकार बलांशुकाचा. आजकाल "नाय-लॉन "पासून तयार केलेल्या मोजांवर पाश्चिमात्य स्त्रियांच्या कशा उड्या पडतात, तें पुष्कळांनीं ऐकलें किंवा वाचलें असेल. नायलॉन ( बलांशुक ) हें द्रव्य शृंखलाव्यूहाणूंचेंच बनलेलें असतें. त्याचे घटक अम्ल व तिक्ती म्हणजे अमोनियाच्या जातीचे संयोग अशा दोन प्रकारचे असतात. अम्लें व तिक्ती यांचे गुण एकमेकांच्या नेमके विरुद्ध असतात व म्हणून त्यांचें एकमेकांशीं संयोजन होऊं शकतें. पुष्कळशीं मुलें एकत्र येऊन नंतर त्यानीं एकमेकांचे हात धरून मोठी सांखळी करावी, तसेंच हें होतें. एक अम्लगुणी व्यूहाणु तिक्ती व्यूहाणूला, तो परत अम्लव्यूहाणूला, तो तिक्तीला, असे जोड बनत बनत प्रचंड लांबीचा राक्षसी व्यूहाणु तयार होतो.

बलांशुक ( नायलॉन ) राळेप्रमाणें अर्धपारदर्शक असें द्रव्य असतें. तें तापवून वितळवलें म्हणजे त्यापासून धागे काढतां येतात व त्यापासून तयार होणारें कापड अत्यंत चिवट व टिकाऊ असें असतें. गेल्या महायुद्धांत वैमानिकांच्या छत्र्या ( पॅराशूट ) बनविण्याकडे त्याचा उपयोग मुख्यत्वें झाला; पण शांततेच्या काळीं इतर ठिकाणींहि तो उपयोगांत येत आहे.



अनुक्रमणिका

# ग्रामोद्योगामागील शास्त्रीय दृष्टि

श्री. जव्हेरभाई पटेल

एकदां बादशहाचा गुन्हा बिरबलानें केला. बादशहा म्हणाला, " बिरबल, आतां तुला मोठें शासन केल्याविना मी सोडणार नाहीं. तूं मला नेहमींच त्रास देत असतोस." बिरबल म्हणाला, 'जहाँपनाह, गुन्ह्याबद्दल शासन आपण अवश्य करूं शकतां; पण गरीबाची एक प्रार्थना आहे. माझा न्याय भंग्यांच्या पंचामार्फत झाला पाहिजे.' बादशहानें भंग्यांच्या पंचांना बोलाविलें व हुकूम सोडला—" ह्या बिरबलनें माझा महान् अपराध केला आहे व माझी इच्छा आहे कीं त्यास कडक शासन झालें पाहिजे." पंच न्याय करावयास बसले. एकजण म्हणाला, " आज छान संधि मिळाली आहे. नेहमींच ऐट करीत असतो हा बिरबल! ह्याला अशी शिक्षा ठोठावतों कीं, याच्या मुलाला देखील चांगलीच याद राहील. मी ह्यास पांच विसा रुपये दंड ठोठावतों!" दुसरा म्हणाला, "गुन्हा बिरबलाचा आहे. त्याच्या मुलाचा थोडाच आहे? त्याच्या मुलावर दया दाखवायला हवी व बिरबलला आपल्या हयातींत देतां येईल एवढाच दंड त्यास करावा. मी त्याला तीन विसा दंड करतों." वादविवादानंतर फैसला अशाप्रकारें सांगण्यांत आला— " खुदावंतांची सूचना लक्षांत घेतां आम्ही बिरबलास दोन विसा दंडाची कडक शिक्षा फर्मावितों " —

ह्या शिक्षेचा निकाल ऐकून बादशहास बिरबलाचें चातुर्य कळून आलें व तो मनांत विरमला. भंगी करून करून किती दंड करणार? बिरबलची अटकळ खरी ठरली!

दोन विसा रुपयांची शिक्षा बिरबलाच्या देव शक्तीची सूचक आहे कीं भंग्यांच्या मनाची?

## राजा कालस्य कारणम्

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर हरएक विचारवंत इसमाची आकांक्षा असते कीं देश समृद्ध व्हावा, आणि गरीब जनतेनें सुखी व्हावें. 'राजा कालस्य कारणम्.' आजपर्यंत परदेशी राजा असल्यामुळें आमचें अभीष्ट सिद्ध झालें नाहीं. परंतु आतां तर स्वराज्य प्राप्त झालें आहे. ह्या परिवर्तनाचें फार क्रान्तिकारी महत्त्व आहे. राज्याचें प्रयोजनच बदलून गेलें आहे. प्रजेवर सत्ता गाजविणें हें इंग्रजांच्या प्रभुत्वाचें प्रयोजन होतें. प्रजेचें पालनपोषण करून तिला समृध्द करणें स्वराज्याचें प्रयोजन आहे. ह्याच उद्देशाच्या पूर्तीसाठीं कॉंग्रेसनें व कॉंग्रेस सरकारनें अनेक मनसुबे करून ठेवले होते. आणि योजना पण बनविल्या होत्या व आजहि बनवीत आहेत. सध्यां जरी सर्वांचें लक्ष जातीय दंग्यांकडे आकृष्ट झालें आहे, तरी पण ही स्थिति अल्पजीवी आहे असें समजून खऱ्या कार्याकडे म्हणजे राष्ट्राची शक्ति वाढविण्याच्या कामाकडे दुर्लक्ष करणें भयावह आहे.

आज विधायक कार्यक्रम करणाऱ्यांपुढें कोणतें दृश्य उभें आहे? इंग्रजांचें राज्य गेलें आहे पण त्यांनीं जी विचारप्रणाली कायम केली आहे तिचा प्रभाव अद्यापि गेला नाहीं. विशेषतः शिकल्या-सवरल्या लोकांवर ह्या प्रणालीचा प्रभाव फार मोठ्या प्रमाणांत पडला आहे. शासक वर्ग शिकल्यासवरलेल्या लोकांतूनच उत्पन्न होतो. ह्यासाठीं इंग्रजांनीं निर्माण केलेली विचारप्रणालीच आमच्यावर प्रभुत्व गाजवीत आहे. (Competitive economy)-'प्रतिस्पर्धात्मक अर्थशास्त्र,' 'जीवनाची उच्च राहणी,' 'यंत्रयुग', (Labour-saving devices)-








'श्रम वांचविणारी यंत्रसामुग्री' इत्यादि–उद्घोषांची गर्जना होत आहे. आणि अहिंसक आणि आर्थिक समानतावादी सामाजिक आदर्श एका बाजूस राहून जातो. म्हणूनच आतां असें वाटतें कीं, प्रजेला सामाजिक क्रांति करावी लागेल. राजकीय क्रान्तींमधून सामाजिक क्रान्ति घडवून आणण्याची आकांक्षा जणूं काय हवेंत उडून गेली आहे.

## महत्त्वाकांक्षेचा अभाव !

दुसऱ्या बाजूनें प्रजेची दशा भंग्यांच्या न्याया-सारखी आहे. प्रजेच्या ठिकाणीं कांहीं महत्त्वाकांक्षा दिसून येत नाहीं. आपल्या हक्कांचें त्यांचें त्यांना यत्किंचितहि भान राहिलेलें नाहीं. अनेक शतकें-पर्यंत दुःखांचे असहायपणें साक्षी बनल्याकारणानें प्रजा दुःखाबद्दल आपल्या नशीबालाच दोष लाव-ण्यास शिकली आहे. नेहमीं कमी पोषण मिळालें असतांना शरीराची शक्ति तर कमी होतेच पण त्याबरोबरच तेवढ्याच पोषणांत भागविण्याची अनुकूलताहि शरीरांत असते. अर्थातच ह्याचा परिणाम असा होतो कीं, शरीराचें जीवनसत्त्व खालच्या पातळीवर येतें. पुष्कळ लोकांना आश्चर्य वाटतें कीं, हिंदुस्थानांत इतकें कमी पोषण मिळालें असतां हिंदी लोक जगतात तरी कसे ? ह्याचें उत्तर एवढेंच कीं, परिस्थितीप्रमाणें निभावून घेण्याची शक्ति शरीरांत आहे. आमच्या प्रजा-शरीराचीहि तशीच स्थिति झाली आहे. प्रजा केवळ क्षीणसत्त्व झाली आहे, असें नसून तिची आकांक्षाहि दुबळी झाली आहे. प्रजेच्या उद्धाराचा हाच यक्षप्रश्न आहे. अल्पाकांक्षा आणि दैववाद यांच्या पायावर विदेशी सत्तेनें आपलें आसन स्थिर केलें. तिनें प्रजेस परावलंबी व पराभिमुख बनाविलें. कांहीं झालें तर 'आमच्याकडे पहा' असा गुलामीचा मंत्र इंग्रज सरकारनें प्रजेला दिला. स्वराज्याचा मंत्र याच्या उलटच असणार ! आम्ही स्वतःच कार्यारंभ करूं आणि हवें तर सरकारची मदत घेऊं, ही प्रजेची मनोभावना झाली पाहिजे. स्वावलंबनाची उभारणी आकांक्षेच्या पायावरच होतें, हें मात्र खरें.

## दूध खाणें ही चैन !

जनतेच्या महत्त्वाकांक्षेच्या अभावाचीं एक-दोन उदाहरणें देण्यासारखीं आहेत. गोंड प्रदेशांत गो-धनाची व चाऱ्याची मुळींच कमतरता नाहीं. परंतु गोंड लोकांना दुधाची आवश्यकता भासत नाहीं. ह्या कारणास्तव तेथें दूध पैदा होत नाहीं. खेड्यांतील लोकांना जेव्हां आम्ही म्हणतों कीं, त्यांनीं युक्ताहाराच्या दृष्टीनें दररोज माणशीं अर्धा शेर दूध, अर्धा शेर फळ-भाजी, ५ तोळे तूप, तेल आणि ५ तोळे गूळ खाल्ला पाहिजे, तेव्हां त्यांना कसेंसेंच वाटतें. हें श्रीमंतांचें म्हणजे चैनीचें खाणें आहे, असें ते समजतात. ही मनोदशा क्षीण आकांक्षेचें प्रतीक आहे. युक्ताहार घेणें ही चैन किंवा शोक नसून हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे व हा आहार न घेणें, हा सामाजिक गुन्हा नसून, काम न करणें हा गुन्हा आहे. आणि युक्ताहार न घेणारे लोक, त्यांची शारीरिक आणि बौद्धिक शक्ति विकसित न झाल्याकारणानें, कार्यक्षमतेनें काम करूं शकत नाहींत. येवढेंच नव्हे तर अर्धवट रोगी राहिल्याकारणानें समाजावर त्यांचा बोजाहि पडतो. कुटुंबांत एखादा इसम कायमचा आजारी असला तर तो कुटुंबाला बोजाच होतो. युक्ताहार न घेणारे लोक कायमचेच आजारी आहेत. व म्हणूनच ते समाजावरील बोजाप्रमाणेंच आहेत. आहार सुधारण्यासाठीं जन-तेची मनोभूमिका तयार करणें ही आद्य महत्त्वाची गोष्ट आहे.

## ग्रामीण जनतेची जागृति

लोक म्हणतात कीं, आतां पहिल्यापेक्षां ग्रामीण जनतेंत अधिक जागृति झाली आहे. खरें पाहतां, स्वराज्याचें आगमन ग्रामीण जनतेच्या दृष्टीनें एक नाटकाचा खेळ झाला आहे. स्वराज्यासाठीं कांहीं पुरुषार्थ न केल्याकारणानें स्वराज्यविषयक कर्तव्य व स्वराज्याचे हक्क ह्या दोन्हीं बाबतींत ते अनभिज्ञ आहेत. राजकीय क्षेत्रांतील कार्यकर्ते निवडणुकीच्या दृष्टीनें ग्रामीण जनतेंत कांहीं प्रचार करतात व त्यांच्या मतामुळें फायदा करून घेतात आणि सर-कारच्यातर्फें ग्रामपंचायती वगैरे स्थापन करून ग्रामीण जनतेला राजनीतीचे पाठ देण्याचा प्रयत्न करतात. ह्या मर्यादेपर्यंत ग्रामीण जनतेची जागृति झाली आहे, हें बरोबर आहे. पण ह्या प्रश्नाची दुसरी बाजूहि आहे. आजपर्यंत निवडणुकींचीं भांडणें शहरापर्यंतच मर्यादित होतीं. आतां ग्राम-








## ग्रामोद्योगामागील शास्त्रीय दृष्टि

पंचायतींच्या द्वारां झगड्यांचें लोण प्रत्येक खेडे-गांवापर्यंत पोहोंचविलें जाईल. आणि राजकीय तालमींत अनभिज्ञ असल्याकारणामुळें निवडणु-कींच्या नांवावर पक्षोपपक्ष व व्यक्तिगत द्वेष–ईर्षा यांच्या बाजारास ऊत येईल. ह्या धांदलींत विधायक कार्यक्रमाचा किंवा दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर ग्रामोत्थानाचा कार्यक्रम अंधारांत गडप होईल. ह्यासाठीं आकांक्षारहित, असहाय, आणि अनभिज्ञ प्रजेला आपल्या आर्थिक समृद्धीच्या कार्यक्रमाच्या केन्द्र-बिंदूवरून विचलित न होऊं देण्याचा गुरुभार विधायक कार्यकर्त्यांवर आहे.

### विकेन्द्रित उत्पादन पद्धति

आजच्या व लौकरच येणाऱ्या भावी काळांतील परिस्थितीमध्यें खेडुतांची आर्थिक समृद्धि विकेन्द्रित उत्पादन पद्धतीनेंच होऊं शकते. सामान्यतः अशी कल्पना असते कीं, विकेंद्रित उत्पादन म्हणजेच ग्रामोद्योग हा केवळ श्रद्धेचा विषय असून, ज्यांना श्रद्धा असेल असे मोजके लोक ह्या दिशेनें प्रवृत्तिशील राहतील. परंतु हा एक भ्रम आहे. हा विषय केवळ श्रद्धेचा नसून परंपरास्थापित हितसंबंध ( vested interests) विरुद्ध अखिल जनता–ह्या प्रश्नाशीं निग-डित आहे. जनतेच्या कल्याणाचा हा प्रश्न आहे. निव्वळ आर्थिक प्रश्न आहे. केन्द्रिय पद्धतीनें उत्पादन करावयाचें म्हणजे शहराची समृद्धि वाढते आणि खेडीं निःसत्व होतात. ह्याची प्रक्रिया अशी आहे: खेड्यापाड्यांतून कच्चा माल शहरांत जातो आणि तेथें तो पक्का होऊन, तो परत खेड्यांत पाठविला जातो. इतक्या साध्या प्रक्रियेचे दोन परिणाम होतात. खेड्यांच्या आर्थिक आणि बौद्धिक समृद्धीचा प्रवाह त्या योगानें शहराकडे सतत वाहतो. कच्चा माल पैदा करण्यांत पारिश्रमिकहि म्हणजे वेतनहि कमी लाभतें व बुद्धिविकासाच संधिहि कमी मिळते. उदाहरणार्थ, सोडाची टोळी खेडोपाडीं गोळा करून शहरांत नेली जाते. टोळी गोळा करणारांना किती कमी वेतन आणि साबण तयार करणाऱ्यांना किती अधिक वेतन मिळतें, हें पाहण्यासारखें आहे. बुद्धि–विकासाच्या संधीचें प्रमाण देखील तसेंच. ह्या कारणास्तव बुद्धिसंपन्न लोक खेड्यांत नाइलाजानेंच राहूं इच्छितात. ही परिस्थिति बदलायची असेल तर त्याचा मार्ग एकच. तो म्हणजे कच्च्या मालाचें रूपांतर खेड्यांतच झालें पाहिजे. ह्याची चतुःसूत्री खालीलप्रमाणें देतां येईल. १ शक्य तों कचा माल देऊं नका २ शक्य तों कच्चा माल घेऊं नका ३ अतिरिक्त निर्यातीसाठीं कच्चा माल द्या ४ कमतर-तेच्या पूर्तीसाठीं पक्का माल घ्या.

### कांहीं प्रचलित गैरसमज

विकेन्द्रित उत्पादन पद्धतीच्या बाबतींत पुष्कळ लोकांना तऱ्हेतऱ्हेच्या शंका येत असतात. ह्याचें एक कारण असें कीं, ह्या पद्धतीवर आधारलेल्या जीवनासंबंधीं लोकांच्या कल्पना अस्पष्ट अशा अस-तात. अशी एक कल्पना आहे कीं, ह्या पद्धतीचा परिणाम म्हणून लोकांचें जीवन साधेसुधें संयमशील पण कष्टमय होईल, उपभोगाची कमतरता होईल व जीवन समृद्ध होणार नाहीं. दुसरी कल्पना अशी आहे कीं, आजच्या विज्ञान व यंत्रयुगांत ग्रामोद्योग टिकूं शकत नाहीं. ह्या दोन्ही कल्पना अस्पष्ट विचार-श्रेणीच्या सूचक आहेत. विकेन्द्रित उत्पादन-पद्धतीचें लक्ष्य जीवनसमृद्धि कमी करणें, हें नसून किंबहुना तें वाढविणें हें आहे; तसेंच त्या पद्धतीचा क्षेत्रविस्तार सार्वत्रिक करावयाचा नसून स्वाभाविक क्षेत्रापर्यंतच त्याला मर्यादा घालावयाची आहे. ' अनधिकार चेष्टा ' कोण करूं इच्छील ? ग्रामोद्योग जिवंत राहील कीं कारखाने चालू राहतील हा प्रश्न नसून ग्रामोद्योग कोठें करावयाचा व कारखाने कोठें घालावयाचे, हा प्रश्न आहे. आणि तो इतका बिकट आहे कीं वाचकांना ह्याचें थोडेसें दिग्दर्शन ह्या ठिकाणीं करणें आवश्यक आहे. ह्यांतील दुसऱ्या मुद्याचें विवेचन प्रथम करून जीवनसमृद्धीच्या पहिल्या मुद्याचें विवरण नंतर करूं.

### ग्रामोद्योगाची शास्त्रीय दृष्टि

हें विज्ञानयुग आहे, हें आम्हास मान्य आहे. एवढेंच नव्हे पण आमची प्रतिज्ञा आहे कीं, आम्ही विज्ञानाची कास धरूनच चालूं. त्याचबरोबर ही गोष्टहि स्पष्ट आहे, कीं आम्ही जीवनाचे भक्त आहोंत, केवळ विज्ञानाचे नाहीं. विज्ञान जीवन-पोषक असलें पाहिजे, जीवन-घातक नको. विज्ञानाच्या यंत्र-विज्ञान, रसायन-विज्ञान आणि आहार-विज्ञान ह्या तीन

शास्त्रांमध्यें जेव्हां परस्पर कलह उत्पन्न होतो, तेव्हां आम्ही कोणत्या शास्त्रेचें अवलंबन करायचें ? विज्ञानाच्या इतिहासांत यंत्रविज्ञानाचा क्रम पहिला आहे व आहारविज्ञान तर आजकालचें मूल आहे. तरी पण आहाराच्या क्षेत्रांत आहारविज्ञान हें यंत्रविज्ञानाला (Corrective) 'करेक्टिव्ह' म्हणून—बेजबाबदार यंत्रविज्ञानाला ताळ्यावर आणण्याकरितां म्हणून प्रकट झालें आहे आणि म्हणूनच लब्धप्रतिष्ठ यंत्रविज्ञानापेक्षा तें अधिक अधिकृत आहे. यंत्रविज्ञानानें जे अद्भुत पराक्रम करून दाखविले आहेत, त्यांच्या योगानें आम्ही इतके प्रभावित झालों आहोंत कीं, विज्ञानाच्या ह्याच एका शाखेला आम्ही पूर्ण विज्ञानाच्या समानार्थी मानूं लागलों ! यंत्र-विज्ञानानें तेल आणि तांदूळ यांच्या गिरण्यांची जगाला भेट अर्पण केली. ह्या गिरण्या म्हणजे यंत्रविज्ञानाचा एक परिपूर्ण नमुना. परंतु ह्यामुळें जी वस्तुस्थिति निर्माण झाली, ती आहार-विज्ञानांत अगदींच अनिष्ट ठरली. आज खुद्द तेलाचे गिरणीवाले आरडून ओरडून सांगतात, "मेहेरबानी करून गिरणीचें कचें तेल खाऊं नका, तें खाण्यालायक नाहीं. ग्राहकांना मिळेपर्यंत तें खराब होतें. आजपर्यंत आपल्या सेवेंत आमची एवढी त्रुटि राहिली पण आतां रसायन-विज्ञानानें आम्हास साहाय्य केलें आहे म्हणून त्या खराब झालेल्या तेलाला केवळ शुद्ध करूनच नव्हे तर घनीभूत करून देखील आम्ही आपणांस तें देऊं" पहिल्यांदा तेल सडवावयाचें व नंतर शुद्ध करावयाचें ! ह्यापेक्षां 'प्रक्षालनात् हि पंकस्य दूराद् अस्पर्शनं वरम्'! आणि इतकें झालें तरी पण शुद्धीकृत व घनीभूत तेल देखील आहारशास्त्राला मंजूर नाहीं. आतां आपणच सांगा, विज्ञानाच्या कोणत्या शाखेचें आपण अवलंबन करावें ? तांदळाच्या व मैद्याच्या गिरण्यांचीहि हीच कथा आहे. सर्व जगांतील आहारशास्त्री गिरणींत सडलेल्या तांदळाची, गिरणींतील मैद्याची निंदा करीत आहेत. आपण तेल, तांदूळ, कणीक ह्यांच्या गिरण्या ठेवाल कीं काढून टाकाल ? आपली दृष्टि वैज्ञानिक आहे कीं गतानुगतिक आहे, ह्याचा निर्णय आपणच करा.

उदाहरणें अनेक देतां येतील. सामान्य जनसमुदाय 'भोळसट' असल्याकारणानें प्रचारास लवकर बळी पडतो. नीरक्षीरविवेकबुध्दीनें ग्रामोद्योग व कारखाने—यांच्या क्षेत्राचा विचार करण्याचें सामर्थ्य बरेच लोक दवडून बसले आहेत.

## जनतेचें जीवन समृद्ध कसें होईल ?

ग्रामोद्योगाच्या द्वारें जीवनाची समृध्दि वाढूं शकत नाहीं, अशी कल्पना लोकांच्या डोक्यांत कशाप्रकारें घुसली आहे, ही एक संशोधन करण्यासारखी गोष्ट आहे. विशेषतः आम्ही जेव्हां खेड्यांच्या दृष्टीनें विचार करतों, तेव्हां तर ग्रामोद्योगानेंच खेडुतांचें जीवन समृध्द होऊं शकेल, हें समजावून सांगण्याची आवश्यकता न राहिली पाहिजे. अखेरीस उपभोगाच्या साऱ्या सामग्रीचा कच्चा माल खेड्यांतूनच पैदा होतो. शहरांत उन्हाळ्याच्या दिवसांत वाळ्याच्या ताट्या बांधल्या जातात; तो वाळा कोठून येतो ? आणि वाळ्याची ताटी देखील ग्रामोद्योगाचेंच प्रतीक नाहीं काय ? कच्चा माल खेड्यांतून आलेला; त्यास पक्का करण्याची पध्दति देखील ग्रामोद्योगीय. त्यामुळें शहरवासीयांचें जीवन समृध्द झालें, ह्याबद्दल कोणास शंका नाहीं. परंतु खेडुतांच्या नशीबीं मात्र त्या ताट्यांचा उपभोग घेण्याचें नाहीं. ग्रामोद्योगामुळें जीवन समृध्द होतें कीं नाहीं, हा प्रश्न येथें उत्पन्न होत नाहीं. पण ह्यामुळें नगरवासियांचें जीवन समृध्द झालें व खेडुतांचें झालें नाहीं म्हणजेच जीवन समृध्द होण्याचें वा न होण्याचें कारण ग्रामोद्योग हें नसून दुसऱ्या कोणत्या तरी कारणावर हें अवलंबून आहे, ह्याचें हें उदाहरण आहे. शहरांत दूध, तूप, भाजीपाला, धान्य, वस्त्रोपवस्त्रें, घरांत लागणाऱ्या बहुतेक वस्तू खेड्यांतूनच बहुधा येतात. खाण्याच्या वस्तू ग्रामोद्योगानें तयार झालेल्या असल्या तर अधिक सत्वयुक्त असतात, असें आहारशास्त्रकारांचें निश्चित मत आहे. कलाकुसरीचे कपडे तर हातकारागिरीचेच अधिक चांगले असतात आणि घराची बहुतेक सर्व सामग्री तयार करणें आणि प्रत्यक्ष घर बांधण्याचें काम करणें—हे सर्व ग्रामोद्योगाचेच प्रकार आहेत. ह्या सर्व ग्रामोद्योगानें नगरवासियांचें जीवन समृध्द होत आहे. परंतु येथेंहि तोच प्रश्न आहे. नगरवासियांचें जीवन समृध्द होत आहे व खेड्यांत राहणाऱ्या लोकांचें जीवन जसेंच्या-तसेंच राहून जातें. म्हणूनच खेड्यांतील जीवन








समृध्द न होण्याचें कारण ग्रामोद्योग नसून दुसरें कोणतें तरी असलें पाहिजे !

मग तें कारण कोणतें आहे ? आजपर्यंत इंग्लंडचें जीवन समृध्द होण्याला व हिंदुस्थानचें जीवन असमृध्द राहण्याला जें कारण होतें, तेंच कारण वरील गोष्टीस लागू आहे. इंग्लंडचा व हिंदुस्थानचा आजपर्यंत जो संबंध होता, तोच संबंध आज शहराचा व खेडेगांवाचा आहे. खेडें केवळ शहरांना कच्चा माल पुरविण्याचें स्थान झालें आहे आणि शहरांत पक्का माल तयार होऊन नंतर खेड्यांत तो पाठविण्यांत येतो. ह्या प्रक्रियेमध्यें १००० लोकवस्तीच्या गांवाला दरसाल सुमारें २५।३० हजार रुपयांचा भूर्दंड भरावा लागतो व तो दूध, दही, तूप, कपडा ह्या रूपानें दिला जातोहि. जीवन समृध्द न होण्याचें खरें कारण हा भूर्दंडच आहे. हा दंड कसा टाळावा हाच मुख्य प्रश्न आहे.

ग्रामोद्योगाचें नांव ऐकूनच सामान्यतः लोकांचें लक्ष ग्रामोद्योगाच्या अवजारांच्या स्वरूपाकडे जातें. परंतु औजारें हा उद्योगाचा एक भाग आहे, उद्योगाचें बाह्य शरीर आहे. ग्रामोद्योगाचा आत्मा तर विकेन्द्रित उत्पादनपध्दतीच आहे. ह्या पध्दतीस मध्य समजून चांगल्यांत चांगलीं औजारें वापरण्यास कोणाचीही हरकत नाहीं, आणि हस्तव्यवसायाला शास्त्रीय, वैज्ञानिक, व हुन्नर–कलेचें, ज्ञान संपादन करण्याची मनाई नाहीं. एवढेंच नव्हे, तर ह्याच गोष्टींबद्दल तर ग्रामोद्योगांत आग्रह आहे. कारण ह्यांच्याच योगानें त्या ग्रामोद्योग करणारांचा आत्मविकास साधावा, हा ग्रामोद्योगाचा हेतु आहे. कारखानेवाले म्हणतील, 'खेडुतांना चांगला साबण बनवितां येत नाहीं, चांगलें सुगंधी तेल बनवितां येत नाहीं, बेलतेल तयार करण्याची पद्धतिहि त्यांस माहीत नाहीं म्हणून चांगल्या वस्तु तयार करण्याच्या बुद्धीनें त्यांनी सर्व कच्चा माल शहरांत पाठवावा.' ग्रामोद्योगवादी म्हणतात 'आम्हाला केवळ चांगल्या वस्तूंशीं कर्तव्य नाहीं. ज्यांच्यासाठीं चांगल्या वस्तू तयार होतात ते नुसते 'बुद्दू' राहवेत हें आम्हास परवडत नाहीं.' हेंच ह्या झगड्याचें मूळ आहे.

ग्रामोद्योगानें जीवन समृद्ध तर होतेंच, पण सर्व जनतेच्या जीवनाच्या शिक्षणाचा तो एकमेव उपाय आहे. राष्ट्रास प्रजाशासनवादा-( डिमॉक्रसी ) साठीं तयार करावयाचें असेल तर, राजकारण व अर्थकारण ह्या दोहोंसाठीं विकेन्द्रीकरण अनिवार्य आहे. आपण पाहिलेंच आहे कीं, प्रजेच्या महत्त्वाकांक्षेचा मृत्यु होण्याचें कारण तिची असहायता आहे. म्हणून प्रजेच्या ह्या असहायतेची वा परावलंबनाची हकालपट्टी करणें हाच ग्रामोत्थानाचा मुख्य हेतु असला पाहिजे. हें ध्येय साध्य करावयाचें असेल, तर आपणास ग्रामोद्योगाखेरीज गत्यंतरच नाहीं.

---

## * * * जोतिराव फुले यांची ईश्वराची कल्पना

फुले हे ईश्वराची कल्पना सोडल्यास इतर सर्व बाबतींत पूर्ण बुद्धिवादी दिसतात.......... ईश्वराची कल्पना फुले यांना त्यांच्या स्वतःच्या तार्किक व तात्त्विक समाधानाकरितां आवश्यक वाटली, असें दिसतें. ज्या ईश्वरांतून मंदिरें आणि पुरोहितवर्ग उत्पन्न होईल असा ईश्वर त्यांनीं अमान्य केला. फुले हे माळी असल्यामुळें त्यांना निसर्ग सुपीक बागायतजमिनीसारखा वाटला. ज्या जमिनीच्या पृष्ठभागावर पाणी वहात नसून आंतून खोल पाण्याचे प्रवाह आहेत, अशी ही जमीन आहे. मनुष्यानें श्रम केल्यास तो बाग–ती सृष्टि पुष्पित व फलित होईल. त्याचा सुंदर बहरलेला बाग बनेल—नव्हे त्याचें नंदनवन बनेल. मात्र त्याकरितां ज्ञान आणि प्रयत्न यांची जोड पाहिजे. त्यावांचून निसर्ग म्हणजे मनुष्याचें मृत्युस्थान आहे. तहान, भूक व रोग हे त्याचे दूत या निसर्गांत माणसाचा बळी घेण्यांस टपले आहेत. बुद्धि व प्रयत्न हेच माणसाला त्यांच्यापासून सोडवितात.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी 'ज्योति–निबंध' (१९४७)








# हा बालक बसला कागद टरकावीत—

[ जाति--भूपतिवैभव ]

हा बालक बसला कागद टरकावीत !
ते कोरे किंवा त्यांवर लिहिलें गीत,

कीं नयनाल्हादक रंगविलें गोपूर,
नर्तकी नाचते झणकारित नूपूर,

हा विचार नाहीं; नाहीं म्हणुनि फिकीर.
करण्यांत चिटोऱ्या रमला कारागीर.

ही रम्या नगरी साम्राज्याची भूपा
ही काय उर्वशी विश्वमोहिनी योषा

हीं लेणीं अथवा सुन्दर ताजमहाल
करि विचार असला कां विध्वंसक काळ ?

तो काळपुरुष लेवुनी रूप वेल्हाळ
निर्विकार बसला लावित काय निकाल

वस्तूंचा-लागति ज्या ज्या त्याच्या हातीं-
-ही आज कागदावरती वळली दृष्टी !

कोपुनी तयाची म्हणते माय ‘ खट्याळा !
हा चालविला रे काय विनाशक चाळा !’

परि मला वाटतें सांगावें जननीला
“ ही नको निखंदू तव छकुल्याची लीला ”

कागदावरी ह्या लिहिलीं जातिल गाणीं
परि करिल कंठगत भावें कां तीं कोणी ?

जरि कुणी ह्यावरी चटोर लिहिलें कांहीं
चघळतील वात्रट मात्र तया लवलाही !

हा मिळेल कोणा जरी सावकारास
होईल खास हा ऋणकोला गळफास

लागेल हा जरी मुत्सद्यांच्या हातीं
ते करार ऐसे करतिल ह्याचेवरती

कीं उडेल त्यांच्यामधुन अचानक भडका
जो ग्रहगोलांना देइल धडका धडका

जरि कुणी तयावर विश्वशान्तिपाठास
कोरिलें ओतुनी पुण्य; काय विश्वास-

कीं पुण्याई ती कुणी धूर्त मुत्सद्दी
ठरवितील हातोहात मामुली रद्दी !

त्यापेक्षां निरुपद्रवी खेळ हा नच कां ?
--चालुं दे बालका ! नको पेकुं ह्या यमकां !

पुणें ता. २२-११-४७.

यशवन्त

# डायव्होर्स कायदा

श्री. ना. गो. चापेकर.

क्वचित्प्रसंगीं ओढवणाऱ्या आपत्तींतून विवाहित स्त्रीची सोडवणूक करण्याच्या उदात्त हेतूने मुंबई प्रांताच्या विधिमंडळाकडून नुकताच घटस्फोटाचा कायदा करण्यांत आला आहे. ह्या कायद्यानें धर्म बुडाला म्हणून सनातनी आक्रोश करीत आहेत, तर कित्येक हर्षानें हुरळून गेले आहेत. आणि अबला आपणांस कांहीं मिळालें काय म्हणून उत्सुकतेनें व मोठ्या आशेनें ज्ञात्यांजवळ पृच्छा करीत आहेत. मला वाटतें, नित्य घडतें त्याप्रमाणें ह्या कायद्यानें कोणाचेंच संपूर्ण समाधान होण्यासारखें नाहीं. सनातन्यांची भीति अज्ञानमूलक आहे. म्हणून त्यांच्या आक्षेपांचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. ब्राह्मणांव्यातिरिक्त पुष्कळ जातींत घटस्फोटाची चाल आहे, ही गोष्ट ते लक्षांत घेत नाहींत. फार काय पण ब्राह्मणांतहि नवराबायकोंत 'फारकती' होत असतात, असा कागदी पुरावा मिळण्यासारखा आहे. अर्थात् ही चाल फार थोड्या जातींत आहे, असें सध्यां तरी म्हणावें लागतें, हें खरें. सनातनी ह्या दृष्टीनें विचार करीत नसल्यामुळें विधिमंडळानें आमच्यावर गहजब केला, असें त्यांना वाटणें स्वाभाविक आहे. ह्या कायद्याची व्याप्ति फारच मर्यादित आहे. ज्या थोड्या जातींत घटस्फोटाची रूढि नाहीं, त्यांनाच ह्या कायद्याचा उपयोग होण्यासारखा आहे.

## सनातन्यांची भीति निराधार

विवाह म्हणजे करार, ह्या गोष्टीस विधिमंडळानें मान्यता दिलेली नाहीं. त्यामुळें वाटेल तेव्हां करार मोडण्याची मुभा करार करणाऱ्यांना असते, तशी विवाहित स्त्रीपुरुषांना मिळालेली नाहीं. कायद्यांत नमूद केलेलीं कारणें घडलीं नसल्यास घटस्फोट मिळणें अशक्य आहे. म्हणून बंधमुक्त होऊं पाहणाऱ्या स्वैर विवाहितांना ह्या कायद्यापासून कांहीं एक फायदा होणार नाहीं. कांहीं प्रसंगीं विवाहित तरुण स्त्रीची करुणास्पद स्थिति होते; अशा वेळीं तिला ह्या नवीन कायद्याचा उपयोग करतां येईल. घटस्फोटाचा कायदा झाल्यामुळें घटस्फोट पुष्कळ होतील आणि समाजाचा नाश होईल, अशी भीति कित्येकांना वाटते; परंतु ती अल्पांशानें सुद्धां सयुक्तिक आहे, असें म्हणतां येणार नाहीं. घटस्फोटाचा कायदा, सर्वांनीं घटस्फोट करावा, हें सांगण्याकरितां केलेला नाहीं. समाजांतील ज्या व्यक्तींना कांहीं मानीव अथवा पारंपारिक समजुती नडतात, त्यांतून त्यांची इच्छा असल्यास त्यांना सुटतां यावें, अशी सोय करणें सरकारचें कर्तव्य आहे. घटस्फोटाचें साधन उपलब्ध असलें तरी सुद्धां त्याचा उपयोग करणें बायकांना परवडण्यासारखें नाहीं. तसें करणें शक्य असतें तर घरोघरीं विवाहविच्छेदन झालेलें दृष्टोत्पत्तीस येतें. स्त्रियांची निसर्गतःच असलेली असहाय स्थिति, असमाहित पतिपत्नींना देखील सारख्याच प्रमाणांत बद्ध करणारा मुलांचा प्रेमपाश व घटस्फोटोत्तर, दुःखाचा परिहार आणि सुखाचा लाभ ह्याविषयीं अनिश्चिति इत्यादि कारणांस्तव योग्य कारण असतांहि घटस्फोट करणें कोणत्याहि विचारी पतिपत्नींच्या मनांतहि येतां कामा नये. एतावता घटस्फोटाच्या कायद्यानें घटस्फोटास उत्तेजन मिळेल, हें म्हणणें निराधार वाटतें. म्हणून ह्या कायद्याच्या योगानें विशिष्ट मनोवृत्तीच्या लोकांस






आनंदित होण्याचेंहि कारण नाहीं. एकाद्या दुर्दैवी करुण स्थितींतील स्त्रीला "माझ्याकरतां समाज कांहींच करीत नाहीं" अशी तक्रार करण्यास जागा राहूं नये, एवढेंच कार्य ह्या कायद्याच्या योगानें साध्य होणार आहे.

## कायद्याचें सामान्य स्वरूप

ह्यानंतर, कायद्याचें सामान्य स्वरूप काय आहे, त्याचा आपण परिचय करून घेऊं. कारण त्यांत आपणांस वरील विधानांना पोषक असा प्रत्यंतर पुरावा मिळूं शकेल. हा सतरा कलमी कायदा गेल्या मे महिन्यांत अमलांत आला. हा सर्व हिंदूंना लागू आहे. ह्या कायद्यान्वयें पतिपत्नींपैकीं कोणालाहि घटस्फोटाची फिर्याद डिस्ट्रिक्ट कोर्टांत करतां येते. फिर्याद करणाऱ्या वादीस प्रतिवादी हा नपुंसक आहे; अथवा फिर्यादीपूर्वी सतत चार वर्षें त्यास वेड लागलें आहे; अथवा तो सात वर्षांचा महारोगी आहे; अथवा सतत चार वर्षें प्रतिवादीनें वादीला सोडून दिलें आहे; अथवा प्रतिवादी सात वर्षेंपर्यंत बेपत्ता आहे; अथवा प्रतिवादी पति असल्यास त्यानें एकादी भोगस्त्री ठेवली आहे; अथवा पत्नी असल्यास ती परपुरुषाची भोगस्त्री म्हणून राहिली आहे—इतक्या गोष्टी सिद्ध कराव्या लागतात; व एवढ्याच कारणांस्तव घटस्फोट वादीला मिळूं शकतो. शेवटलें कारण सोडलें, तर वरील कारणें फारच थोड्या ठिकाणीं आढळतील. म्हणून हीं कारणें पुढें करून घटस्फोट मागण्याचा प्रसंग क्वचितच येणार, हें उघड आहे. नवऱ्यानें एकादी बाई ठेवली असली, तर त्यामुळें बायकोला घटस्फोट मागतां येतो. हीं बाब अधिक महत्त्वाची आहे. परंतु ह्यापेक्षां अधिक उपयुक्त बाब आणखी आहे, ती म्हणजे बहुभार्याप्रतिबंधक कायदा होण्यापूर्वी जर नवऱ्यानें दुसरें लग्न केलें असलें, तर पहिल्या बायकोला घटस्फोट मागतां येतो. बहुभार्याप्रतिबंधक कायदा करतांना कांहीं उदाहरणें कायदे करणाऱ्यांच्या डोळ्यासमोर होतीं, ह्यांत शंका नाहीं. त्यांपैकीं किती धर्मपत्नींकडून ह्या कलमाचा उपयोग केला जातो, हें पाहण्यासारखें आहे. अद्यापि तरी ह्या कलमाचा फायदा करून घेण्याचा, नवऱ्यानें ज्यांच्या गळ्यांत सवतीचें लोढणें अडकाविलें आहे, त्यांनीं प्रयत्न केल्याचें ऐकिवांत नाहीं. चार-पांच मुलें झाल्यानंतर घरांत सवत आली असतां घटस्फोट मागणें स्त्रियांना हितावह होत नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. कायद्यानें निर्माण केलेले हे उपाय प्रत्यक्ष अमलांत येणें जरी कठीण असलें, तरी अप्रत्यक्षपणें ते कार्यभाग साधतील असा संभव दिसतो. एक बायको हयात असतां दुसरें लग्न करणें आतां कायद्यानें निषिद्ध ठरविलें असल्यानें कालांतरानें कायद्यानें केलेली ही योजना निरुपयोगी ठरणार, हें उघड आहे. आणि ज्यांच्याकरितां बहु-भार्याप्रतिबंधक कायदा करावा लागला, त्या तर त्याचा फायदा करून घेण्यास नाराज असतात. तथापि एका पुरुषानें भोगस्त्री ठेवली तर धर्म-पत्नीला जो घटस्फोटाचा हक्क दिला आहे, त्या योगानें रक्षा ठेवण्याच्या मार्गांत कायद्यानें विघ्न आणल्यामुळें बिनधोकपणें इतःपर उपास्त्रिया ठेवल्या जाणार नाहींत, असें अनुमान करणें अगदींच अयु-क्तिक होणार नाहीं.

ह्याखेरीज घटस्फोटाला आणखी एक पायबंद कायदे करणाऱ्यांनीं घालून ठेवला आहे. सज्ञान झाल्या-नंतर ज्यांनीं आपलें विवाहित जीवन वीस वर्षें-पर्यंत परस्परांच्या समागमांत व्यतीत केलें, त्यांना कोणत्याहि कारणानें घटस्फोटाची फिर्याद करण्यास कायद्यानें मनाई केली आहे. हा निर्बंध अयोग्य आहे, असें कोण म्हणेल ? स्त्रीपुरुषांना घटस्फोट सुलासुली मिळण्यासारखा नाहीं, हें योग्यच झालें. घटस्फोटांना उत्तेजन देण्याचा कायदे कर-णारांचा हेतु नव्हता, हें ह्यावरून सिद्ध होण्यासारखें आहे. प्रसंगीं उपयोगीं पडण्याकरितां विधिमंडळानें स्त्रियांना एक हत्यार करून दिलें आहे, इतकेंच.

## विभक्त रहाण्याची योजना

ह्या कायद्याला घटस्फोटाचा कायदा असें जरी नांव दिलेलें असलें, तरी घटस्फोट न मागतां पति-पत्नींना विवक्षित कारणाकरितां विभक्त रहातां यावें, अशी योजना ह्या कायद्यांत केली आहे. महा-रोगाची व्यथा झाली असतां पतिपत्नींपैकीं कोणा-लाहि फिर्याद करतां येते. बायको वेश्याव्यवसाय करूं लागली अथवा परपुरुषाचा तिनें अंगीकार केला, तर नवऱ्याला फिर्याद करतां येते.








बायकोनें नवऱ्यावर अशाच स्वरूपाचा दावा करणें झाल्यास तिला खालीलपैकीं एक तरी गोष्ट सिद्ध करावी लागेलः (१) बहुभार्याप्रतिबंधक कायदा होण्यापूर्वीं नवऱ्यानें दुसरें लग्न केलें, (२) नवऱ्यानें रखेली ठेवली, (३) कायद्याला संमत असलेलें निर्दयपणाचें कृत्य केलें—ह्यांपैकीं एक गोष्ट शाबित झाल्यास बायकोच्या वतीनें कोर्टाला निकाल करावा लागेल.

ह्यावरून असें दिसून येईल कीं, ज्या कांहीं कारणांवरून घटस्फोट मागतां येतो, त्याच कारणांवरून विभक्तपणाचा दावा मांडतां येतो.

पैशाशिवाय दावा लागणार नाहीं आणि पुरुषांप्रमाणें बायकांच्या हातीं पैसा असेलच, असा नियम नाहीं. ही अडचण ओळखून दावा चालविण्यास लागणऱ्या खर्चाची रकम आणि फिर्यादीचा निकाल होईपर्यंत बायकोच्या चरितार्थासाठीं कांहीं रकम नवऱ्याकडून देवविण्याचा अधिकार कायद्यानें कोर्टाला दिलेला आहे.

अखेरीस घटस्फोट देतांना अथवा विभक्तपणाचा हुकूम करतांना अन्नवस्त्राकरतां म्हणून बायकोला योग्य ती रकम देण्याचा हुकूम कोर्टाला करतां येतो. मुलें असल्यास तीं कोणाच्या स्वाधीन करावयाचीं व त्यांच्या चरितार्थाची, शिक्षणाची आणि लग्नाची कशी तरतूद करावयाची, ह्याविषयींचा हुकूम करण्याला कोर्टाला अधिकार आहे. बाकी किरकोळ गोष्टी सोडल्या तर हेंच कायद्याचें ढोबळ स्वरूप आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्यापुढें ह्या कायद्याच्या गुणदोषांचें अधिक सूक्ष्मपणानें विवेचन करणें आवश्यक आहे; तिकडे आतां आपण वळूं.

## ‘हिंदूं’त कोण समाविष्ट ?

हा कायदा फक्त हिंदूंना लागूं आहे; तथापि हिंदू शब्दाची व्याख्या कोठेंहि केलेली नाहीं. कित्येक गोष्टी अशा असतात कीं, त्यांची व्याख्या जरी आपणांस करतां आली नाहीं, तरी त्यांचें ज्ञान आपणांस होतें. हिंदू हा शब्द त्यांपैकींच समजला जातो. म्हणून जेथें जेथें हिंदू शब्द वापरण्यांत येतो, तेथें तेथें हिंदू शब्दाची व्याख्या करण्याच्या भरीस न पडतां हिंदू शब्दांत कोणाकोणाचा अंतर्भाव होतो, एवढेंच सांगण्याचा प्रघात आहे. तदनुसार ह्या कायद्यांत सुद्धां शीख, जैन, बौद्ध, आर्यसमाजी व ब्रह्मसमाजी ह्यांचा समावेश होतो, असें नमूद केलें आहे. माझ्या मतें ह्यांच्याच जोडीला भावी अनर्थ टाळण्यासाठीं अस्पृश्य व आदिवासी ह्यांचाहि स्पष्टपणें निर्देश करावयास पाहिजे होता.

## घटस्फोट कीं वियोजन ?

ह्या कायद्याला घटस्फोट हा शब्द मराठींत उपयोगांत आणलेला आढळतो. परंतु घटस्फोटाची जुनी कल्पना थोडी निराळी आहे. एकादा पुरुष अथवा स्त्री ही अधर्माचरणानें पतित झाली असतां घटस्फोट करण्याची वहिवाट हिंदु समाजांत आहे. तथापि ह्या घटस्फोटानें पतित माणसाचा सर्व कुलाशीं असलेला संबंध तुटतो. इंग्रजी डायव्होर्स शब्दानें फक्त पतिपत्नींचें नातें तोडलें जातें. ह्यापेक्षां घटस्फोट शब्द सोडून वियोजन शब्द वापरणें बरोबर होईल. लग्नानें निरनिराळ्या स्त्रीपुरुषांचें संयोजन होतें, तेव्हां त्यांची ताटातूट म्हणजे वियोजन होय.

## वियोजनाला कारणें

वियोजनार्थ जीं कारणें दिलीं आहेत, त्यांत नपुंसकत्व हें पहिलें कारण आहे. हें नपुंसकत्व विवाहाच्या वेळेस असलें पाहिजे आणि तें फिर्यादीपर्यंत सारखें टिकलें पाहिजे. ही शर्त घालण्याचा काय हेतु असावा, हें समजत नाहीं. परंतु ह्या शब्दयोजनेनें कायदा करण्याचा हेतू मात्र विफल होण्याचा संभव आहे. लग्नाच्या वेळेस म्हणजे केव्हां, ह्याचें स्पष्टीकरण कायद्यांत नाहीं. लग्नाच्या वेळेस मुलगी लहान असल्यास, ऋतुस्नात झाली नसल्यास, पुढें त्या मुलीनें लग्नाच्या वेळेस माझा नवरा नपुंसक होता हें कसें सिद्ध करावयाचें, ह्याची कल्पनाहि करतां येत नाहीं. युद्धासारख्या प्रसंगीं घाईघाईनें नुसता विधि उरकून घेऊन पुष्कळ विवाहित पुरुष नोकरीवर जातात, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. अशा वेळेस मुलगी उपवर असली, तरी सुद्धां लग्नाच्या वेळेस असावयास पाहिजे, तो नपुंसकत्वाचा दोष शाबित करतां येणार नाहीं. बरें, लग्न झाल्यानंतर पुढें कांहीं काळ पुरुषाच्या नपुंसकत्वाचा अनुभव







पत्नीला मिळाला, अशी आपण कल्पना करूं. परंतु कांहीं कारणानें वर्ष–दोन–वर्षांत जर पत्नीची गांठ पडली नाहीं, तर त्या काळांत सुद्धां हें व्यंग कायम होतें, ह्याबद्दल कोर्टांची खात्री करणें अशक्य आहे. मूळ कायदा इंग्रजी असल्यामुळें 'इंपोटंट' हा शब्द वापरला आहे. ह्याचे संभोगविषयक अक्षमता व संतत्युत्पादनविषयक सामर्थ्यहीनता असे दोन अर्थ होतात. कायदे करणाऱ्यांना दोनहि अभिप्रेत आहेत अथवा ह्यापैकीं एकच अभिप्रेत आहे, हें समजण्यास मार्ग नाहीं. कायद्यानें ह्याचा खुलासा करणें अवश्य होतें. नपुंसकत्व हें कारण नवऱ्यालाहि बायकोवर फिर्याद करण्याला उपयोगी पडतें. ह्या ठिकाणीं तर नपुंसकत्व हा शब्द अधिकच घुचकळ्यांत पाडणारा होणार आहे.

वेड हें दुसरें कारण आहे. फिर्यादीपूर्वी सात वर्षें पतिपत्नींपैकीं कोणी वेडा असेल, तर वियोजनाचा दावा आणतां येतो. ह्याबद्दल विशेष कोणी तक्रार करणार नाहीं. परंतु वेड नसून पतिपत्नींपैकीं कोणी खुळचट असल्यास कोणालाहि दावा आणतां येतो. खुळचटपणाला दुसरी अट ठेवली नाहीं. इंग्रजी 'इडिअट' शब्दाचें 'खुळचट' ह्या शब्दानें मी भाषांतर केलें आहे. कोर्टांतून कोण मनुष्य खुळचट ठरविला जाईल, हें आधीं कोणास सांगतां येणार नाहीं. इतकी अनिश्चिति ह्या शब्दाबद्दल आहे. ह्या कायद्यांत यत्किंचितहि मार्गदर्शन नसल्यामुळें निरनिराळ्या हायकोर्टांचे निरनिराळे ठराव होतील आणि ते परस्परविरुद्धहि असतील. हा अनवस्थाप्रसंग टळणें जवळजवळ अशक्य आहे.

नवऱ्यानें एखादी बाई ठेवली तर पत्नीला विवाहवियोजन मागण्याचा हक्क दिलेला आहे.

## कांहीं भानगडीचे प्रश्न

बहुभार्याप्रतिबंधक कायदा केल्यामुळें कोणत्याहि पुरुषानें ठेवलेल्या रखेलीवर कायद्याचा कटाक्ष असणें स्वाभाविक आहे. परंतु नैतिक दृष्ट्या रखेली ठेवण्यापेक्षां व्यभिचार करणें फार मोठें पाप मानलें जातें. परंतु आमच्या विधिमंडळाला तसें वाटत नाहीं, असें दिसतें. कारण व्यभिचार हें विभक्तपणा अथवा वियोजन मागण्याला योग्य कारण मानलेलें नाहीं. त्याचा अर्थ कायद्याला व्यभिचार खपतो पण रखेली ठेवणें खपत नाहीं. नवऱ्यापासून निराळें राहण्याला व्यभिचार हें योग्य कारण आहे, असें सामान्य मनुष्य मानतो. केव्हां तरी कायद्यांत दुरुस्ती होऊन व्यभिचार हें, वियोजनाला नसलें तरी विभक्त राहण्याला, पुरेसें कारण मानलें जाईल, अशी आशा वाटते. कायद्यामुळें बायकोला नवऱ्याचा व्यभिचार सहन करावा लागतो, मग त्याचें बाहेरख्याली वर्तन सहन करावें लागल्यास नवल नाहीं. बाहेरख्यालीपणा म्हणजे वेश्यागमन, रंडीबाजी (व्यभिचार नव्हे), हेंहि बायकोला नवऱ्याविरुद्ध दाद मागण्याला कायदा योग्य कारण समजत नाहीं.

विवाहित स्थितींत वीस वर्षांचा काल गेल्यानंतर घटस्फोटाची दाद मागण्याला प्रतिबंध करणें हें अगदीं योग्य आहे. परंतु त्याला कायद्यांत जे दोन अपवाद घातलेले आहेत, त्यांचें रहस्य लक्षांत येण्याजोगें नाहीं. पतिपत्नींपैकीं एकानें दुसऱ्यास सोडून दिलें असतां वीस वर्षांचा काळ होऊन गेल्यावर सुद्धां कोणालाहि घटस्फोटाचा दावा आणतां येतो. एवढी घटस्फोटाची हौस विधिमंडळाला वाटते, हें आश्चर्य आहे. कारण कायद्याचें एकंदर स्वरूप सहजासहजीं घटस्फोट मिळण्याला उत्तेजन देणारें नाहीं. नवऱ्यानें बायकोला सोडली असल्यास तिला अन्नवस्त्र मागण्याचा हक्कच आहे. घटस्फोट मिळाल्यानें तिची स्थिति अधिक सुधारेल असें कायदेमंडळाला वाटतें कीं काय, हें समजत नाहीं. कदाचित् परित्यागाचा सूड म्हणून पैसा व घटस्फोट दोनाहि बायकोला मिळवून देण्याची तजवीज कायद्यानें केली असावी. वीस वर्षांनंतर बायकोनें नवऱ्यास सोडलें असतां त्यालाहि घटस्फोटाची दाद बायकोविरुद्ध मागतां येते. त्यामध्यें त्याच्या दुसऱ्या लग्नाची सोय कायद्यानें करून दिलेली दिसते. क्वचित् प्रसंगीं ह्या सवलतीचा फायदा कांहीं स्त्रियांना होण्याचा संभव दिसतो. उदाहरणार्थ, पुरुष बायको न आवडल्यानें दुसरें लग्न करतो. पहिल्या बायकोला साहजिकच मास्तरीण, दाई वगैरे सारखी नोकरी पत्करून काळ लोटणें भाग पडतें. नवरा तिची वास्तपुस्त करीत नाहीं. बायकोहि नवऱ्याकडे आत



अनुक्रमणिका






नाहीं. अशीं बरींच वर्षें गेल्यानंतर पाहिली बायको मयत झाल्यास नवरा ह्या परित्यक्ता स्त्रीवर आपल्या नवरेपणाचा हक्क गाजवूं लागतो. अशा स्थितींत बायकोला घटस्फोट मागणें सोयीचें होईल. घरांत काम करणाऱ्या बाईशीं नवऱ्याचा अनैतिक संबंध असल्यास त्या बाईला रखेली म्हणून संबोधतां येईल काय, हाहि एक वादग्रस्त प्रश्न उत्पन्न होणार आहे.

ह्या कायद्याखालीं येणाऱ्या दाव्यांचा निकाल करण्याचा अधिकार डिस्ट्रिक्ट जज्जाला देण्यांत आला आहे. माझ्या मतें नवराबायकोमधील तंटे इतक्या नाजूक स्वरुपाचे असतात कीं, उघड्या अथवा बंद कोर्टांत जरी साक्षीपुरावा घेतला तरी सुद्धां अशा प्रकारचे निकाल डिस्ट्रिक्ट जज्जानें स्वतः न करतां त्यानें जिल्ह्यांतील साठी उलटलेले असे दोन पुरुष व एक स्त्री ह्यांचें एक कोर्ट निर्माण करून व त्यांना चौकशीचा अधिकार देऊन ह्यांचा अभिप्राय मागाविणें अधिक सोयीचें व हितावह झालें असतें. सगळ्याच दाव्यांत नसलें तरी कांहीं दाव्यांत डिस्ट्रिक्ट जज्जानें आपल्या मदतीस बिनसरकारी इसमांची मदत घेण्याचा अधिकार डिस्ट्रिक्ट जज्जाला देणें इष्ट होईल.

अनेक हिंदु जातींत काडीमोड देण्याचा रिवाज आहे. त्या वहिवाटीला कायद्याची बाधा येणार नाहीं, असें कलम कायद्यांत घातलें आहे. त्याच्या परिणामाकडेहि आपलें लक्ष गेलें पाहिजे. कित्येक जातींत पंच काडीमोड देतात. कित्येक जातींत नवऱ्याकडूनच सोडचिठ्ठी मिळते. ह्या ज्या निरनिराळ्या वहिवाटी, त्या सर्व पूर्वीप्रमाणेंच कायम ठेवल्यानें कोर्टांत जाण्याकरितां कायदा निराळा व वहिवाटीनुसार घटस्फोट मिळण्याचा कायदा निराळा, असें होणार आहे. ज्या जातींत सोडचिठ्ठीची चाल आहे, त्या जातींतील इसमांना कोर्टाकडून दाद लावून घेतां येणार नाहीं, असें नाहीं. बहुतेक ठिकाणीं नवऱ्याला सोडचिठ्ठी देतां येत असली, तरी बायकोला ती हक्कानें मागतां येत नाहीं. अशी स्थिति जेथें असेल, तेथें बायकोला कोर्टाचा आश्रय घ्यावा लागेल असें दिसतें. जेथें जात सोडचिठ्ठी देते तेथें ठरीव कारणाकरितां सोडचिठ्ठी दिली पाहिजे, असें जातीवर कोणत्याहि प्रकारचें बंधन नाहीं. अर्थात् कोर्टांत जाण्यापेक्षां जातगंगेची पायधरणी करणें स्त्रियांना फायद्याचें होईल. वस्तुतः जमातीला जो हक्क आहे त्या हक्काची बजावणी न होण्याला विशेष कारण दिसत नाहीं. सोडचिठ्ठी देणें अगर न देणें हें जमातीच्या लहरीवर न ठेवतां कोर्टाकडे सोपविण्यांत कांहीं गैर नाहीं. कोर्टाला तो अधिकार आपोआप प्राप्त झाला पाहिजे.

वियुक्त स्त्रीला तिच्या पूर्वपतीच्या निकट आप्तांशीं पुनर्विवाह करितां येईल काय, हाहि एक प्रश्न कांहीं वरच्या जातींसंबंधानें उत्पन्न होणार आहे. कित्येक कनिष्ठ जातींत असा संबंध करितां येतो. परंतु ब्राह्मणादि वरिष्ठ जातींत विवाहानें स्त्री पतीच्या गोत्रांत जाते, तिचें पित्याचें गोत्र सुटतें. हीच स्थिति कायम राहिल्यास पतिगोत्राशीं तिचा पुनः संबंध होणें शक्य दिसत नाहीं. का वियोजनानंतर स्त्री परत पितृकुलांत जाते असें समजावयाचें? संतति नसलेल्या स्त्रीच्या संबंधानें अशी कल्पना करणें शक्य होईल. परंतु मुलें असल्यास तसें मानण्यास अडचण पडणार आहे.

तात्पर्य, ह्या कायद्यानें अनेक भानगडीचे प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे. त्यांचा साकल्यानें विचार झाला पाहिजे.












# चिप्सच्या आठवणी

**ले.—जेम्स हिल्टन***

**अनुवादक—वि. द. साठे**

आयुष्य उतरणीला लागलें म्हणजे--तसं तुम्हाला कांहीं दुखणंबाणं नसतांनाहि—कधीं कधीं डोळ्यावर अशी कांहीं झांपड येते कीं कांही विचारूं नका. आणि मग अशा वेळीं काळ, कसा आळसावलेल्या गुरासारखा रेंगाळत दृष्टिपथावरून जात राहतो. चिप्सचं अगदीं अस्सं होई. शरदृतूंत दिवस लहान व्हायचा आणि मुलांची संध्याकाळची हजेरी होण्याच्या आंतच दिवेलागणीची वेळ व्हायची. पण अशावेळीं चिप्स आपल्या पूर्वायुष्यांतील मोज-मापानेंच दिवसाचे तास आंखायचा. एकादा नाविक नाहीं का सेवानिवृत्त होऊन घरीं आला, तरी समुद्रावरच्या खुणाच जमिनीवर न्याहळण्याचा प्रयत्न करीत! पण चिप्सच्या बाबतींत असं होणं अगदीं साहजिक होतं. तो रहात असे विकेट्सबाईच्या घरीं आणि तें घर शाळेपासून जेमतेम हांकेच्या अंतरावर होतें.

ब्रूकफील्डच्या शाळेंतल्या नोकरीला शेवटला ‘ रामराम ’ ठोकल्यापासून गेलीं दहाबारा वर्षें तो तेथेंच रहात असे. बाहेरच्या जगांत ग्रीनिचची वेळ असे बापडी, पण इथें मात्र ब्रूकफील्डचीच वेळ चालायची! तीं दोघेंहि ब्रूकफील्डशाळेच्या वेळोवेळीं होणाऱ्या घंटांच्या अनुरोधानेंच आपलीं घड्याळें लावीत. आणि सकाळच्या वेळीं चिप्स् आपल्या कांपऱ्या तार स्वरांत— (आणि गंमत अशी कीं त्यांतील तो जुना तजेला अजूनहि कमी झालेला नव्हता!) विकेट्सबाईना आर्जवानें म्हणे. “ विकेट्सबाई, गृहपाठाची घंटा होण्यापूर्वीं कपभर चहा हवा बुवा आपल्याला? आणतां ना मग? ”

उतार वयांतल्या या सुखाचा अनुभव तुम्हीं कधीं घेतला आहे कां? कीं आपण शेगडीच्या उबेंत गरम-गरम चहा घेत असावें आणि एकीकडे शाळेच्या वसतिगृहांतून भोजनाच्या, हजेरीच्या, गृहपाठाच्या

---

* जेम्स हिल्टनच्या “गुडबाय, मि. चिप्स!” या अत्यंत लोकप्रिय इंग्रजी पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणाचा
प्रस्तुत लेख हा अनुवाद आहे. जेम्स हिल्टन यांनीं या पुस्तकांत अवलंबिलेलें कलातंत्र अत्यंत हृदयंगम असें आहे.
चिप्स हे एक शिक्षक आहेत. ब्रुकलीन गांवच्या शाळेंत ते २२ व्या वर्षीं शिक्षक म्हणून लागतात. व त्याच शाळें-
तून सत्तरीच्या सुमाराला सेवानिवृत्त होतात. सेवानिवृत्त होऊन ब्रुकलीन गांवांतच त्यांनीं आपल्या अंतकालापर्यंत
१५ वर्षें वास्तव्य केलें आहे. शाळेच्या समोरच मध्यें रस्ता टाकून असलेल्या मिसेस विकेट्स बाईच्या घरीं ते रहात
आहेत. मिसेस विकेट्स पूर्वीं त्यांच्या छात्रालयांत कांहीं वर्षें काम करीत होत्या. घरबसल्या चिप्सना शाळेच्या घंटा,
मुलांची हजेरी वगैरे ऐकूं येत असतात. शाळेच्या मुलांपैकीं कोणी ना कोणी चिप्स गुरुजीकडे चहाला आलें नाहीं,असा
एकही दिवस जात नाहीं. चिप्स हे शाळेमधून जरी सेवानिवृत्त झाले असले तरी मनानें, वृत्तीनें शाळेतच आहेत.
इतके ते शाळेच्या जीवनाशीं समरसून गेले आहेत. घरीं शेगडीशीं बसलें असतानां वृद्ध चिप्सच्या मनश्चक्षूसमोर
शाळेंतील जीवनाच्या नानाविध स्मृति तरळत असतात. त्यांतील वेंचक अशा आठवणी टिपून काढून जेम्स हिल्टन
यांनीं त्या अत्यंत चित्तवेधक शैलीनें चित्रित केल्या आहेत. त्या वाचीत असतानां एका अत्यंत प्रेमळ, निष्ठावंत,
सुस्वभावी, धीरोदात्त अशा शिक्षकाचें मनोरम चित्र आपल्यापुढें उभें रहातें. हें पुस्तक १९३४ सालीं पहिल्यांदा
प्रसिद्ध झालें. १९४५ सालीं त्याची २० वी आवृत्ति निघाली. यावरील आधारलेला इंग्रजी बोलपट कमालीचा
आकर्षक झाला आहे.—का. सं.








आणि झोंपण्याबद्दलच्या सूचना देणाऱ्या घंटा ऐकूं येत असाव्यात ! या घंटांच्या नादांत कित्येक जुन्या आठवणी घरंगळत येऊन आपल्या चित्तांत अेक प्रकारची गोड हुरहूर निर्माण करतात. तिकडे वसतिगृहांतील मुलांना झोंपण्याबद्दल सूचना देणारी घंटा झाली की, इकडे चिपस् आपल्या मेजावरचें घड्याळ उचली व आपल्या थरथरत्या हातानें त्याला किल्ली देई; नंतर तो खालची शेगडी विझवी, गॅस बंद करी व एक कोठली तरी कादंबरी—बहुधा गुप्त हेर विषयकच!—घेऊन बिछान्यावर आडवा होई. आणि बहुधा स्वारीचें जेमतेम एकादें—अर्धेंच पान वाचून होतें आहे न आहे तोंच, निद्रादेवी इतक्या नाजुक पण चपल अशा पावलांनीं येऊन त्याला आपल्या राज्यांत घेऊन जाई कीं, चिपस्ला या बदलाची क्वचित् जाणीव होई. आणि याचें याशिवाय आणखीहि एक कारण म्हणजे अलीकडे रात्रंदिवस तो एक-प्रकारच्या चमत्कारिक स्वप्नाळू जगांतच वावरत असे.

दिवसेंदिवस चिप्सचें वार्धक्य वाढत होतें. अर्थात तो आजारी कधीच नव्हता. आणि डॉ. मॅरीव्हेलच्या मतें तर चिपस्च्या प्रकृतींत दोष काढायला कुठें जागाच नव्हती. दर पंधरा दिवसांनीं डॉ. मॅरीव्हेलची स्वारी चिपस्ची प्रकृति तपासण्यासाठीं येत असे आणि मग त्यावेळीं हातांतल्या ग्लासांतील शेरीचे संथपणें घुटके घेत घेत तो चिप्सला गंमतीनें म्हणे, " तुमची तब्येत माझ्यापेक्षां अगदीं ठणठणीत आहे, बुवा ! आतां यापुढें तुम्हांला कुठलाहि रोग होणें शक्य नाहीं. कारण ज्या वयांत बहुधा हे रोग होतात, त्याच्या पलीकडे तुम्ही गेला आहांत. इतकं चांगलं मरण फारच थोड्यांच्या नशिबीं असतं. बाकी तुम्हाला मरण येईल कीं नाहीं याची सुद्धां मला शंकाच आहे ! हो— तुम्ही म्हणजे एक और 'प्राणी' आहांत ! तुमच्या बाबतींत काय, कांहींही शक्य आहे. खरोखरच, चिपस्, इतक्या उतार वयांतही इतकी चांगली तब्येत असणारीं माणसें अगदीं क्वचितच आढळतात हं ! " परंतु केव्हां केव्हां पूर्वेकडील गार वारे घों घों असा आवाज करीत वाहूं लागत आणि चिप्सला त्या कडक गारठ्यापासून त्रास होऊं लागे; तेव्हां डॉक्टर मिसेस विकेट्सला खुणावून व्हरांड्यांत नेत आणि हलक्या आवाजांत तिला सांगत, " विकेट्सबाई, आज चिप्सची जरा काळजीच घ्या बरं का. आज त्याच्या छातीची परिस्थिति कांहीं ठकि दिसत नाहीं......अर्थात् त्याला तसें कांहीं झालेलें नाहीं, नेहमींचीच तक्रार आहे ! पुराण पुरुष आहे तो ! कुणी सांगावं कधीं काय होईल तें ! वार्धक्य हाच असाध्य रोग ठरतो शेवटीं ! "

पुराण पुरुष ! खरंच ! १८५८ सालीं तो जन्मला. चिप्सच्या वयाचीं फारच थोडीं माणसें ब्रुकफील्डमध्यें होतीं. त्याच्या इतक्या जुन्या आठवणी संग्रहीं असलेला मनुष्य विरळाच. अगदीं लहान असतांना त्या काळीं तें गाजलेलें 'जंगी प्रदर्शन'—त्याला गेल्याचं देखील आठवत असल्याचें तो सांगे. येवढेंच नाहीं तर व्हेदरबीच्या अमदानींतलीं ब्रुकफील्डची शाळा देखील त्याच्या स्मृतींत अजून अगदी ताजी होती. खरोखर त्याचें भांडार म्हणजे एक अजबखानाच होता !

१८७० च्या सुमाराला—म्हणजे चिप्स जेव्हां अवघा बावीस वर्षांचा होता, तेव्हां व्हेदरबी अगदीं थकलेला होता. ब्रुकफील्डला येण्यापूर्वी मेलबरीच्या शाळेंत चिपसनें एक वर्ष काढलें होतें. परंतु मेलबरीच्या त्याच्या स्मृती फारशा सुखद नव्हत्या. कारण तिथें त्याचा फारच फजितवाडा झाला होता. परंतु ब्रुकफील्डच्या शाळेवर मात्र तो पहिल्यापासूनच अगदी खूष होता. त्याची ब्रुकफील्डच्या हेडमास्तराशीं झालेली ती पहिली 'मुलाखत' देखील त्याला स्वच्छ आठवे. जुलै महिना. सगळं वातावरण कसं फुलांच्या सुगंधानें धुंद होऊन गेलं होतं. उल्हासाचें साम्राज्यच सगळीकडे पसरलें होतें जणुं, ऊन लख्ख पडलें होतें, क्रिकेटच्या सामन्यांना तर अगदी ऊत आला होता. ब्रुकफील्ड व बर्नहर्स्ट या दोन शाळांतील एक कसोटीचा सामना त्यावेळीं चालला होता. आणि त्यांतील सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे एका अत्यंत छोट्या गुटगुटीत मुलानें अकल्पितपणें काढलेलें शतक. वास्तविक तसें पाहिलें तर त्यांत चिपसच्या दृष्टीनें आश्चर्य वाटण्यासारखें काय होतें ? कारण दरसाल शाळेच्या चिमुकल्या जीवनांत








तिथल्या छोट्या जीवांच्या दृष्टीनें असें कांहीं तरी अद्भुत घडून येतच असतें. परंतु कां कुणास ठाऊक, ती किरकोळ घटना चिप्सच्या स्मृतींत अगदीं ताजीतवानी होती. चिप्स ज्यावेळीं ब्रूकफील्डच्या शाळेंत रुजू झाला, तेव्हां व्हेदरबी अगदीं थकलेला होता. त्यावेळीं तो जरा आजारीच असे. स्वभावानें तो मोठा उमदा व दिलदार होता. पित्याच्या ममतेनें व आस्थेनें आपल्या हाताखालच्या शिक्षकांना वागवी. परंतु चिप्सला मात्र त्याच्या हाताखालीं काम करण्याचें भाग्य लाभलें नाहीं. कारण चिप्स कामावर रुजू होण्यापूर्वीच, उन्हाळ्याच्या सुट्टींत तो वारला. परंतु चिप्सची व त्याची गांठभेट झाली होती; एवढेंच नव्हे तर संभाषणहि झालें होतें. आणि चिप्सला याबद्दल फार अभिमान वाटे. शेगडीच्या उबेंत तो बसलेला असतांनां ज्या जुन्या आठवणी त्याच्या स्मृतिपथावर रेंगाळत, त्यांपैकीं ती एक होती. त्याला वाटे, व्हेदरबीबद्दल इतकी ताजी व स्वच्छ स्मृति असलेला स्वतः खेरीज जगांत जणूं दुसरा कोणी नाहींच!

आणि त्याची आठवण खरोखरीच किती ताजीतवानी होती! आपण व्हेदरबीच्या खोलींत किंचित् भीतभीतच गेलों आहोंत आणि ते धूलिकणांना दूर सारीत खोलींत घुसलेले सूर्यकिरणांचे झोत—ह्या सर्व बारीकसारीक गोष्टी देखील अगदीं नुकत्याच घडल्याप्रमाणें त्याच्या अंतश्चक्षूंपुढें उभ्या रहात.आणि मग त्याला वृद्ध व्हेदरबीनें केलेला उपदेश स्वच्छपणें ऐकूं येई. "हे बघ चिपिंग" व्हेदरबी म्हणाला "ब्रूकफील्डची परंपरा फार जुनी आहे, आणि तूं येथें अगदी नवा आहेस. परंतु नव्याजुन्याचा पुष्कळदां चांगला समन्वय होऊं शकतो. तूं येथें मनापासून व उल्हासानें काम केलेंस, तर त्याचा तुला योग्य तो मोबदला मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. उगाच ढिलाईनें येथें वागूं नकोस. असं तुला मुद्दाम सांगण्याचं कारण उघड आहे. तुझी मेलबेरीच्या शाळेंतील हकीगत मला कळली आहे. एकंदरींत 'शिस्त' या शब्दाशीं तूं तिथें फटकूनच होतास, म्हणे"

"नाहीं म्हणजे जरा त्याचं थोडसं असं होतं कीं..." चिप्स चाचरत म्हणाला. "तें असो म्हणा, पण अजून तूं फार लहान आहेस. अनुभवानें या साऱ्या गोष्टी जमतील. तुला पुन्हां एकदां चांगली संधि मिळाली आहे. तिचा फायदा घेतल्याशिवाय राहूं नकोस. पाहिल्यापासूनच जरा कडक रहा. म्हणजे आपोआपच तुझा जम बसेल. हीच तर या धंद्यातली खरी मख्खी आहे!"

आणि व्हेदरबीनें सांगितलेली ही गोष्ट अगदी खरी होती. विशेषतः चिप्सला अगदी पहिल्याप्रथम तासावर गेल्याचा तो प्रसंग आठवला कीं, त्याच्या उपदेशांतलि मर्म चट्कन पटे! नवीन अननुभवी शिक्षकाच्या दृष्टीनें अगदी प्रथम वर्गांत प्रवेश करणें म्हणजे एक महाभयंकर दिव्यच असतें! जवळ जवळ अर्ध्या शतकापूर्वीची गोष्ट. सप्टेंबर महिना होता. संध्याकाळची वेळ होती. एका जंगी हॉलमध्यें सर्व मुलें जमलीं होती. आपल्या भक्ष्यावर तुटून पडण्याच्या बेतांत असलेल्या जंगली टोळीवाल्यांप्रमाणें त्यांच्या मुद्रा त्यावेळीं चिप्सला भासल्या. जवळ जवळ पांचशें पोरं होतीं तीं एकंदर. नवीन मास्तराला सतावून सोडणें म्हणजे त्यांच्या हातचा मळ असे. नवीन शिक्षक आला रे आला कीं, त्याचा अगदी खिमा करणें ही त्या शाळेंत अगदी रूढ अशी गोष्ट होऊन बसली होती. आणि त्यांतून चिप्सचें लहान वय, ती अननुभवी व बावरलेली मुद्रा, जुन्या पद्धतीची उंचट कॉलर आणि तोंडावर बावळटपणा आणण्यास मदत करणारी ती गाल—दाढी (ती एक ह्या वेळची फॅशनच होती!)—असा अवतार पहातांच पोरांना अगदीं फावल्यासारखें झालें. त्या पांचशें वांड बेशिस्त पोरांपुढें चिप्स एकाद्या बळी द्यावयास काढलेल्या अजापुत्राप्रमाणें दीनवाणा भासूं लागला. एरवीं एकएकटीं असतांना तीं पोरं इतकीं निष्पाप व निरुपद्रवी वाटत; परंतु वर्गांत तीं सर्व एकत्र जमलीं म्हणजे मात्र एकाद्या निर्दय व वखवखलेल्या लांडग्यासारखीं भासत! चिप्स जेव्हां वर्गांत शिरला व प्लॅटफॉर्मवरील आपल्या खुर्चीवर बसला, तेव्हां एकदम सगळीकडे स्तब्धता पसरली! परंतु ही शांतता अगदीं दांभिक स्वरूपाची—वादळापूर्वीची आहे, ह्याची जाणीव होऊन चिप्स अधिकच बेचैन झाला होता. त्याचा जीव आंतून








# चिप्सच्या आठवणी

अगदीं दडपून गेला होता. परंतु बाह्यात्कारीं मात्र त्यानें अशी मुद्रा धारण केली होती कीं, त्या पोरांना 'हा मास्तर फार उखाड आणि तापट दिसतो आहे', असें वाटावें ! तो जिथें बसला होता, त्या जागेच्या मागें एक भलें मोठें घड्याळ टांगलेलें होतें. किती मोठ्यानें त्याची टिक्टिक् त्यावेळीं होत होती ! दाराखिडक्यांना नुकत्याच लावलेल्या व्हार्निशचा व उघड्या दऊतींतील शाईचा एकप्रकारचा उग्र व आंबूस वास सगळीकडे पसरला होता. मावळत्या सूर्याचे रक्तवर्ण किरण खिडकीच्या तावदानांतून घुसून वातावरणाचा भेसूरपणा अधिकच वाढवीत होते. आणि तेवढ्यांत कोणीतरी डेस्कची फळी खाडकन् आपटली. बहुतेक गोंधळ माजविण्याचा तो पूर्व इषाराच असावा ! परंतु चिप्स्हि आतां कांहीं पूर्वीसारखा ढिला राहिला नव्हता. त्यावेळीं एकदां ढिलं सोडलं, तर हीं पोरं कायमचीं डोक्यावर बसतील, ही त्याची खात्री होती. "तूं पांचव्या ओळींतला तांबड्या केसाचा मुलगा—काय नांव तुझं ? " त्यानें अगदीं अंदाजानें एका मुलाला दरडावून विचारलें.

"कॉली, सर " तो मुलगा चांचरत म्हणाला.

"असं कां !— उद्यां शंभर ओळी शुद्धलेखन लिहून आण " चिप्स्नें शिक्षा ठोठावली !— आणि त्यानंतर मात्र त्या पोरांनीं त्याला कधींच त्रास दिला नाहीं. तेवढ्या त्या एका प्रसंगानेंच त्या वर्गावर त्यानें कायमचा वचक बसविला.

आणि त्यानंतर पुष्कळ वर्षे लोटलीं. तो छोटा कॉली आतां मोठा मनुष्य झाला होता. लंडन शहराचा नगराध्यक्ष म्हणून तो निवडून आला होता. बॅरोनेटची पदवी त्याला मिळाली होती. त्यानें आपला मुलगा— त्याचे केसहि बापाप्रमाणेंच तांबूस होते !— ब्रूकफील्डच्या शाळेंत पाठविला होता.

त्याला चिप्स गंमतीनें म्हणे, " कॉली, मी पंचवीस वर्षांपूर्वी जेव्हां प्रथम येथें आलों, तेव्हां पहिल्यानें जर कुणाला शिक्षा केली असली, तर ती तुझ्या बापाला ! फार वांड होता तुझा बाप आणि तूंहि बापाच्याच वळणावर गेला आहेस. आणि म्हणून तुझ्या बापाला जी शिक्षा मी त्यावेळीं दिली, तीच आज तुलाहि देतों ! " आणि मग त्या चिमुकल्या वर्गांत केवढा प्रचंड हंशा पिकला !—आणि छोट्या कॉलीनें ही सर्व गंमतीची हकिगत जेव्हां आपल्या वडिलांना कळविली, तेव्हां त्यांची तर अगदी हंसता हंसता पुरेवाट झाली !

यानंतर पुष्कळ वर्षे लोटल्यावर या सर्वांवर अगदीं कडी करणारी अशी गंमतीची गोष्ट घडून आली. कॉली नांवाचाच अेक नवीन मुलगा शाळेंत आला होता. पहिल्यानें ज्याला चिप्सनें शिक्षा ठोठावली होती, त्या कॉलीचा जो मुलगा त्याचा हा मुलगा होता !

हा जेव्हां शाळेंत आला तेव्हां चिप्स अगदीं पार थकून गेला होता. शब्दांना चमत्कारिक हिसके देत तो आताशीं बोलत असे. दांत पडलेले असल्यामुळें ' यम् यम् ' करीत तो जें बोले, तें संवयीच्या माणसांखेरीज इतरांना कळणें जड जाई ! तो या कॉली नंबर तीनला गंमतीनें म्हणे—" कॉली, यम् ! तूं म्हणजे आनुवंशिक दुर्गुणांचें फार उत्तम उदाहरण आहेस ! मला तुझा आजोबा चांगला आठवतो. त्याला केव्हाला कितीहि उरस्फोड केली तरी पंचमी विभक्ति म्हणजे काय, तें कधींहि कळलें नाहीं ! आणि तुझा बाप ! त्याला तर मी कधींच विसरणार नाहीं ! तें त्या भिंतीला लागून असलेलें कोपऱ्यातलं डेस्क आहे ना— त्यावर बसायची स्वारी. तेहि आपल्या वडिलांच्या इतकेच विद्वान् होते ! पण, कॉली, माझी खात्री आहे कीं तूं, तुझा बाप व आजोबा या सर्वांत जर कोणी अत्यंत महामूर्ख असेल, तर तो तूं ! "— आणि त्यादिवशीं पोरांनीं हंसून हंसून वर्ग अक्षरशः डोक्यावर घेतला !

खरोखरीच किती सुखद होत्या त्या सर्व घटना! परंतु वाढत्या वार्धक्याबरोबर ही सर्व आनंदी सुखी सृष्टि आपल्यापासून हळूहळू दूर चालली आहे, या कल्पनेनें चिप्स कधीं कधीं अगदीं खिन्न होऊन जाई. शरदृतूंत बाहेर सोसाट्याचें वादळ सुटलेलें असें. दाराखिडक्यांचे आपटल्याचे 'धाडधाड' असे कर्णकठोर आवाज ऐकूं येत असत. आणि अशा वेळीं शेगडीच्या उबेंत बसलेल्या चिप्सचें मन त्या








जुन्या, बऱ्यावाईट स्मृतींच्या हिंदोळ्यावर हवे तसे हेलकावे खाऊं लागे. आणि कांहीं कांहीं वेळां या जुन्या स्मृतींशीं तो इतका एकतान पावे कीं, त्याच्या डोळ्यांतून टपटप् अश्रू गळूं लागत. आणि तो अशा स्थितींत असतांना त्याच्याकरितां चहा घेऊन आलेल्या मिसेस विकेसट्ना कोडें पडे कीं, चिप्सच्या डोळ्यांतून चमकणारे अश्रू आनंदाचे आहेत कीं दुःखाचे! आणि स्वतः खुद्द चिपसला तरी तें कुठें निश्चितपणें सांगता आलें असतें!!

---

## *** इतिहासांतील खरे वीर

" मी जर इतिहास लिहायला घेतला तर लष्करी विजेत्यांची मी प्रशंसा करणार नाहीं. इतिहासाचा तात्पर्यार्थ बघतां खरे जेते वीर तेच कीं, ज्यांनीं आंतील वा बाहेरील तिमिर नष्ट करण्याकरितां कांहीं करून दाखविलें—बुद्ध, सॉक्रेटिस, आर्किमिडीस, गॅलिलिओ, न्यूटन् हे आणि ज्यांनीं ज्यांनीं आपणांस आपल्या स्वतःवर व निसर्गावर प्रभुत्व मिळविण्यास मदत केली ते सर्व! "

बर्ट्रंड रसेल–

---

## *** लोकशाहींतील दोष—

" लोकशाहींत अनेक गुण असतील, पण तिच्यांत एक मोठा दोष आहे! आणि तो म्हणजे तिच्यांत असलेला लोकमतानुवर्तित्वाचा अभाव! "

जी. के. चेस्टर्टन.

---








# आजच्या धान्यपरिस्थितीवर उपाययोजना.

ना. रा. कृ. पाटील, अन्नमंत्री, मध्यप्रांत–वऱ्हाड.

नियंत्रणें म्हटलीं कीं, तीं कोणालाहि आवडत नाहींत व जगाची साधारण व्यवहाराची रीत नियंत्रणाची नसून खुल्या व्यापाराची आहे. असें असून सुद्धां कांहीं अडचणींतून पार पडण्याकरितां किंवा विशिष्ट हेतु साध्य करण्याकरितां नियंत्रणाची जरूरी असते. ही कसोटी लावून सध्याच्या धान्याच्या व्यापारावरील सरकारी नियंत्रण रास्त आहे कीं गैर आहे व त्याचे काय परिणाम होत आहेत, ह्याचा विचार केला पाहिजे.

## नियंत्रणापूर्वीच्या परिस्थितीशीं तुलना

सुरुवातीसच सध्याचें धान्य नियंत्रण कां व कसें झालें, ह्याचा आपण विचार करूं. कारण नियंत्रणाची आर्थिक योजनेकरितां ( Economic planning करितां ) जरूरी असल्यामुळें बरेच लोक ह्यांचा आर्थिक योजनेशीं कार्यकारणसंबंध जोडीत असतात व म्हणून त्यांना तीं हवींशीं वाटतात. परंतु सध्या जें धान्यनियंत्रण आपल्या देशांत आहे, तें कोणत्याहि आर्थिक योजनेच्या पूर्तीकरितां आलेलें नाहीं. त्याचा तसा उपयोग होऊं शकतो ही गोष्ट निराळी; परंतु आज तशी कल्पना हिंदुस्थानसरकारपुढें नाहीं व आजच्या धान्यनियंत्रणाच्या बुडाशीं कोणतीहि आर्थिक योजना नाहीं. या नियंत्रणाचा मूळ उद्देश आज सर्व लोकांना नियंत्रित भावांत आपल्या पोषणापुरतें धान्य मिळावें येवढाच आहे व त्याच दृष्टीनें आजच्या नियंत्रणाच्या उपयुक्ततेचा विचार केला पाहिजे.

या लेखाच्या शेवटीं दिलेल्या कोष्टक नं. १ मधील आंकडे सरकारी दफ्तरांतील आहेत व यांच्यापेक्षां अधिक खात्रीलायक आंकडे कोठेंहि मिळूं शकत नाहींत. त्यावरून आपणांस असें दिसून येईल कीं, ३७–३८ ते ४१–४२ ह्या पांच वर्षांतील हिंदुस्थानांतील धान्याच्या उत्पादनाचें (आयात माल धरून) प्रमाण काढलें, तर तें ४२–४३ ते ४६–४७ ह्या पांच वर्षांतील सरासरीच्या मानानें जवळ जवळ १९ लक्ष टनांनीं कमी पडतें. व आज परदेशांतून येवढें जास्त धान्य (२० लक्ष टन) आल्याशिवाय आपल्या देशांत फार मोठा दुष्काळ होईल, असें आपण समजतों. म्हणजे ३७–३८ ते ४१–४२ या पांच वर्षांत धान्याची परिस्थिति आजच्यापेक्षां कितीतरी वाईट असून सुद्धां या पांच वर्षांत हिंदुस्थानांत रेशनिंग नव्हतें, धान्यनियंत्रण नव्हतें, भावनियंत्रण नव्हतें व त्यांच्या अभावींसुद्धां आजच्या सारखी अन्नसंकटाची जाणीव नव्हती. बरें, तसें पाहिलें तर पहिल्या पांच वर्षांत आपल्या देशांत दुसऱ्या पांच वर्षांपेक्षां परदेशांतून जास्त धान्य फारच थोडें आलेलें आहे. म्हणजे निव्वळ धान्याच्या उत्पादनाच्या दृष्टीनें विचार केला तर असें दिसेल कीं, आज जरी सर्व नियंत्रणें रद्द केलीं, तरी आपल्या देशांत एवढें धान्य आहे कीं, त्याचें वांटप जर बरोबर झालें तर सर्व लोकांना त्यांच्या नेहमींच्या संवयीप्रमाणें तें पुरेल. पुरेसें मात्र म्हणतां येत नाहीं. आज रेशनिंगमध्यें सुद्धां आम्ही पुरेसें धान्य देत नाहीं. शास्त्रीय दृष्ट्या पुरेसें धान्य माणशीं द्यावयास आपल्या देशाचें उत्पादन आजच्यापेक्षां सव्वापट तरी वाढावयास पाहिजे. म्हणूनच आपला देश बरेच दिवसांपासून अर्धपोटी आहे, अशी आपली तक्रार आहे. ह्या दृष्टीनें विचार केला तर







आज असलेल्या धान्याचें योग्य वांटप कसें होईल, हा प्रश्न आहे.

ह्या विधानाला दोन बाजूंनीं आक्षेप घेतां येईल. एक तर या अवधींत देशाची लोकसंख्या किती वाढली, याचा हिशेब होऊन आज माणशीं धान्य पूर्वींपेक्षां जास्त आहे अगर कमी आहे, याचा विचार झाला पाहिजे. तसेंच पाकिस्तान देश हिंदुस्थानांतून अलग झाल्यानंतर हिंदुस्थानच्या धान्य-परिस्थितींत जें स्थित्यंतर झालें, तें विचारांत घेऊन आजच्या परिस्थितीची जुन्या परिस्थितीशीं तुलना केली पाहिजे. म्हणजेच खरी कल्पना येऊं शकेल. त्याकरितां ह्या लेखाच्या शेवटीं दिलेल्या नं. २ च्या दुसऱ्या कोष्टकाकडे आपण जरा लक्ष पुरवूं.

त्यावरून असें दिसेल कीं, जरी १९३१–३२ सालच्या हिशेबानें हिंदुस्थानांतील धान्याचें माणशीं उत्पन्न बरेंच घसरलें आहे, तरी ३७–३८ ते ४१–४२ या पांच वर्षांत माणशीं जेवढें प्रमाण पडत होतें, तेवढेंच प्रमाण ४२–४३ ते ४४–४५ ह्या तीन वर्षांच्या सरासरींत पडतें. व पुढील दोन वर्षांचाहि हिशेब केला ( त्यांचे आंकडे नाहींत ), तरी तें प्रमाण कमी पडणार नाहीं. म्हणजे वाढत्या लोकसंख्येमुळें धान्याचें माणशीं प्रमाण कमी पडत असल्यामुळें नियंत्रण पाहिजे, हा युक्तिवाद चालूं शकत नाहीं.

## नियंत्रण सुरूं कां झालें ?

येथें असा प्रश्न उद्भवेल कीं असें जर होतें तर नियंत्रणाची जरूरीच काय होती ? व नियंत्रण आलेंच काय म्हणून ? खुल्या बाजारानें तुमचें काम भागलें नाहीं, म्हणूनच ना तुम्ही नियंत्रण आणलें ? मग ज्या परिस्थितीशीं खुला बाजार सामना करूं शकला नाहीं व त्यामुळें नियंत्रणानें काम घ्यावें लागलें, त्या परिस्थितींत असा कोणता बदल झाला कीं, ज्यामुळें पुन्हा खुला बाजार करण्याची आमची तयारी झाली आहे ? हा आक्षेप सकृद्दर्शनींच बरोबर आहे. परंतु मुळांत यांत तथ्य नाहीं. खुल्या बाजारानें लोकांना पोसण्याचें काम भागलें नाहीं, म्हणून नियंत्रण आणलें ही गोष्ट खरी नाहीं. म्हणजे जर नियंत्रण ४२-४३ सालीं चालूं केलें नसतें व खुला बाजार सुरूं ठेवला असता, तर पुढील वर्षांत दुष्काळ, अन्नसंकट, उपासमार व तज्जन्य मृत्यू झाले असते, हें विधान वस्तुस्थितीला धरून नाहीं. नियंत्रण नसतें, तर धान्याचे भाव वाढले असते. परंतु त्याचबरोबर मजुरीचे दरहि वाढले असते व आपल्या जरूरीपुरतें अन्न घेण्याची शक्ति लोकांत राहिली असती. असें असूनसुद्धां कांहीं अन्य कारणास्तव तेव्हां नियंत्रण करणें त्या वेळच्या सरकारला जरूरच होतें व सरकारच्या दृष्टीनें योग्यच होतें. लढाईवर गेलेल्या लोकांना धान्य पुरविण्याची जबाबदारी सरकारवर असल्यामुळें धान्याचे भाव भरमसाट वाढूं न देणें हें जरूरच होतें. नाहीं तर, फौजेचा खर्च सरकारला बाजवीपेक्षां जास्त झाला असता. म्हणून भावनियंत्रण करणें सरकारला जरूर होतें.

त्या बरोबर फौजेकरितां धान्याचा हुकमी सांठा आपल्याजवळ असावा, ह्या हेतूनें व धान्याच्या व्यापाराचा एकमेव अधिकार सरकारच्या हातीं राहिल्याशिवाय भावनियंत्रण कायम राहूं शकत नाहीं—या दोन हेतूंनीं धान्याचें नियंत्रण सरकारनें सुरूं केलें. ह्याशिवाय ते दिवस लढाईचे होते. महागाई जास्त वाढूं देणें व तज्जन्य असंतोषाचें खापर व परिणाम आपल्या माथीं मारून घेणें सरकारला इष्ट नव्हतें. तशांतच बंगालच्या दुष्काळामुळें जनतेंत परिस्थिति काबूंत ठेवण्याच्या सरकारच्या शक्तीविषयीं अविश्वास उत्पन्न झाल्यामुळें नियंत्रण आणून जनतेंत स्थिरता व विश्वास उत्पन्न करणें अत्यावश्यक होतें. म्हणजे नियंत्रणाची जरूरी युद्धजन्य परिस्थितीमुळें होती. धान्याच्या उत्पत्तीच्या किंवा तें मिळण्याच्या ( Availability ) दृष्टीनें नव्हती. असें ठरल्यावर ओघानेंच हें प्राप्त होतें कीं, लढाई संपल्यावर नियंत्रणांची कांहीं जरूरी नसल्यामुळें तीं निघालींच पाहिजेत. १९४५ च्या शेवटीं तेव्हांच्या इंग्रज सरकारच्या मनांत सुद्धां हाच विचार होता. परंतु पुढें येणाऱ्या कॉंग्रेस सरकारवर ही जबाबदारी टाकावी व आपल्या डोक्यावर ही घेऊं नये, ह्या एकाच विचारानें तेव्हांच्या सरकारनें नियंत्रणें काढलीं नाहींत.








# आजच्या धान्यपरिस्थितीवर उपाययोजना

## आजचे अन्नधान्याचे भाव शेतकऱ्यांस परवडत नाहींत !

आतांपर्यंत धान्यपरिस्थितीचा विचार करून त्यामुळें नियंत्रणाची जरूरी कशी नाहीं याचा विचार केला आहे. आतां नियंत्रणापासून तथाकथित फायदे कोणते व नियंत्रणें उठविल्यामुळें गरिबांचें नुकसान होईल, उपासमार होईल, इत्यादि आक्षेपांचा विचार केला पाहिजे. आजच्या धान्यनियंत्रणानें निश्चित भावांत सर्व लोकांना धान्य देण्याचा प्रयत्न होत आहे, ही गोष्ट खरी आहे व नियंत्रण उठल्यावरोबर भावाहि वाढतील हीहि गोष्ट तेवढीच खरी आहे. परंतु आजचे भाव कास्तकारांना (शेतकऱ्यांना) अपुरे आहेत व परवडत नाहींत, या आक्षेपाची वाट काय ? ह्याला जें ठराविक उत्तर देण्यांत येतें तें हें कीं, धान्याच्या भावाची ज्या प्रमाणांत वाढ झाली, त्या प्रमाणांत कापड, साखर, इत्यादि वस्तूंच्या भावाची वाढ झाली नाहीं. या लेखाच्या शेवटीं दिलेल्या नं. ३ च्या कोष्टकावरून हें सिद्ध करण्यांत येत असतें.

परंतु ही बघण्याची दृष्टि व हें समीकरणच चूक आहे. आजचे धान्याचे भाव कास्तकाराला परवडतात कीं नाहीं हें, ते भाव किती पटीनें वाढले हें पाहून, ठरवावयाचें नसून आजच्या कास्तकाराला काय खर्च येतो व तो खर्च ह्या भावांतून निभावतो कीं नाहीं, हें पाहून ठरविलें पाहिजे. ज्यांची वर तुलना करण्यांत आली आहे, त्या वस्तूंतील प्रत्येकीचे भाव ती वस्तु उत्पन्न करण्याला काय खर्च येतो, हें पाहून ठरविलेले आहेत; व त्याच हिशेबानें जर अन्नधान्याचे भाव ठरविले तर आजचे भाव फारच अपुरे आहेत, असें दिसून येईल. यावर असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, जर अन्नधान्याचे भाव वाढले, तर पुन्हां इतर सर्व वस्तूंचे भाव वाढतील व देशांत चलनवाढ ( Inflation ) होऊन किंमती बेसुमार वाढतील. हा आक्षेप भ्रममूलक व भ्रमोत्पादक आहे. भ्रमोत्पादक असा कीं, सध्याचे धान्याचे भाव वाजवी किंवा वाजवीपेक्षां जास्त आहेत, असा सूर ह्यांतून निघतो म्हणून. भ्रममूलक याचें कारण असें कीं, आज जे भाव आहेत ते कोणत्याहि आधारावर बसविलेले नाहींत. आणि हे भाव शेतकऱ्याला परवडत नाहींत व त्यामुळें अन्नधान्याचें पिकाखालील क्षेत्रफळ दिवसेंदिवस कमी होऊन राहिलें आहे, हें 'चक्षुर्वैसत्यं' आहे. पहिल्या कोष्टकावरून सुद्धां हें दिसून येईल. ४०-४१ सालापासून लढाईमुळें जे भाव वाढूं लागले, त्यावरोबर अन्नधान्याची पैदास वाढूं लागली, ती सतत ४२--४३ पर्यंत सारखी वाढत होती. व पुढें जेव्हां नियंत्रण सुरू झालें, तेव्हां ती पैदास सारखी घटूं लागली. आजचे भाव ४२-४३ च्या अनियंत्रित भावांपेक्षां कमी आहेत, हें सर्वश्रुतच आहे. म्हणजे अनियंत्रित भाव असतांना जरी महागाई होती, तरी त्यावरोबरच उत्पादनाचें प्रमाणहि जास्त असल्यामुळें एक समीकरण वाढलेल्या भावांत व वाढलेल्या उत्पन्नांत बसलेलें होतें. एका प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञाशीं मी जेव्हां ह्या बाबतींत चर्चा केली, तेव्हां त्यांनीं आपलें मत असें व्यक्त केलें कीं, ४२--४३ पर्यंतच अन्नधान्याची पैदास वाढण्याचें कारण असें कीं, इतर पिकांच्या मानानें—जसें गळितांची धान्यें, डाळी इत्यादि—त्या काळांत अन्नधान्याचे भाव जास्त होते व पुढें नियंत्रणामुळें ते कमी झाल्यामुळें अन्नधान्याची उत्पत्ति कमी झाली व इतर पिकांची पैदास वाढली. म्हणजे आजचे धान्याचे भाव कमी असल्यामुळें त्यांचें उत्पन्न कमी झालें नसून त्या मानानें डाळी, गळितांचें धान्य, यांचे भाव अनियंत्रित असल्यामुळें जास्त वाढल्याकारणानें त्यांचें उत्पन्न वाढलें. व त्या प्रमाणांत धान्याचें उत्पन्न कमी झालें. त्यांच्या मतें या परिस्थितीवर उपाय म्हणजे धान्याचे भाव वाढविणें हा नसून डाळी व गळितांचीं धान्यें यांचें भावनियंत्रण करणें हा आहे; आजचे धान्याचे भाव पुरेसे आहेत व नियंत्रणें काढलीं तर धान्याचा पुरवठा त्याचे मागणीपेक्षां कमी असल्यामुळें ते वाढतील; भाव मूळचे कमीअसल्यामुळें ते वाढणार नाहींत, असें त्यांचें मत होतें. ह्या विधानाला पुरावा एवढाच कीं, इतर वस्तूंच्या मानानें धान्याचे भाव जास्त वाढले आहेत. याच्या उलट धान्याच्या उत्पन्नाचा खर्च जर काढला, तर असें दिसून येतें कीं, आजच्या भावांपेक्षां निदान दोन

रुपये मण तरी जास्त भाव वाढल्याशिवाय अन्नधान्याचें उत्पादन कास्तकारास परवडत नाहीं. अशा तऱ्हेची चौकशी मध्यप्रांतसरकारनें करविली होती व तिच्यापासून हा निष्कर्ष निघाला आहे.

म्हणूनच सरकारी भावांत धान्य विकावयास कास्तकार नाखूष आहेत व ह्या बाबतींत सर्व प्रांतिक सरकारांचें एकमत आहे. ता. ५ व ६ नोव्हेंबर ह्या तारखांना दिल्ली येथें जी प्रांतिक अन्नमंत्र्यांची अन्नधान्य परिषद् झाली, तींत **सर्व अन्नमंत्र्यांचें या बाबतींत एकमत होतें कीं, सध्याचे भाव कास्तकारांना परवडत नाहींत व या भावांत नियंत्रण चालविणें ह्यापुढें शक्य नाहीं.** ह्या एकमुखी वस्तुस्थितीच्या निदर्शनामुळें धान्याचे भाव ह्यापुढें वाढविणें जरूरीचें होऊन जातें व आजचे भाव पुरेसे आहेत, हें विधान केवळ पुस्तकी वाटतें.

## नियंत्रण पद्धतीचे कांहीं अनिष्ट परिणाम

ह्यावर कांहीं लोकांचें म्हणणें असें पडतें कीं, भाव वाढवा, परंतु त्यानंतरहि नियंत्रण चालू ठेवा. कारण नियंत्रणामुळें देशांत जो कांहीं अन्नधान्याचा सांठा आहे, त्याचें योग्य विभाजन होऊं शकतें. म्हणजे यानंतर नियंत्रणाचा उपयोग जुने भाव कायम करण्याकरितां करावयाचा नसून योग्य वांटप करण्याकरितां करावयाचा, अशी ही सूचना आहे. तिचाहि विचार केला पाहिजे. नियंत्रणामुळें प्रत्येक माणसाला प्रमाणांत धान्य मिळत असल्यामुळें सांठेबाजीला आळा बसतो. श्रीमंत मनुष्याला आपल्या पैशाच्या जोरावर घरखर्चाकरितांच कां होईना, पण वाटेल तेवढा सांठा करता येत नाहीं. मोठ्या व्यापाऱ्याला आपल्या भांडवलाच्या जोरावर सर्व मालावर कबजा करून ( cornering ) वाटेल तसे भाव वाढवितां येत नाहींत. हे फायदे वांटपपद्धतींत आहेत, हें खरें आहे व आपल्या आजच्या वांटपपद्धतीनें जर हे फायदे पूर्णपणें आपल्याला मिळूं शकले असते, तर आजची शिधापद्धति चालविण्याकरितां हें एक फार मोठें कारण झालें असतें. परंतु वस्तुस्थिति काय आहे, तीं पहा. हिंदुस्थानांतील पिकांच्या उत्पन्नांतून बियां वगैरेकरितां लागणारा माल सोडून बाकीच्या राहिलेल्या मालाचा फक्त १/८हिस्सा आजच्या वांटपपद्धतींत सरकारजवळ येत आहे. बाकीचा ७/८ हिस्सा कास्तकारांजवळच राहतो. जर शेतीचें सर्व उत्पन्न सरकारजवळ वांटण्याकरितां आलें असतें व सर्व जनतेमध्यें त्याची योग्य विभागणी झाली असती, तर आजच्या वाटपपद्धतीची तरफदारी करणें शक्य होतें. परंतु सरकारचा धान्यसंग्रह हा उत्पन्नाच्या फक्त १/८ असल्यामुळें प्रश्न असा येतो कीं, जर दुसऱ्या पद्धतीनें उत्पन्नाचा जास्त हिस्सा वांटण्याकरितां मिळाला, तर तो कां घेऊं नये ? नियंत्रण आणि खुल्या व्यापाराच्या वादांत हा एक फार मोठा महत्त्वाचा वादाचा मुद्दा आहे. नियंत्रणवाल्यांचें म्हणणें असें कीं, त्यांच्या पद्धतीनें जास्तींत जास्त माल सरकारला वांटण्याकरिता मिळूं शकतो. खुल्या बाजारवाल्यांचें म्हणणें असें कीं, "येवढा आटापिटा करून तुम्ही केव्हांहि १/८ पेक्षां जास्त माल मिळवूंच शकलां नाहींत. खुल्या बाजारानेंच शेतकऱ्यांजवळील सर्व जास्त माल ( full surplus ) बाहेर येऊं शकतो. तुमचे ठराविक भाव कास्तकाराला कमी वाटल्यामुळें तो आपला माल तुम्हाला विकत नाहीं व तुम्हीं जेवढी जबरदस्ती करतां, तेवढ्या प्रमाणांत काळ्या बाजारांत विकण्याच्या नाना तऱ्हेच्या युक्त्या तो काढीत असतो व लोभाच्या आशेनें इतर लोक त्याला मदत करतात." आज आपल्याजवळ असे कोणतेहि आंकडे नाहींत कीं, ज्यामुळें हा वाद शेवटास नेऊन काहीं निर्णय घेतां येईल. येवढें मात्र खरें कीं, सर्व प्रान्तिक सरकारांच्या रिपोर्टीवरून वर्षानुवर्षे त्यांच्या प्रांतांत सरकारला कमी कमी धान्य मिळूं लागलें आहे असें दिसतें, व वांटपाच्या ज्या जबाबदाऱ्या आहेत त्या पुऱ्या करण्याकरतां दरवर्षी जास्त प्रमाणांत त्यांना हिंदुस्थानसरकारवर अवलंबून रहावें लागत आहे. प्रांतिक सरकारांची अगदीं प्रांजळपणें कबूल केलेली असमर्थतता हाच खरोखर वांटपपद्धतीच्या मृत्यूला कारणीभूत आहे. हिंदुस्थान सरकारनें जनतेला पोसण्याची जबाबदारी आपल्यावर घेतल्यानें, प्रांतिक सरकारें स्वाभाविकपणें हिंदुस्थानसरकारवर जास्त प्रमाणांत अवलंबून रहावयास लागलीं व अगदीं नकळतपणें कां होईना, एक थोडीशी








# आजच्या धान्यपरिस्थितीवर उपाययोजना

निश्चिन्ततेची किंबहुना थोडीशी बेजबाबदारपणाचीहि वृत्ति त्यांच्यांत यावयाला लागली. 'वांटप चालूं ठेवण्याकरितां यावर्षी आम्हांस येवढें धान्य पाहिजे, एरव्ही आम्ही उपाशी मरतों व या अपयशाचें खापर आम्ही तुमच्यावर फोडूं, कारण या कंट्रोलमुळें इतर प्रांतांतून खुल्या प्रमाणांत आम्हांला धान्य येत नाहीं,' अशी सारखी ओरड कांहीं तुटवडा पडणाऱ्या ( Deficit ) प्रांतांची असे. त्यांचा रोखठोक प्रश्न हिंदुस्थान सरकारला असा असे कीं, 'आम्ही मागतों तेवढा तरी माल आम्हांला द्या, नाहींतर कंट्रोल उठवून इतर प्रांतांतून तरी तो माल आम्हांला घेऊं द्या.' दिवसेंदिवस जे जरूरीपेक्षां जास्त धान्य पिकणारे प्रान्त होते ( Surplus provinces ),त्यांच्याकडून शेतकऱ्यांच्या धान्य न विकण्याच्या वृत्तीमुळें जेव्हां उत्तरोत्तर कमी मदत मिळूं लागली, तेव्हां तर हिंदुस्थानसरकारची आणखीच तारांबळ उडूं लागली. या परिस्थितींतून एकच मार्ग होता. तो म्हणजे हळूं हळूं कंट्रोल काढून टाकायचा व सर्व हिंदुस्थानभर खुला बाजार करावयाचा. याचेंच अवलंबन हिंदुस्थानसरकारनें करावयाचें ठरविलें आहे.

कांहीं आंकड्यानिशीं या प्रवृत्तीचा थोडा जास्त विचार आपण करूं. या लेखाच्या शेवटीं दिलेल्या ( कोष्टक नं. ४ ) कोष्टकावरून आपणांस असें दिसून येईल कीं, निरनिराळे प्रांत आपआपल्या उत्पन्नाचा निरनिराळा भाग वसूल करीत होते. यांत आपणाला असें दिसेल कीं, मद्रास व मुंबई प्रांत जे हिंदुस्थानचे दोन मोठे तुटवड्याचे प्रांत आहेत, त्यांच्या मानानें संयुक्तप्रांत, विहार यांचें वसूलीचें प्रमाण फारच कमी आहे. आज हे प्रांत म्हणतात कीं, " आम्ही तुटीचे प्रान्त आहोंत व त्यामुळें आम्ही बाहेर तर कांहीं माल पाठवूंच शकत नाहीं; पण बाहेरून आम्हाला माल मिळाला पाहिजे. ' याच्या उलट असें दाखवितां येईल कीं, नियंत्रणापूर्वी याच प्रान्तांतून आयातीपेक्षां निर्यात जास्त होती. नियंत्रणाचा मूळ उद्देश जास्त धान्य पिकविणाऱ्या प्रान्तांना आपल्या प्रान्तांतून जास्तींत जास्त धान्य ( procurement ) मिळवून तुटवड्याच्या प्रांतांत तें द्यावें असा होता. हाच उद्देश जेव्हां फसावयास लागला, तेव्हां नियंत्रणामुळें अन्नसंकट टळण्याऐवजीं तें वाढलें, असें म्हणणें भाग पडलें. तुटवडा प्रान्तांची ही मागणी असे कीं, जास्त धान्य पिकविणाऱ्या प्रान्तांनीं जास्त धान्य वसूल करून त्यांना पाठवावें, नाहीं तर प्रान्तबंदी काढून स्वाभाविकपणें तरी त्यांना माल घेऊं द्यावा. धान्यवसूली ही दिवसेंदिवस जास्त त्रासाची होत असल्यामुळें व लोकशाही राज्यपद्धतींत तिची सक्तीची अंमलबजावणी कमी प्रमाणांत होत असल्यामुळें जास्त धान्य पिकविणाऱ्या प्रान्तांत दर माणशीं जास्त धान्य पडूं लागलें. म्हणजे हिंदुस्थानाच्या जास्त धान्य पिकविणाऱ्या विभागांत नियंत्रणापूर्वी जेवढें धान्याचें प्रमाण माणशीं पडत होतें, त्या मानानें जास्त पडावयास लागलें. याचा अर्थ असा कीं, नियंत्रणामुळें किंवा नियंत्रण ज्या पद्धतीनें चालत होतें, त्यामुळें हिंदुस्थानचें जास्त धान्य पिकविणारे भाग नियंत्रणापूर्वीपेक्षां जास्त धान्य खाऊं लागले. ही परिस्थिति दूर करण्याचा एकमेव उपाय म्हणजे ही योग्य रीतीनें न चालवितां येणारीं नियंत्रणें दूर करणें व तोच उपाय हिंदुस्थान सरकारनें अंमलांत आणावयाचें ठरविलें आहे.

ह्या प्रवृत्तीचा आणखी एक अनिष्ट परिणाम जास्त धान्य पिकविण्याच्या मोहिमेवर झाला. जसजशी देशाला अन्न पुरविण्याची जबाबदारी हिंदुस्थानसरकारनें घेतली, तसतशी ही मोहिम थंडावयास लागली. कारण हा मनुष्यस्वभावच आहे कीं जबाबदारी उठविल्याबरोबर मनुष्य निश्चिन्त बनतो. हाच परिणाम हिंदुस्थानच्या सर्व प्रान्तांत होऊं लागला. ही मोहीम थंडावल्यामुळें आणखीच जास्त पराधीनता वाढत चालली व परदेशांतून येणाऱ्या धान्यावर हिंदुस्थानाला वर्षानुवर्षें वाढत्या प्रमाणांत अवलंबून राहावें लागलें. याचा परिणाम जो व्हावयाचा, तोच झाला. हिंदुस्थानची अडचण ओळखून धान्याचा पुरवठा करणाऱ्या राष्ट्रांनीं आपल्या अटी जास्त ताणावयाला सुरवात केली. येथें ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हिंदुस्थानांत एकंदर जितकें धान्य सर्व प्रान्तिक सरकारें मिळवितात ( procurement ), त्याचा अर्धा हिस्सा बाहेरून आल्याशिवाय आजची शिधापद्धति चालूंच शकत








नव्हती. येवढें आमचें परावलंबन वाढलेलें आहे. त्याचा पुरा लाभ इतर राष्ट्रें घेऊं लागली. हळूहळू तीं आपले भाव वाढवूं लागलीं व त्या वाढीचें प्रमाण दीडपटीहून दुपटीपर्यंत सुद्धां वाढावयास लागलें. त्या मानानें हिंदुस्थान सरकारचा बाहेरून धान्य आणण्याचा खर्च वाढावयास लागला. याशिवाय परराष्ट्रासमोर गयावया करण्याची पाळी येत असे, ती निराळीच. महात्मा गांधींचा शिधापद्धतीविरुद्ध जो आक्षेप आहे कीं, ती आमच्या गुलामीला वाढवीत असल्यामुळें अनीतिवर्धक आहे, तो आक्षेप या दृष्टीनें अक्षरशः खरा आहे. ही प्रवृत्ति जर थांबवायची, तर अगोदर शिधापद्धति तोडली पाहिजे; कारण ती चालविण्याकरितां आज या सर्व आयातीची जरूर आहे.

ही जी अन्नाची कमतरता आहे ती जास्त धान्य पिकवून, शेतकऱ्यांजवळून जास्त माल खरेदी करून व जरूर पडल्यास कमी खाऊन भरून काढली पाहिजे. 'स्वतःच्या परिश्रमाचें अन्न मी खाईन परंतु दुसऱ्यानें दिलेला घास मला नको '—ह्या वृत्तीचा परिणाम आयात बंद होण्यांत झालाच पाहिजे. याची दुसरी बाजू अर्थातच ही कीं, दर वर्षी १२५ कोटी रुपये आपण वांचवून जर तेच जास्त धान्य पिकाविण्याच्या कामीं आपण लावूं लागलों, तर आपला देश किती पुढें येईल, याचा विचार वाचकांनीच केला पाहिजे.

लेखाच्या शेवटीं दिलेलें कोष्टक नं. ५ हें मध्यप्रांत व वऱ्हाड पुरतें आहे. त्यावरून नियंत्रणाचा परिणाम धान्याच्या उत्पन्नावर कसा झाला, हें दिसून येईल.

नियंत्रण पूर्ण स्वरूपांत १९४३-१९४४ सालांत आलें. तोंपर्यंत त्याचें स्वरूप घरसोडीचें किंवा अर्धवट होतें. आपणांस या कोष्टकावरून असें दिसेल कीं, ४३—४४ सालापर्यंत ज्वारीचें क्षेत्रफळ सारखें वाढत होतें. पुढें तें हळू हळू कमी व्हावयास लागलें. तांदूळ आणि गहूं यांची गोष्ट थोडी निराळी आहे. आमच्या प्रांतांत तरी त्यांच्या किंमती ज्वारीच्या मानानें बऱ्या होत्या व सर्व पिकांपेक्षां तांदळाचें पीक जास्त खात्रीचें असतें. त्यामुळें तांदळाच्या क्षेत्रफळावर परिणाम न होतां तें थोडेसें वाढलेंच. ज्वारी आणि गव्हाबद्दल मात्र तसें म्हणता येणार नाहीं आणि या कंट्रोलच्या अन्नधान्याखालचा पेरा मात्र सारखा कमी होत आहे. हें आपणांस कोष्टकांतील स्तंभ आठ वरून दिसून येईल.

## नियंत्रणपद्धति सफल केव्हां होऊं शकेल?

वांटपपद्धतीनें सांठेबाजीवर नियंत्रण रहातें हें खरें आहे. परंतु वांटप पद्धति सफल होण्याकरितां दोन गोष्टींची जरूरी आहे. पहिली म्हणजे, त्या मालाचा सर्व सांठा सरकारजवळ असला पाहिजे. सर्व सांठा सरकारजवळ असल्यांनतर त्याचें योग्य वांटप सर्व जनतेंत सरकार सुलभतेनें करूं शकतें. वर दाखविल्याप्रमाणें धान्याच्या बाबतींत फक्त १/८ सांठा सरकारजवळ येतो. त्यामुळें काळ्या बाजाराला वाटेल तितका वाव मिळतो. पाश्चात्य देशांत विशेषतः विलायतेंत जेथें वांटपपद्धति सफळ झाली आहे. तेथें वांटण्याकीरतां लागणारा माल बहुतेक किंवा पुष्कळसा बाहेरूनच येत असल्यामुळें तो आयताच सरकारच्या हातीं येत असे व त्याचें वांटप करणें सुलभतेचें होतें. हिंदुस्थानांत धान्याच्या बाबतींत तशी स्थिति नाहीं. त्यामुळें धान्याचे भाव कायम ठेवणें सरकारला जवळ जवळ अशक्य होऊन बसलें आहे. तशि स्थिति मिलच्या कापडाची निदान त्या प्रमाणांत नाहीं. कारण मिलमधील सर्व कापड सरकार मिलांवर नियंत्रण घालून घेऊं शकत होतें. ४—५ शें गिरण्यांच्या नियंत्रणाचा तो प्रश्न होऊन बसतो. परंतु शेतकऱ्यांची संख्या एवढी अवाढव्य आहे कीं, मद्रासच्या अन्नमंत्र्यांनीं सांगितल्याप्रमाणें सरकारच्या सर्व खात्यांतील अधिकारी धान्य--वसूलीच्या कामीं लावून व सहा महिने सरकारचें सर्व काम बंद करून सुद्धां वसुलीचें प्रमाण शेंकडा २० ते २५ च्यावर जाऊं शकलें नाहीं. त्यामुळें काळाबाजार, जास्त किंमत ह्या गोष्टी स्वाभाविकपणें घडतात व त्या बंद होणें अशक्य आहे. त्याचबरोबर दुसऱ्याहि एका तऱ्हेनें या रेशनिंगच्या पद्धतींत काळाबाजार होत असतो. रेशनिंग म्हटलें कीं, सर्वांना सारखें वांटप व्हावयाचें हें ओघानेंच आलें.

आणि मग ज्यांना त्या वस्तूंची इतकी जरूरी नसते, ते ती सरकारजवळून रेशनमध्यें घेऊन खुशाल जास्त भावांत विकतात. आणि आपल्या देशांत जेथें लोकांच्या राहणींत इतक्या श्रेणी आहेत, तेथें वाटप जर सर्वांना सारखें ह्या तत्त्वावर केलें, तर असे प्रकार फार मोठ्या प्रमाणांत होतात, हा अनुभव आहेच. बरें सरकारनें जर उत्पन्नावर वांटप करण्याचें ठरविलें, तर गरिबांवर अन्याय झाला असा कांगावा करून सरकारला निरुत्तर करण्याचा व त्याबद्दल असंतोष माजविण्याचा प्रकार आम्ही अनुभवलेलाच आहे. अशा परिस्थितींत रेशनिंगच्या पद्धतीनें वांटप फारच कठीण होऊन जातें व जनतेंत विनाकारण टळं शकत असलेला असंतोष माजतो.

शेवटीं हें सांगितलेंच पाहिजे कीं, आजचा वाद नियंत्रण चांगलें कीं खुला बाजार चांगला, असा नाहीं. आजचा वाद असा आहे कीं आज ज्या पद्धतीनें हिंदुस्तानचें धान्यनियंत्रण सुरू आहे व सध्याच्या लोकशाही सरकारच्या ज्या अनेक कमतरता आहेत, त्या लक्षांत ठेवून ज्या आदर्श पद्धतीनें तें चालू राहणें शक्य आहे, त्याचा विचार करून नियंत्रण चालू ठेवावें कीं खुला बाजार हळूं हळूं सुरू करावा, असा प्रश्न आहे. नियंत्रण जर सुव्यवस्थित चालूं शकत असेल, तर आजच्या परिस्थितींत तें चालू ठेवावें व खुला बाजार आणूं नये ह्याबद्दल, मला वाटतें, वाद रहाणार नाहीं. परंतु सुव्यवस्थित नियंत्रण हिंदुस्थानांत चालूं रहावयाचें म्हणजे

( अ ) कास्तकारांनीं आपल्या जवळचें सर्व धान्य सरकारला खखुषीनें दिलें पाहिजे;

( आ ) साखर, गूळ, गहूं इत्यादि ज्या वस्तूंचें उत्पादन लोकसंख्येच्या मानानें फारच कमी आहे, त्या वस्तू कांहीं विशिष्ट लोकांनाच मिळतील असें समजून ज्यांना त्या मिळणार नाहींत, त्यांनीं त्यांचा आग्रह सोडून द्यावा;

( इ ) ज्वारी, बाजरी, मका, रागी, कोदो इत्यादि जीं हलकीं धान्यें आहेत, तीं एक तर सर्वांना सारखीं वाटली पाहिजेत, नाहीं तर खालच्या वर्गांनीं नियंत्रणापूर्वी जी परिस्थिति होती, त्याप्रमाणें हीं धान्यें प्राधान्यतः खाऊन आपली गरज भागविली पाहिजे;

( ई ) व्यापारी व श्रीमंत माणसें यांनी वस्तूंच्या आशेनें व गरीबांनीं पैशाच्या आशेनें रेशनमध्यें मिळालेलें धान्य पुन्हा विकलें न पाहिजे.

( उ ) सांठा करण्याच्या प्रवृत्तीला स्वाभाविक आळा बसविला पाहिजे;

( ऊ ) आजचें नियंत्रण जास्त व्यापक करून गळिताचीं धान्यें, डाळी, इत्यादि इतर शेतीच्या मालावर तें बसविलें पाहिजे;

( ए ) शेतीचा माल तयार करण्यांत किती खर्च येतो ह्याचा योग्य विचार करून त्याप्रमाणें शेतीच्या मालाची किंमत आकारली पाहिजे;

( ऐ ) प्रत्येक प्रान्तानें इमानेंइतबारें कंट्रोलची नीति व्यवस्थित स्वरूपांत चालविली पाहिजे.

सरकार जर या सर्व गोष्टी निदान शेंकडा ७५ तें ८० प्रमाणांत व्यवस्थित स्वरूपांत करूं शकत असेल, तर नियंत्रण आजच्या परिस्थितींत सुद्धां असावें असेंच कोणीहि म्हणेल. कारण खुल्या बाजाराच्या बेहिशोबीपणापेक्षां नियंत्रणाचा हिशेबीपणा केव्हांहि पत्करला. आणि नियंत्रण चालविण्याकरितां परदेशांतून धान्य आणलेंच पाहिजे असें नाहीं. जेवढें कांहीं धान्य आमच्या देशांत आहे, तेवढेंच आम्ही योग्य तऱ्हेनें वांटून खाऊं, अशाहि निर्धाराने नियंत्रणपद्धति चालूं शकते.

## अव्यवस्थित नियंत्रणापेक्षां खुला बाजार बरा

परंतु ही म्हण अगदीं तेवढीच सत्य आहे कीं अव्यवस्थित नियंत्रणापेक्षां व्यवस्थित खुला बाजार हजार हिस्स्यांनीं चांगला व खुला बाजार ही अशी वस्तु आहे कीं, ती नेहमींच व्यवस्थित आहे. तिला व्यवस्थित ठेविण्याकरितां कोणाची जरूरी लागत नाहीं. तिचा व्यवस्थितपणा स्वयंभू आहे. परंतु नियंत्रणाचें तसें नाहीं. त्याच्यांत कर्तबगारीनें व्यवस्थितपणा आणावा लागतो. आणि आज हें दुःखानें कबूल करावें लागतें कीं, ही शक्ति आज ह्या राष्ट्रांत नाहीं व लोकशाहीच्या पद्धतीनें ती एकदम उत्पन्न होऊं शकत नाहीं. अशा परिस्थितींत शेतकऱ्यांकडून कमी धान्यवसूली व त्यामुळें परदेशांवर



अनुक्रमणिका






जास्त अवलंबून राहणें, सांठेबाजी, व काळाबाजार, संकुचित प्रांतिक दृष्टि–इत्यादि दोष फार मोठ्या प्रमाणांत बोकाळले आहेत व त्यामुळें बाहेरच्या धान्यावर सरकारला जास्त प्रमाणांत अवलंबून राहावें लागत आहे. म्हणून जर कंट्रोल काढले तर शेतकऱ्यांकडून जास्त धान्य स्वाभाविकपणें बाहेर येईल, वांटप आपोआप होईल, जास्त धान्य पिकविण्याची मोहीम स्वाभाविकत: वाढेल व बाहेरून लागणाऱ्या धान्याचें प्रमाण कमी अगर कायमचें बंद करतां येईल–असे फायदे होतील. म्हणजे नियंत्रण काढून खुला बाजार करणें हें आजच्या सर्व परिस्थितीचा विचार करून पाहिल्यास देशाच्या फायद्याचें आहे, हें उघड आहे.

नियंत्रण आणि खुला बाजार यांच्यामध्यें खरोखर मधला रस्ता नाहीं. म्हणजे तावडतोब सर्व प्रांतिक निर्बंध काढून टाकून सबंध देशांत मोकळेपणानें धान्य जाऊं देणें, हाच खरोखर रामबाण उपाय आजच्या परिस्थितीवर आहे. सुरुवातीला त्रास होईल. परंतु तीनचार महिन्यांत परिस्थिति आपोआप निवळेल. अर्थात् या सर्व चर्चेंत हें गृहीत धरलें आहे कीं, वाहतुकीचीं साधनें आज सरकारी धान्याच्या वाहतुकीला जशीं मिळत आहेत, तशीच खाजगी व्यापारालाहि मिळतील. ही गोष्ट शक्य आहे व तसें होणें असंभाव्य नाहीं.

### एक मधला रस्ता

परंतु पहिल्या तीनचार महिन्यांत त्रास होण्याचा जो संभव आहे व त्यांत जो धोका आहे, तो घ्यावयाला आज हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकारें तयार नाहींत. म्हणून कांहीं मधला रस्ताही काढणें जरूरीचें आहे. हा रस्ता म्हणजे खुला बाजार व नियंत्रित दुकानें एकदम चालू ठेविणें. त्यामुळें भावावर व सांठेबाजीवर आपोआपच नियंत्रण पडेल व रेशनिंगचा तापहि लोकांना होणार नाहीं. खालील क्रमानें ही गोष्ट साध्य करितां येईल:

(अ) कास्तकाराला योग्य किंमत मिळावी म्हणून सरकारनें धान्याच्या किंमती आजच्यापेक्षा १॥। रु. मण याप्रमाणें जास्त भावानें मुक्रर कराव्या.

(आ) बाजारपेठांतून या भावांत सरकारतर्फे धान्य खरेदीची सोय सरकारनें करावी. सरकारच्या खरेदीचा भाव आजच्या भावापेक्षां १॥। रुपये मण जास्त असावा.

(इ) यापेक्षां जास्त भावांत वाटेल तर व्यापाऱ्याला खरेदी करण्याची मोकळीक असावी.

(ई) धान्याच्या प्रत्येक ठोक व्यापाऱ्याला लायसेन्स् घेऊन व्यापार करण्याची परवानगी असावी व प्रत्येक व्यापाऱ्यानें दर आठवड्याला आपल्या जवळील सांठ्याची माहिती सरकारला द्यावी.

(उ) प्रत्येक ठोक व्यापाऱ्यानें आपल्या सर्व खरेदीचा एक ठराविक हिस्सा (शेंकडा ४०,५०, ६० अगर जास्त हें प्रांताच्या परिस्थितीवर अवलं-

### कोष्टक नं. १ ( ००० टन )

| वर्षे | उत्पादन* | + आयात – निर्यात |
|---|---|---|
| १९३५–३६ | ५४२६२ | + १७९३ |
| १९३६–३७ | ५९५७८ | + १२४५ |
| १९३७–३८ | ५८७३९ | + ६३० |
| १९३८–३९ | ५४४६८ | + १०४४ |
| १९३९–४० | ५७२४४ | + २२२१ |
| १९४०–४१ | ५४८०८ | + ९६३ |
| १९४१–४२ | ५६५५० | + ४३२ |
| १९४२–४३ | ५८८५७ | – २९२ |
| १९४३–४४ | ६२८८० | + २९८ |
| १९४४–४५ | ६०५७१ | + ६९३ |
| १९४५–४६ | ५४८८४ | + ८९२ |
| १९४६–४७ | ५५०९७ | + २६३८ |

सरासरी उत्पादन
१९३८–३९ व १९३९–४० मध्यें = ४९६९०
सरासरी आयात
१९३८–३९ व १९३९–४० मध्यें = + ९७२

*उत्पादनाच्या आंकड्याकरितां वर्षारंभ खरीफप्रमाणें म्हणजे १ नोव्हेंबरपासून; आयातीच्या आंकड्याकरितां वर्षारंभ रबीप्रमाणें म्हणजे १ एप्रिलपासून.









# आजच्या धान्यपरिस्थितीवर उपाययोजना

वून राहील ) सरकारला आजच्या भावापेक्षां २ रुपये मण अधिक भावानें दिलाच पाहिजे. म्हणजे सरकारच्या खरेदीच्या भावांत व व्यापाऱ्याजवळून घेण्याच्या भावांत पाव मणाचा फरक राहील. ह्या मुळें व्यापारी विशेष भाव वाढवूं शकणार नाहीं व सरकारजवळ सुद्धां धान्याचा सांठा होत असल्यामुळें ठिकठिकाणीं सरकारी दुकानें काढून त्यांना तो विकतां येईल व यामुळें किरकोळ भावावर सरकारचें आपोआपच नियंत्रण राहील.

( ऊ ) ठिकठिकाणीं विशेषतः कमी पिकाच्या व औद्योगिक क्षेत्राच्या विभागांत सरकारी दुकानें काढून सरकारनें आपला धान्याचा सांठा नुकसान न करितां विकावा.

ही पद्धत जर अमलांत आणली, तर आज आपण नियंत्रणांचे सर्व फायदे मिळवून वांटप पद्धतीच्या दोषांपासून मुक्त होऊं. शेवटीं लोकांना भीति हीच ना, कीं नियंत्रण जर उठलें तर व्यापारी सांठेबाजी करून काळाबाजार करतील म्हणून! ही जर भीति नाहींशी झाली, तर वांटपपद्धतीचा आणि शिधापद्धतीचा त्रास कोणाला पाहिजे आहे? नियंत्रणांमुळें प्रांतबंदी करून सरकार ठराविक भावांत धान्यसंग्रह करून तो लोकांना वांटून देऊं शकतें, हाच ना नियंत्रणाचा फायदा?

हे सर्व फायदे वरील योजनेंत आहेत. मध्यें व्यापाऱ्यांकडून घेण्याचें जें प्रमाण आहे, तें

( पुढील मजकूर पान ७४ पहा )

## कोष्टक नं. २

| वर्ष | प्रत्येक प्रौढामागें पुरवठा | वर्ष | प्रत्येक प्रौढामागें पुरवठा |
|---|---|---|---|
| १९३१--३२ | ४३७ पौंड | १९३८--३९ | ३६० पौंड |
| १९३२–३३ | ४१६ ,, | १९३९–४० | ३८२ ,, |
| १९३३–३४ | ४०८ ,, | १९४०–४१ | ३५२ ,, |
| १९३४–३५ | ४०८ ,, | १९४१–४२ | ३५५ ,, |
| १९३५–३६ | ३७९ ,, | १९४२–४३ | ३५८ ,, |
| १९३६–३७ | ४०५ ,, | १९४३–४४ | ३८३ ,, |
| १९३७–३८ | ३९० ,, | १९४४–४५ | ३६१ ,, |

## कोष्टक नं. ३

हिंदुस्थानांतील कांहीं वस्तूंचे सरासरी दर्शक अंक

१९--८--३९ ला संपणाऱ्या आठवड्यांतील मूळ आंकडा १००

( हिंदुस्थान सरकारच्या अर्थविषयक सल्लागारानें केलेल्या गणनेवरून )

| वस्तू | | सरासरी दर्शक अंक | |
|---|---|---|---|
| | १९४५ | १९४७ | १९४७ |
| | ३२९·५ | ३२१·७ | ३३१·७ |
| तांदूळ | ३७१·१ | ३७३·० | ३७३·० |
| गहूं | २३९·४ | ३३२·५ | ४५२·७ |
| शेंगा | १६७·० | १७९·८ | २१२·० |
| साखर | २४६·४ | ३४३·५ | ४०७·१ |
| तागाचे बीं | २६९·१ | ३०४·२ | ३४१·६ |
| शेतीचा माल | २१०·३ | २२५·७ | २४३·२ |
| कच्चा माल | २४४·४ | २५०·९ | २७७·७ |
| कारखान्यांत तयार झालेला माल | २४४·५ | २६६·८ | २९४·१ |
| सर्व वस्तू | | | |

# कोष्टक

[ खालील आंकडे

## तांदूळ

| प्रांत | १९४४–४५ उत्पादन | १९४४–४५ सरकारी जमा Procure-ment | १९४५–४६ उत्पन्न | १९४५–४६ सरकारी जमा | १९४६–४७ उत्पन्न | १९४६–४७ सरकारी जमा |
|---|---|---|---|---|---|---|
| . आसाम | १,८३३ | २०९ (११·४) | २,०१६ | १५२ (७·५) | १,७७८ | १९२ (१०) |
| .२ बंगाल | १०,४७६ | ६४२ (६·१) | ९,५९७ | ६६८ (६ ९) | १०,५८० | ७५० (७) |
| ३ बिहार | २,६७२ | ५३ (२·०) | २,४६० | ७५ (३·०) | २,७४८ | १३० (४) |
| मुंबई | ८९५ | १८२ (२२·८) | ८३३ | १८१ (२१·६) | ७६५ | १६० (२१) |
| मध्यप्रांत वऱ्हाड | १,७२५ | ३२९ (१३·६) | १,६४१ | ३१७ (१९·३) | १,४०० | २७३ (२०) |
| मद्रास | ५,०५४ | [illegible]७३ (१५·५) | ३,८२७ | १,३५४ (३६·०) | ४,८२७ | १,७०० (३५·५) |
| ओरिसा | १,३३७ | १३६ (१०·५) | १,२८६ | ११८ (९·२) | १,४६६ | ९९ (७) |
| पंजाब | ४४९ | १४३ (३२·०) | ४५४ | १५२ (३३·५) | ४२५ | १२० (३०) |
| ९ सिंध | ५६४ | १९२ (३४·०) | ६८८ | २१५ (३१·२) | ६३३ | २०० (३१·५) |
| १० संयुक्त प्रांत | १,५४६ | ८४ (५·७) | १,८५३ | १११ (७·०) | १,४२० | ८० (५·७) |
| एकूण | | २,७४३ (१०·०) | २४,६६१ | ३,३४३ (१३·५) | २६,०४२ | |

टीप—१ उत्पन्नाच्या मानानें सरकारी जमा किती झाली याचें शेंकडा प्रमाण (        ) अशा
२ जेथें आंकडे मिळाले नाहींत, तेथें — ही खूण आहे.










नं. ४

० हजार टनांचे आहेत.]

ज्वारी व बाजरी

| १९४४–४५ | | १९४५–४६ | | १९४६–४७ | |
|---|---|---|---|---|---|
| उत्पन्न | सरकारी जमा | उत्पन्न | सरकारी जमा | उत्पन्न | सरकारी जमा |
| — | — | -- | — | — | — |
| — | — | १ | — | — | — |
| — | — | ३७ | — | ४२ | १० (२३·७) |
| — | ३४४ | १,०५५ | १७४ (१६·५) | १,२२५ | २८९ (२३·५) |
| १,०९५ | ७८ (७·१) | १,०३७ | ४५ (४·५) | ८५७ | २४ |
| — | — | १,०८२ | १२५ (११·०) | १,६३१ | १३५ (८·२) |
| — | — | ९ | — | ९ | — |
| — | ३३ | ६९१ | १० (१.४) | ५३५ | — |
| — | ३ | १९० | — | १८० | — |
| — | ७५ | १,१०८ | ६८ (६·१) | ९७५ | ७५ ७.६ |
| — | | ५,१८० | ४२२ (८·[illegible]) | ५,४५४ | ५३३ (९·८) |

कंसांत दाखविलें आहे.










( पान ७१ वरून चालूं )

वाढवून अगर कमी करून वांटपपद्धति अगर खुला बाजार आपण वाढवूं शकतों अगर कमी करूं शकतों. जर सर्व व्यवस्थित चाललेलें दिसलें, तर प्रमाण कमी करून खुला बाजार वाढवा. भाव वाढत आहे असें दिसलें तर प्रमाण जास्त करून नियंत्रण करा. ज्याला नियंत्रण व तज्जन्य वांटपपद्धतीपासून त्रास वाटतो, तो खुल्या बाजाराकडे वळेलच. एकाचवेळीं दोन्ही सुरूं असल्यामुळें महागाई वाढणार नाहीं, गरीबांना ठराविक भावांत धान्य मिळूं शकेल व खुला बाजार असल्यामुळें वांटपपद्धतीचा त्रास वाटणार नाहीं व शेतकरी जर माल सांठवून ठेवूं लागला, तर माल त्याचेकडून सक्तीनें काढून विकावयास लावणें—ही जास्त माल

# कोष्टक

## मध्यप्रांत व वऱ्हाडः मुख्य

| वर्ष | तांदूळ | गहूं | ज्वारी | हरभरा | बार्ली, मका, बाजरी व रागी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १९३९–४० | ५८,९६,०७५ | ३१,८३,९१८ | ४७,९१,२२१ | १०,११,७२२ | २,९०,४०४ |
| १९४०–४१ | ५८,७२,७५९ | ३२,२९,११५ | ४५,३३,३७७ | ११,५१,९७८ | २,८२,२१६ |
| १९४१–४२ | ५७,५७,४७९ | २८,५०,५८९ | ४७,३९,३९० | ११,१६,५०४ | २,७७,८५८ |
| १९४२–४३ | ५६,५४,०५७ | २५,४३,८३१ | ५३,०७,१२३ | १०,६८,६५८ | ३,०४,२०६ |
| १९४३–४४ | ५८,७४,४२३ | २६,६८,१०२ | ५६,४७,६७८ | १२,५०,५८१ | ३,३०,८८१ |
| १९४४–४५ | ६०,२२,९२८ | २७,९६,५३१ | ५१,८४,५५५ | १३,५३,८६३ | ३,०९,७३७ |
| १९४५–४६ | ६०,७१,३७९ | २६,७८,६८३ | ५०,४५,७३९ | १३,०६,५८१ | २,८५,६४३ |
| १९४६–४७ ( अंदाजें ) | ६१,१९,२१९ | २७,८९,३३६ | ४८,२५,२१७ | १२,४४,८३४ | २,८५,२६० |
| १९४७–४८ ( अंदाजें ) | ६१,१५,०९९ | ......... | ......... | ......... | ......... |

टीपः—( १ ) १९४६–४७ चे तांदूळ, मुईमूग व कापूस यांच्याशिवाय इतर आंकडे डिस्ट्रिक्ट लॅंड रेकॉर्डस·
( २ ) ... आंकडे मिळाले नाहींत.












बाहेर काढण्याची सरकारची शक्ति कायमच राहील. शेवटीं याच शक्तीच्या भरंवशावर नियंत्रण चालूं शकतें.

जो नियंत्रणाचा स्वाभाविक दोष आहे तोच फक्त या योजनेंत कायम आहे व म्हणूनच मी वर असें म्हटलें कीं, नियंत्रण व खुला बाजार यांमध्यें खरोखर मधला रस्ता नाहीं. नियंत्रणामुळें जे भाव ठरतात त्यामुळें कास्तकार जास्त धान्य विकत नाहीं व धान्याचा पेरा वाढवीत नाहीं, हे आक्षेप वरील योजनेलाहि लागू शकतात. परंतु सर्व देशभर चालूं नियंत्रणें एकदम काढून खुला बाजार करण्याची जबाबदारी कोणताहि शासनकर्ता (Administrator) घेऊं शकत नसल्यामुळें हा मधला रस्ता कांहीं काळ चालूं ठेवणें क्रमप्राप्त आहे.

# नं. ५

## पिकांचें क्षेत्रफळ (एकर)

| डाळी | एकंदर अन्नधान्यें | भुईमूग | इतर (Oil Seeds) | कापूस | पिकांचें एकंदर क्षेत्रफळ |
|---|---|---|---|---|---|
| ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| ३८,८४,१७५ | २,०५,४२,५७२ | २,२८,०२३ | २१,५५,६३३ | ३२,६९,८०० | २,७१,३३,२८५ |
| ३४,८५,८३५ | २,००,३२,९९५ | २,३२,८१० | २१,०२,००७ | ३५,७२,०६५ | २,६८,८४,०९५ |
| ३३,०३,७०२ | १,९७,२२,२६१ | १,९३,३९४ | १८,५२,८१५ | ३८,०४,५२३ | २,६५,३०,१२६ |
| ३८,५८,८५९ | २,०६,२४,१३४ | २,३४,०८१ | १८,४४,९३२ | ३२,७२,५०४ | २,६८,७३,९२० |
| ४१,२४,१९२ | २,१७,४१,३६४ | ३,०२,३५४ | १९,३५,९०३ | ३२,०३,०४९ | २,८१,०८,८१५ |
| ४३,५१,५२२ | २,१६,१२,०९७ | ६,०६,१२३ | १८,८६,४७६ | २८,०३,०३९ | २,७७,६३,७१८ |
| ४२,५५,५२३ | २,११,७०,८११ | ५,८४,५६३ | १६,६५,४०१ | २९,५५,६३२ | २,७२,७१,९५६ |
| ४०,२८,१०६ | ......... | ५,५९,४०९ | ......... | २९,६६,७१९ | ......... |
| ......... | ......... | ५,६१,४१९ | ......... | २८,९४,१५९ | ......... |

मध्यें प्रसिद्ध झालेल्या १९४६–४७ च्या शेवटच्या अंदाजावरून घेतले आहेत.








# दोन अर्थव्यवस्था

प्रा. अ. रा. कामत

हिंदुस्थानांत[1] समाजवाद आला पाहिजे असें आज देशांतील अनेक राजकीय पुढारी आणि विचारवंत प्रतिपादन करतात. " किसानमजूर–राज्य " अथवा " शेतकरी-कामकरी-प्रजा राज्य" या घोषणांमागील उद्देश असाच आहे. भांडवली अर्थव्यवस्थेपेक्षां समाजवादी योजनाबद्ध अर्थ-व्यवस्था श्रेष्ठ दर्जाची आहे, हाच अर्थ यांमध्यें अभि-प्रेत असला पाहिजे हें उघड आहे. समाजवादी अर्थव्यवस्थेचे विशेष कोणते, आर्थिक नियोजनामध्यें कोणते प्रश्न उपस्थित होतात, आर्थिक नियोजनावर भांडवली अर्थशास्त्रज्ञांचे नेहमीचे आक्षेप कोणते आणि मानवी प्रगतीच्या दृष्टीनें, सोव्हिएट अर्थ-व्यवस्थेला कोणतें महत्त्व आहे, इत्यादि गोष्टींचें विवे-चन या प्रकरणीं केलें आहे.

## समाजवादी अर्थव्यवस्थेचें श्रेष्ठत्व

वास्तविक समाजवादाचें श्रेष्ठत्व यापूर्वींच अनेकदां अनेक ठिकाणीं चर्चिलें गेलें आहे. पण आजहि त्याविरुद्ध जुनेच मुद्दे उपस्थित केले जातात. म्हणून पुन्हां एकदां त्याकडे लक्ष वेधणें जरूर झालें आहे. उत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं झालीं कीं त्याचे कसे अनेक फायदे होतात, पहा. जमि-नीची खाजगी मालकी नष्ट झाली कीं, लोखंड, कोळसा, तेल इत्यादि भूमिगत संपत्तीचा शोध पद्धतशीरपणें करणें शक्य होतें; आणि खनिज--पहाणी-नंतर कोणत्या ठिकाणीं खाणी काढणें अगर विहिरी खोदणें राष्ट्राच्या दृष्टीनें आवश्यक, आहे हें ठरवून त्याप्रमाणें योजनाबद्ध प्रगति करतां येते. जमीनदारांचा जमिनीवरील मालकी हक्क त्या ठिकाणीं आडवा येत नाहीं. तसेंच खाणी खोदतांना दूरवरचा विचार करून सर्व खनिज संपत्तीचा नीट उपयोग कसा होईल, तिचा अपव्यय होणार नाहीं, असें धोरण दूरदृष्टीनें आंखतां येतें. इतर देशांत ( आणि हिंदुस्तानांत ) तात्काळ मिळणाऱ्या नफ्यावर दृष्टि ठेवून खाणीवाले भांडवलदार ही राष्ट्रीय खनिज संपत्ति कित्येकदा वाया घालवितात, असें आढळून येतें.

नव्या गिरण्या, कारखाने उभारतांना एकंदर देशाच्या हिताच्या दृष्टीनें आणि जरूरीप्रमाणें योजना ठरविली जाते. धनिकांच्या लहरीवर आणि परस्पर स्पर्धेवर हें अव-लंबून नसतें. आणि म्हणून आपापसांतील स्पर्धा टळून श्रमाचा व भांडवलाचा अपव्यय टळतो. ( झारशाही रशियांत शेजारच्या तेलवाल्याचें तेल आपल्या विहिरींत येऊन त्याचें नुकसान व्हावें या हेतूनें तेलाच्या विहिरीचे कित्येक मालक कुंपणाच्या आंत आपल्या जमिनींत अधिक खोल विहीर खोदीत असत ! ) तसेंच यामुळें निरनिराळ्या प्रदे-शांची प्रमाणशीर औद्योगिक प्रगति घडवून आणणें शक्य होतें. एखादा प्रदेश अगदीं मागासलेला आणि दुसरा एखादा प्रदेश कारखान्यांनीं तुडुंब भरलेला, अशी विसंगत आणि विषम परिस्थिति निर्माण होत नाहीं. कित्येक कारखाने शक्य तितके मोठाले बांधणें

१ प्रस्तुत लेख हा प्रा. अ. रा. कामत यांच्या आगामी 'सोव्हिएट आर्थिक नियोजन', या ग्रंथांतील एका प्रक-रणाचा भाग आहे.












उत्पादनाच्या दृष्टीनें फायदेशीर असतें. परस्पर स्पर्धेमुळें आणि भांडवलदारांच्या वैयक्तिक संपत्तीच्या जोरावर असे मोठाले कारखाने बांधणें त्यांना शक्य नसतें. फक्त सरकारलाच तें शक्य असतें.

तसेंच समाजवादी देशांत सर्व कारखान्यांची उत्पादनशक्ति पुरेपूर उपयोगांत आणतां येते. कारण धनिकांच्या लहरीप्रमाणें एकच वस्तु निर्माण करणारे, जरूरीपेक्षां अधिक कारखाने निघण्याचा संभव नसतो. थोडाफार फरक असलेल्या पण वास्तविक एकाच तऱ्हेच्या निरनिराळ्या वस्तू खपविण्यासाठीं कारखानदार जाहिरातीवर कसा पाण्यासारखा पैसा खर्च करतात, हें आपणांस माहीत आहे. अशा भरमसाट आणि बेसुमार जाहिरातबाजीवर एवढी शक्ति फुकट घालविण्याचें समाजवादी कारखान्यांना मुळींच कारण नसतें. भांडवलदारींत असलेली आणखी एक समाजविरोधी प्रवृत्ति नमूद केली पाहिजे. पुष्कळदां कमी श्रमांत आणि स्वस्त किंमतींत तोच माल उत्पादन करण्याची नवी यांत्रिक युक्ति निघालेली असते. पण आपला जुना कारखाना बसेल किंवा नव्या तऱ्हेच्या उत्पादनांत पूर्वीइतका नफा मिळणार नाहीं म्हणून ती युक्ति विकत घेऊन भांडवलदार ती उपयोगांत न आणतां तशीच पाडून ठेवतात. शर्ट वगैरे कपड्यांना बटणाऐवजीं असलेल्या सरकत्या सांखळीचें ( झीपचें ) पेटंट अमेरिकेंतील बटणाच्या कारखानदारांनीं असेंच दडपून ठेवलें होतें, असें सिद्ध झालें आहे.

शेती सामायिक आणि यांत्रिक झाली कीं, धान्य व इतर पिकांत विलक्षण वाढ होते. यामुळें शेतकऱ्यांच्या जीवनाचें मान उंचावतें आणि उद्योगधंद्यांच्या वाढीस लागणारा कच्चा माल मुबलक उपलब्ध होतो. या सर्वांचा असा परिणाम होतो कीं, खेडूत जनतेला नागरी सुखसोयींचा लाभ मिळणें शक्य होतें. तसेंच धान्याचे सांठे करून ठेवतां येतात आणि त्यामुळें अवर्षणादि नैसर्गिक आपत्ती आल्या तरी अगदीं दुष्काळ आणि अन्नान्नदशा ओढवत नाहीं. झारशाही रशियांत आपल्या हिंदुस्थानप्रमाणें वारंवार दुष्काळाचा फेरा येई आणि लक्षावधि नागरिक मृत्युमुखीं पडत. शेती सामायिक झाल्यापासून असें संकट पुन्हां कधींच ओढवलें नाहीं.

## बहुजनसमाजाची सुखसोय

नवे उद्योगधंदे उभारतांना मुलभूत उद्देश समाजाची गरज भागविण्याचा असतो. कारखानदाराचा नफा हा त्यामागील हेतु नसल्यामुळें समाजाच्या दृष्टीनें आवश्यक असें उत्पादन कारखान्याला फायदेशीर नसलें तरी हातीं घेतां येतें. सोव्हिएट देशांत साबणाची किंमत उत्पादनखर्चापेक्षां कमी ठेवण्यांत येत असे, याचा उल्लेख मागें आलाच आहे इतर देशांत आर्थिक अरिष्टाच्या काळांत ( १९२९ पासून पुढें दोनचार वर्षांत ) शिक्षण आणि आरोग्य या सामाजिक हिताच्या बाबींवरील खर्च कमी करण्यांत आला. उलट, सोव्हिएट देशांत हा खर्च प्रति वर्षी सारखा वाढत गेला व वाढत जात आहे. मुंबईसारख्या कारखान्यांच्या शहरांत कामगारांसाठीं असलेल्या गलिच्छ चाळी नाहींशा करण्याच्या मार्गांत घरमालकांची खाजगी मालकी व फायदा या गोष्टी आडव्या येतात, हा अनुभव नेहमींचाच आहे. बहुजनसमाजाच्या सुखसोयीपेक्षां बहुधनसमाजाचा फायदा हाच भांडवली अर्थव्यवस्थेचा हेतु आहे. याचें दुसरें उदाहरण कशाला हवें ? उलट ज्या वस्तूची सामाजिक गरज अधिक, तिचें प्रथम उत्पादन झालें पाहिजे हें तत्त्व योजनाबद्ध समाजवादी अर्थव्यवस्थेंतच अंमलांत येऊं शकते.

## माणसें हेंच भांडवल

तीच गोष्ट कारखान्यांत खपणाऱ्या कामगारांचें आरोग्य व सुरक्षितता ( Safety ) या संबंधींहि म्हणतां येईल. **माणसें हेंच देशांतील सर्वांत मौल्यवान् भांडवल आहे** (असें स्तालिन म्हणतो). कारखान्यांतील बांधणी आणि त्यामधील वेगवान् उत्पादन पद्धति ( Rationalisation ) यांचा कामगारांच्या शारीरिक वा मानसिक आरोग्यावर अनिष्ट परिणाम होत आहे किंवा कसें, याचा विचार केवळ नफ्याच्या राशीकडे डोळे लावून बसलेल्या मालकाला करण्याचें कांहींच कारण नसतें. उलट ज्यांच्या श्रमावर समाजाची इमारत उभी असते, त्या कामगार वर्गाच्या आरोग्याविषयीं समाजवादी अर्थव्यवस्थेंत प्रथम दक्षता घेतली जाते. उघडीं, भयानक, अजस्र यंत्रें, गलिच्छ कारखाने, आणि नजर ठरणार नाहीं








अशा प्रकारचे वस्तू नेणारे गतिमान् पट्टे (Conveyor belts) सोव्हिएट देशांत सहसा आढळून येणार नाहींत.

## भांडवली व्यवस्थेंतील अंतर्विरोध

भांडवली उत्पादनांतील एक मूलभूत विरोध असा आहे कीं, जेवढ्या वस्तु उत्पन्न होतात त्या विकत घेण्याइतकी आम समाजाची ऐपत कधींच असूं शकत नाहीं. कारण कामगारांना मिळणारें एकूण वेतन वस्तूंच्या एकूण किंमतीहून कमीच असतें. तसें नसतें तर कारखानेवाल्याला नफा कसा मिळणार? आणि मग तो कारखाना चालवील तरी कशाला? या मूलभूत विरोधामुळें भांडवली अर्थव्यवस्थेवर आर्थिक अरिष्टें कोसळतात. बाजारांत माल भरपूर, पण विकत घेण्यासाठीं सामान्य जनतेजवळ दिडकी नाहीं, अशी स्थिति प्राप्त होते. परिणाम — बेकारी, उपासमार, हालअपेष्टा आणि मग वस्तूंची कृत्रिम कमतरता उत्पन्न करण्यासाठीं धनिकांनीं केलेला वस्तूंचा पद्धतशीर नाश! समाजवादी अर्थव्यवस्थेंत कामगारांचें वेतन, त्यांच्या श्रमापासून कारखान्याला होणाऱ्या फायद्यावर अवलंबून नसतें. वेतनाची योजना आणि वस्तूंच्या किंमती ठरवितांना त्यामागील उद्देश एकूण उपभोग्य वस्तूंची सर्व नागरिकांमध्यें योग्य प्रमाणांत वांटणी करण्याचा असतो. अर्थात् वेतनाचें प्रमाण एकूण उत्पादनाच्या वाढीप्रमाणें वाढत जातें. म्हणून समाजाचें एकूण वेतन आणि एकूण उत्पादन यामध्यें तफावत नसते. त्यामुळें उपभोग्य वस्तूंचा उठाव तात्काळ होतो. अर्थात् वस्तूंचें फाजील (विकत न जाण्याइतकें) उत्पादन हा प्रकार तेथें संभवतच नाहीं. उत्पादन जेवढें अधिक होईल तेवढें हवेंच, कारण मग सर्वांना अधिक उपभोग्य वस्तू मिळतात. मालाला सारखी मागणी असल्यामुळें उत्पादन सारखें वाढत जातें, श्रमांची बचत करणारे नवे यांत्रिक व तांत्रिक शोध उपयोगांत आणले जातात; आणि उत्पादन कितीहि वाढलें तरी भांडवली अर्थव्यवस्थेंतील आर्थिक अरिष्टासारखा पेंचप्रसंग ओढवणें शक्यच नसतें.

भांडवली अर्थव्यवस्थेचें स्वरूप आज सुखातीच्या अवस्थेप्रमाणें खुल्या स्पर्धेवर आधारलेलें नसून तिनें मक्तेदारीचें रूप धारण केलें आहे. देशांतील अर्थव्यवस्थेच्या नाड्या मूठभर मक्तेदारांच्या हातांत असल्याचें दिसून येतें. बाजारपेठा आणि भांडवल पेरण्याचे प्रदेश म्हणून जगाची आधींच वांटणी झालेली आहे आणि दिवसेंदिवस अधिकाधिक भाग भांडवली चौकटींतून निसटून समाजवादी अर्थव्यवस्थेकडे जाऊं पाहात आहे. अशा या परिस्थितींत भांडवली अर्थव्यवस्था कायमच्या आर्थिक अरिष्टांत सांपडली असून त्यांमधून वाट काढण्यास तिला महायुद्ध किंवा जगावर फॅशिस्ट स्वरूपाचें अधिराज्य स्थापणें याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. आणि यामधूनहि तिचे अंतर्विरोध सुटत नाहींत. भांडवली व्यवस्थेंतील अंतर्विरोध तिच्या चौकटींत राहून मिटणें शक्य नसल्यामुळें ती दिवसेंदिवस मोडकळीस येत चालली आहे. समाजवाद प्रस्थापित झाल्याशिवाय हे अंतर्विरोध नाहिंसे होणार नाहींत.

पैसा हा भांडवली अर्थव्यवस्थेचा पाया आहे. नव्या भांडवलाची निर्मिति, उत्पादनाची वाढ वगैरे सर्व गोष्टींमध्यें पैशाला महत्वाचें स्थान असतें. म्हणून पैसा, चलन, हुंडणावळ यांमध्यें उद्भवणाऱ्या अनंत अडचणींचा उत्पादनावर परिणाम होतो. आणि अर्थव्यवस्थेंत अस्थिरता निर्माण होते. उलट योजनाबद्ध अर्थव्यवस्थेंत पैशाला गौण महत्व असून मुख्य गोष्ट उत्पादनयोजना असते. तेव्हां पैशापासून उद्भवणारे पेंचप्रसंग तेथें उपस्थित होत नाहींत.

## योजनाबद्ध अर्थव्यवस्थेंतील कांहीं प्रश्न

याप्रमाणें समाजवादी नियोजित अर्थव्यवस्था भांडवली अर्थव्यवस्थेपेक्षां निःसंशय श्रेष्ठ आहे, हें खरें. परंतु या अर्थव्यवस्थेंत कोणतेच प्रश्न सोडवावे लागत नाहींत, एकदा समाजवादी सत्ता स्थापन झाली कीं, सर्व कांहीं आपोआप सुरळीत चालतें, असें नाहीं. सोव्हिएट देशांत योजनाबद्ध अर्थव्यवस्था प्रगत होत गेली, तसतसे अनेक नवे प्रश्न उपस्थित झाले. यांपैकीं कांहींचा विचार मागेंच (१ल्याच प्रकरणांत) झालेला आहे. आतां इतर महत्त्वाच्या अडचणी कोणत्या येतात व त्यांचा कसा निरास होतो इकडे वळूं.



अनुक्रमणिका






# दोन अर्थव्यवस्था

आर्थिक नियोजन केल्यानें किती वस्तू उत्पादन करावयाच्या, हें ठरवून तें पार पाडतां येतें. परंतु उत्पादित वस्तूंचा गुणात्मक दर्जा उत्तम प्रतीचा राखणें हें काम सहज साध्य नाहीं. सोव्हिएट देशांत हा प्रश्न उद्‌भवला. भांडवली उत्पादनामध्यें कारखानदार स्वतःच उत्पादनाच्या या बाजूकडे जरूर लक्ष देतो. पण सोव्हिएट अर्थव्यवस्थेंत मालकांना स्थान नसल्यानें याकारितां खास उपाय योजणें भाग पडलें. जरूरीपेक्षां जास्त श्रमशक्ति आणि कच्चा माल वापरला जाऊं नये, या हेतूनें प्रथम उत्पादनाच्या खर्चावर विशेष कटाक्ष ठेवण्यांत येऊं लागला; तसेंच हिशेब व्यवस्थित ठेवले जावे, यासाठीं नवे निर्बंध योजण्यांत आले. वस्तू अमुक एका दर्जाच्या उतरल्या नाहींत तर कारखान्याच्या स्वतांच्या वाढीसाठीं आणि सुखसोयीसाठीं योजलेली रक्कम कमी व्हावी अशी पद्धत यानंतर चालू झाली. हळू हळू एखादी वस्तु तयार करण्यासाठीं लागणारा निरनिराळा कच्चा माल आणि श्रमशक्ति यांच्या अनुरूप प्रमाणाचे निर्देशांक ठरविणें सुरू झालें. वस्तु अपेक्षित दर्जाप्रत उतरल्या नाहींत, तर त्याबद्दल अधिकारी वर्गास जबाबदार धरण्यांत येईल, असा सक्त नियम करण्यांत आला. याच्या जोडीनें उत्तम प्रतीच्या वस्तू तयार करणारे कामगार, अधिकारी व कारखाने यांचा गौरव होऊं लागला आणि द्रव्यरूपानें बक्षीसहि देणें सुरू झालें. उत्पादनांत उच्चांक आणि उत्तम दर्जा गांठण्याची ही प्रवृत्ति कामगारांत इतकी पसरली कीं, तिनें एका मोठ्या देशव्यापी चळवळीचें स्वरूप धारण केलें. समाजवादी अर्थव्यवस्थेमध्यें उत्पादनांत सुधारणा करण्यास कामगारांना उत्तेजन मिळत नाहीं. सर्वसामान्य संकेत अशाप्रकारें खोटा ठरला.* हा मुद्दा विशेष महत्त्वाचा असल्यामुळें अधिक विवेचन पुढें केलें आहे.

उत्पादनाचा दर्जा वाढविण्यासाठीं अधिकारी वर्गावर अधिकाधिक जबाबदारी टाकणें भाग होतें. म्हणून त्याला आपलें कौशल्य व कार्यक्षमता दाखविण्याकरतां अधिक वाव देणें आवश्यक होतें. नियोजनसमितीकडून होणाऱ्या सूचनांची व्याप्ति किती असावी आणि कारखान्यांच्या अधिकाऱ्यांची कक्षा किती वाढवावी, हा प्रश्न उद्‌भवणें स्वाभाविक होतें. अखेर अनुभवानेंच हें प्रमाण अजमावावें लागलें; आणि अखेर मध्यवर्ति योजनासमिति आणि विविध खातीं व कारखाने यांमध्यें आज असणारे संबंध प्रस्थापित झाले.

## कामगारवर्गाची नवी भूमिका

समाजवादी अर्थव्यवस्थेंत कारखान्यांतील कामगारवर्ग आणि अधिकारी वर्ग यांचे परस्पर संबंध नव्या प्रकारचे असणार, हें उघड आहे. झारशाही भांडवली अर्थव्यवस्थेंत हे संबंध विरोधाचे होते. क्रांतीनंतर प्रथम प्रथम हीच प्रवृत्ति चालू राहिली. सत्ता कामगारांच्या हातीं असल्यामुळें अधिकारी वर्ग उत्पादनाविषयीं उदासीन असे. कामगार संघटनाही प्रथम प्रथम कामगारांच्या हितास जपण्यापलीकडे आपलें अधिक कांहीं कार्य सुरू आहे असें मानीत नसत. परंतु हळू हळू कामगार वर्गांतून नवा सुशिक्षित, यंत्रज्ञ अधिकारी निर्माण झाल्यावर ही परिस्थिति बदलू लागली. आतां उत्पादन वाढविण्यासाठीं आणि त्याचा दर्जा सुधारण्यासाठीं, नवी समाजवादी शिस्त लावण्यासाठीं अधिकारी वर्गाशीं सहकार्य केलें पाहिजे; असें केलें तरच आर्थिक प्रगति झपाट्यानें होऊन समाजवादी क्रांति यशस्वी होईल; भांडवलदारवर्ग नष्ट झाल्यानें आतां उत्पादन जेवढें वाढेल तेवढा सर्व समाजाचा आणि म्हणून आपलाच फायदा होणार आहे—ही नवी जाणीव कामगार संघटनांना होऊं लागली. सोव्हिएट कामगार संघटना कामगारांच्या हितसंरक्षणाबरोबरच उत्पादनांतहि आतां जातीनें लक्ष घालतात आणि अधिकारी वर्गाशीं सहकार्य करतात आणि त्यासंबंधीं त्यास महत्त्वाचे अधिकार असतात. म्हणूनच सोव्हिएट देशांतील कामगारसंघटनेंत संपाचें महत्त्व नाहिंसें झालें आहे. अशाप्रकारें उत्पादनाची जबाबदारी मुख्यतः अधिकारी वर्गावर टाकलेली असून देखील कामगारवर्ग उत्पादन वाढीकरितां आणि उत्पादनाचा दर्जा सुधारण्याकरितां स्वयंस्फूर्तीनें पुढें येतो.

एवढ्या मोठ्या औद्योगिक प्रगतीचें नियोजन करावयाचें म्हणजे नवा कामगारवर्ग मिळविला

### शेतकऱ्यांचा प्रश्न

शेतीचें उत्पादन योजनाबद्ध करण्याच्या मार्गांत शेतकऱ्याच्या मालकीचे लहान लहान जमिनीचे तुकडे हीच पहिली अडचण होती. शेती सामायिक होऊं लागतांच ती अडचण दूर होऊं लागली. परंतु शेती यांत्रिक होण्यासाठीं यंत्रसाधनादि नवें भांडवल निर्माण होणें जरूर होतें. सामान्य शेतकऱ्यांना हीं यंत्रसाधनें विकत घेणें कसें परवडेल ? ही जबाबदारी सरकारनें स्वीकारली आणि सामायिक शेतीचे विसा-विसांचे, तिसातिसांचे असे गट पाडून प्रत्येक गटाला आवश्यक असणारीं यांत्रिक औतें व इतर साधनें पुरविणारी शेती यंत्रांचीं केंद्रें ( Machine Tractor stations ) सुरू करण्यांत आलीं. याचा मोबदला सरकार पिकांचा कांहीं हिस्सा नियंत्रित भावानें घेतें आणि शेती—यंत्रांच्या केंद्रांवरील कामगारांनाहि ठराविक भाग दिला जातो. अशा प्रकारें विकाऊ पिकांचा बराच मोठा भाग सरकार खरेदी करीत असल्यानें अप्रत्यक्षपणें शेतीचें नियोजन करणें शक्य होतें. तसेंच बी-बियाण्याची सुधारणा, खतपाणी आणि इतर शेतीविषयीं तज्ज्ञ सल्ला देऊन सरकार शेतीचें उत्पादन वाढविण्यास मदत करतें.

सामायिक शेतकरी झाला तरी स्वतःची शेत-जमीन असावी व स्वतःसाठीं गुरेंढोरें व कोंबडी, बकरी पाळावी अशी अनिवार इच्छा त्याला असतेच. शेतकऱ्याची ही स्वाभाविक प्रवृत्ति आणि शेतीचा सामायिकपणा यामध्यें मेळ घालणें हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा होता. सोव्हिएट सामायिक शेतकरी सामायिक शेतावर काम करून राहिलेल्या वेळांत स्वतःच्या मालकीच्या लहानशा जमिनींत स्वतां पीक काढतो, यासाठीं सरकारी शेती यंत्रांचें केंद्र त्याला यांत्रिक साधनेंही पुरवितें; शिवाय सामायिक शेतकरी मर्यादित प्रमाणांत जनावरेंही पाळतो. या सर्व वस्तू त्याला स्वतंत्रपणें विकतां येतात. मात्र या उत्पन्नावर त्याला थोडासा अधिक कर द्यावा लागतो.

शेती व उद्योगधंदे यांपासून उत्पन्न होणाऱ्या उपभोग्य वस्तूंचा शहरी व खेडूत जनतेस पुरवठा करण्याचें काम म्हणजेच अंतर्गत व्यापार, सोव्हिएट सरकारचें व्यापारी खातें आणि सहकारी संस्था यांमार्फत चालतो. व्यापाराची योजना कशी केली जाते आणि त्यांचें काम कसें चालतें, हें सांगण्याची ही जागा नव्हे. जनतेची क्रयशक्ति वाढली आणि सांस्कृतिक आणि भौतिक गरजा वाढूं लागल्या तसतसें उत्पादनांत प्रचंड वाढ होत असूनहि वस्तूंचा तुटवडा फार भासूं लागला व अद्यापही कांहीं अंशीं भासतो. मूलभूत औद्योगीकरणाच्या प्रचंड कार्यक्रमामुळें १९३६ सालापर्यंत नित्योपयोगी वस्तूंचें रेशन करणें भाग झालें,याचा उल्लेख मागें आलाच आहे.हा तुटवडा तीव्रतेनें भासला आणि त्यामुळें बाहेरच्या देशांतील लोकांना असें वाटत असें कीं, सोव्हिएट औद्योगीकरणाची योजना फसली असून देशांत उपभोग्य वस्तूंचें उत्पादन घटून दुष्काळ पडलेला आहे. उदाहरण मनोरंजक व बोधप्रद आहे. १९३०—३२ मध्यें अंगाचा साबण आणि बूट यांची कमालीची टूट भासली. परंतु वास्तविक याच काळांत या दोन्ही वस्तूंचें उत्पादन कितीतरी पटींनें वाढलें होतें. मग असें कां झालें? याचें खरें कारण असें होतें कीं, जे लोक पूर्वी कधींच अंगाला साबण लावीत नव्हते वा बूट वापरीत नव्हते, ते आतां या नव्या वस्तू वापरावयास शिकले होते आणि विकत घेण्याइतके पैसेहि त्यांना आतां मिळत होते ! जसजसें औद्योगीकरण वाढत गेलें, तसतसें सर्वत्र सुबत्तेचें वातावरण दिसूं लागलें. अर्थव्यवस्था भांडवली नसल्यामुळें एकीकडे उत्पादनवाढ आणि दुसरीकडे वस्तू विकत घेण्यास पैसा नाहीं, अशी परिस्थिति निर्माण होण्याचें तेथें कारणच नव्हतें.

१९३८ सालापर्यंत सोव्हिएट अर्थव्यवस्थेनें हे प्रमुख प्रश्न सोडविले आणि तिला मजबुती आली. यापुढें तिच्या मार्गांत कोणत्याच अडचणी नव्हत्या अगर नाहींत असें नाहीं; पण त्या मूलभूत स्वरूपाच्या नसून तांत्रिक स्वरूपाच्या होत्या आणि अधिक अनुभवाअंतीं त्यांचें सहज निराकरण होणें शक्य होतें. युद्धकाळांत सोव्हिएट समाजवादी अर्थव्यवस्था पुरेपूर कसास उतरली आणि तिचें स्थैर्य व सामर्थ्य सिद्ध झालें. युद्धानंतर ती आतां पुढील मार्ग आक्रमीत आहे.

# प्रासंगिक स्फुट लेख

## हिंसेचें उच्चाटन

महात्मा गांधींचा महान् आत्मा जगांतल्या व्यवहारांतून हिंसेचें उच्चाटन व्हावें असें इच्छितो. या इच्छेच्या प्रभावी प्रेरणेनें त्यांनीं सामुदायिक सामसत्याग्रहाचें तंत्र दाक्षिण आफ्रिकेंत सुरू करून त्याचा येथें स्वराज्याची मागणी व सुराज्याची मागणी सामर्थ्यवान् करण्यासाठीं वेळोवेळीं उपयोग केला. थोड्या दिवसांपूर्वी ता. ५–११–४७ या दिवशीं महात्माजींनीं दिल्लींत प्रार्थनोत्तर भाषणांत काश्मीरच्या संरक्षक लढ्यासंबंधानें बोलतांना असें म्हटलें कीं, संघराज्यांतून काश्मीरला अहिंसापूर्ण कुमक पुष्कळ पाठवितां येण्यासारखी आहे. हें अहिंसक संरक्षकदल शिस्तबद्ध आक्रमक सैन्याची चढाई थोपवितांना आपल्या कर्तव्याच्या पालनांत आपल्या जागीं द्वेषरहित व क्रोधरहित मनानें देह ठेवील, प्रतिकार करतांना शस्त्रास्त्रें तर राहोतच पण आपल्या मुठींचाहि उपयोग अहिंसक संरक्षक करणार नाहींत.--या शब्दांत त्यांनीं अहिंसक संरक्षणतंत्राचें स्वरूपवर्णन लोकांपुढें मांडलें.

महात्मा गांधींप्रमाणें तीव्रतेनें नसेल पण त्यांच्याइतक्याच प्रामाणिकपणानें सर्वसामान्य सुसंस्कृत लोक जगांतल्या व्यवहारांतून अहिंसेचें उच्चाटन व्हावें असें इच्छितात, असें मला वाटतें. ही सुसंस्कृतांची इच्छा सफल–पूर्णतया सफल–होईल, तो सुदिन. पण हा सुदिन कालोदरांत असेलच तर तो सुतराम् दूरस्थ आहे. व्यवहारदृष्टीनें आपणांस पहावयाचें तें हें कीं, हिंसा जितकी कमी होईल तितकें चांगलें.

आज समाजवादी लोकशाहीचा पुरस्कार करणारे असें म्हणतात कीं, जगांत ही नवी व्यवस्था सर्व देशांत झाली तर युद्धें होण्याचें कारण राहणार नाहीं. अर्थात् हिंसा पुष्कळ कमी होईल. पण सार्वत्रिक समाजवादी लोकशाही हा बराच दूरचा टप्पा आहे. ही लोकशाही आणावयाचा मार्ग हिंसेचा असणार, असें बहुतेक समाजवादी म्हणतात. कांहीं थोडे या मताचे आहेत कीं, अहिंसेचा मार्ग न सोडतांहि कांहीं देशांत समाजवादी व्यवस्था अंमलांत आणतां येईल.

ज्यांना हिंसेची शिसारी आलेली आहे, अहिंसा लवकर प्रभावी व्हावी अशी ज्यांना तळमळ लागलेली आहे, त्यांना आजचे हिंसाप्रधान प्रसंग अहिंसाप्रधान कसे होतील, याचा विचार करणें प्राप्त आहे.

आज स्पृश्यास्पृश्य विग्रह आहे, हिंदु--मुसलमान विग्रह आहे, मालक--मजूर विग्रह आहे, अनेक विग्रह आहेत. हिन्दु--मुसलमान विग्रह विकोपाला गेलेला आहे, दुसरे जाऊं घातलेले आहेत. विग्रहवाल्यांची समजूत घालण्याचे प्रयत्न होत आहेत. ' हिंसेशिवाय आपापले विरोध, त्यांचें मूळ काढून टाकून ' नाहिंसे करा, एकमेकांची बाजू समजून घ्या, बहुजनहिताचा विचार करा, संकुचित स्वार्थ सोडून द्या, राष्ट्रीय भावना वाढवा, धर्म अनेक असलेल्या देशांत धर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद शिका व शिकवा, जातिसंस्थेनें आज माजविलेला गोंधळ सर्व जाती समान मानून नाहिंसा करा, अन्नाची व इतर मालाची दिवसभर कष्ट करून निपज करणारे शेंकडा ९० लोक अन्नाला, वस्त्राला महाग व शेंकडा १० लोक चैनींत ही विषमता, जमीन व कारखाने समाजाच्या मालकीचे करून व दुसरी समाजवादी व्यवस्था करून दूर










करा,'' वगैरे विचार विचारवंत सामान्य लोकांना व समाजधुरीणांना देत आहेत व सर्वत्र विचारांची खळबळ चालूं आहे. मधून मधून संप होत आहेत, लढे होत आहेत. हिंसा लहानमोठ्या प्रमाणावर ठिकठिकाणीं चालूं आहे.

या परिस्थितींत सद्विचारांना सामान्य लोकांच्या व श्रेष्ठांच्या मनांत लवकर स्थिर स्वरूपाची प्रतिष्ठा मिळवून देण्यास लहानमोठें सामूहिक स्वयंबलिदान उपयोगी पडेल, असें मला फार दिवसांपासून वाटत आहे.

महात्मा गांधींचें नुकतेंच झालेलें ५—११—४७ चें दिल्लींतील प्रार्थनोत्तर भाषण वृत्तपत्रांत वाचून मला माझे सामूहिक—स्वयंबलिदानविषयक विचार विचारी जनतेपुढें ठेवावे, असें वाटलें व त्याप्रमाणें हा प्रयत्न मी करीत आहे.

मी साडेचार वर्षे ( जून १९०८ ते डिसेंबर १९१२ ) अज्ञातवासांत असतांना अनेक प्रकारें विचार करीत होतों. अशा विचारमंथनाच्या एका प्रसंगीं १९१२ नोव्हेंबर २० ला मला सामूहिक स्वयंबलिदानाचा विचार सुचला. या विचाराचा प्रसार थोडासा १९३१ सालीं महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीचा अध्यक्ष असतांना मी केला. नंतर १९३७ सालींहि थोडासा प्रचार केला. १९३१ सालीं चार महिन्याच्या दौऱ्यानन्तर कारागृहवास मिळाला म्हणून, १९३७ सालीं एकदोन महिन्याच्या दौऱ्यानंतर दौऱ्याला पैसे नव्हते म्हणून प्रचारकार्य थांबविलें. आज पुन्हा अनुकूल काल वाटत आहे व ऊर्मि आली आहे पुनः विचार जनतेपुढें मांडण्याची.

'प्रेमकथा' नांवाचें एक प्रकरण मी रत्नागिरी तुरुंगांत १९३३ सालीं लिहिलें. त्यांत सामूहिक स्वयंबलिदानाच्या माझ्या कल्पनेची जन्मकथा घातलेली आहे.

नावडे मरणें लोक सुखें न मरतील जे
सामान्य-रण चिंतेनें मच्चित्त थरके थिजे
जेणें मरणभीतीचें मरणें कांहिंसें टळे
मार्ग काढावया ऐसा मच्चित्त थिजलें वळे
लय लावूनि बसतां लाधला मार्ग नूतन
भागीरथीतटाकीं हें घडलें वृत्त पावन
नवीन रण एकेरी समूहें मरणें स्वयें
बोधूनि प्रतिपक्षासी न्याय्य जें करणें तयें.

माझी कल्पना कधीं सत्यसृष्टींत उतरेल कां ? या प्रश्नाला १९३३ सालीं मी असें उत्तर दिलें कीं,

वेळा येईल, आणील हरि ती जी मला हवी
स्वहोमरण खेळेल उत्साहानें प्रजा नवी

कारण माझें एक स्वप्न मला सत्यसृष्टींत उतरलेलें तेव्हां अनुभवास येत होतें. पूज्य अप्पासाहेब पटवर्धन व कित्येक तरुण तुरुंगांत भंगीकामास लागले होते.

दिलें भाग्य मला तेणें भंगीकामासि लाविलें
कांहीं ब्राह्मणवर्गीय जसें मी मानि भाविलें
लय तत्पदिं लावूनी हातीं मी झाडु घेतला
झाडितां झाडितां अंतीं भाग्याचा दिन पातला.

मी १९१३ सालापासून सर्व तऱ्हेचें झाडूकाम करूं लागलों व १९३२--३३ सालीं ( १९ वर्षांनंतर ) मला पूज्य अप्पासाहेब पटवर्धन व त्यांच्या वळणांतले कित्येक उत्साही तरुण, भंगीकामाला स्वयंस्फूर्तीनें लागलेले पाहून सहज फार बरें वाटलें. आणि आपलें दुसरेंहि सात्त्विक स्वप्न केव्हां तरी कृतार्थ होईल, अशी आशा उत्पन्न झाली.

" संघराज्यांतून काश्मिरला अहिंसापूर्ण कुमक पुष्कळ पाठवितां येण्यासारखी आहे " हे महात्मा गांधींचे शब्द माझ्या मनांत सारखे घोळत आहेत. सामूहिक स्वयंबलिदान करण्याला उत्सुक अशीं पुष्कळ माणसें संघराज्यांत आहेत, ही महात्मा गांधींची श्रद्धा आहे कीं माहिती आहे ? महात्मा गांधींच्या भाषणाच्या अंतिम भागांत " माझी तपश्चर्या या ध्येयाला अपुरी पडते, मला एवढें अहिंसेचें सामर्थ्य मिळो " असे शब्द आहेत. यावरून स्वयंबलिदानोत्सुक माणसें महात्माजींच्या हाताशीं नाहींत, इतकें तरी स्पष्ट दिसतें. अशीं कांहीं माणसें संघराज्यांत आहेत, अशी त्यांची माहिती असली पाहिजे व अशी पुष्कळ माणसें संघराज्यांत मिळूं शकतील, अशी त्यांची श्रद्धा असली पाहिजे. माझी श्रद्धा महात्माजींप्रमाणें आहे.

महात्माजी हीं सात्त्विक सामान्य माणसें संघटित करूं इच्छीत नाहींत, असें दिसतें. त्यांनीं अनेक








वर्ष पहिलें
अंक चौथा

# नवभारत

जानेवारी
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

सु. रा. ग्रंथमाला | जे. ॲण्ड एस्. को. | फडके प्रॉडक्टस्

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. मार्फत )

—**उद्यम इंजिनिअरिंग लि., पुणें** हा कारखाना स्वतःच्या नवीन एरंडवणें येथील साडेतीन एकरांच्या विस्तीर्ण जागेंत ता. १५ जानेवारी १९४८ पासून चालू होणार आहे. तेथें स्टोव्हज करण्याचा अभिनव उपक्रम कंपनी प्रथम हातीं घेईल.

—पत्र्यांचे लहान मोठे डबे करणाऱ्या दि **ट्रिनिटी मेटल वर्क्स लि.**, मुंबई या कंपनीचा स्टॅच्युटरी रिपोर्ट नुकताच बाहेर पडला. कंपनीचें जमा भांडवल रु. ३,६७,८०० पर्यंत गेलें आहे. कंपनीच्या संचालक मंडळानें एक लक्ष रु. च्या ठेवी घेण्यास परवानगी दिली आहे.

—**स्वस्तिक रबर प्रॉडक्टसचें** नुकतेंच दहा-लक्ष रु. च्या खाजगी लिमिटेड कंपनींत रुपांतर झालें असून कंपनीच्या संचालक मंडळांत श्री. शंतनुराव किर्लोस्कर, श्री. शेंबवेकर, श्री. बाबासाहेब साळवेकर प्रभृति मंडळी आहेत. या कंपनीनें नुकतेंच अमेरिकेंत रबरी खेळण्यांचें १०,००० डॉलरला पेटंट विकत घेतलें आहे, तसेंच हिंदुस्थान सरकारनें कंपनीला माशिनरी घेण्यासाठीं एक लक्ष डॉलर्सची परवानगी दिली आहे.

—**इंडियन ब्लेडस् ॲंड शॉप मेट्यालिक्स लि.**, पुणें या कंपनीची अमेरिकन माशिनरी फेब्रुवारीमध्यें हिंदुस्थानांत आयात होईल. कारखाना ग्वाल्हेर येथें चालू होणार असून तेथें दीड लक्ष रोज ब्लेडसचें उत्पादन होईल.

—**बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि.**, पुणें या कंपनीनें गेल्या वर्षाकरितां १० टक्के डिव्हिडंट वाटण्याचें योजिलें आहे.

—**मोती प्रॉडक्टस् सोलापूर** या सुदर्शन एग्युमिक्श्चर व मोती सौंदर्यप्रसाधनें यांच्या कारखानदारांनीं मद्रास इलाख्यांत विक्रीची संघटना केली असून तिकडे मालाला मागणी वाढूं लागली आहे.

—टिंक्चर्स्, एक्स्ट्रॅक्टस्, लिनीमेंटस्, सायरपस्, इंजेक्शन्स्, कीटकनाशकें इ. माल **मागोरा केमिकल कं. पुणें** २, सध्यां मोठ्या प्रमाणांवर करीत आहे. कोडोरा ( जनरल टॉनिक ) मागोकोडी–ग्लायसाका ( खोकल्यावर ), स्क्याबोरा, इ. नवीन पेटंटस् कंपनीनें नुकतीच बाजारांत आणली आहे.

—**बडोदा आयुर्वेदाश्रम ॲन्ड फार्मास्युटिकल वर्क्स लि.**, या कारखान्याची मुख्य कचेरी लोणावळा येथें आली असून लवकरच तेथें आधुनिक पद्धतीवर कारखाना चालू होईल. मुख्यत्वें आयुर्वेदीय पायावर फार्मास्युटिकल प्रॉडक्टस् तेथें तयार होतील.

—**बडोदा बॅटरीज लि.**, या कारखान्याची पुनर्घटना झाली असून मालाचें उत्पादन लवकरच जोरांत होईल.

—**महाराष्ट्र टेक्निकल अेज्युकेशन सोसायटीच्या** विश्रामबाग येथील न्यू इंजिनियरिंग कॉलेजच्या रेसिडेन्सीसाठीं सांगलीच्या श्रीमंत राजेसाहेबांनीं एक लक्ष रु. ची लांब मुदतीची ठेव देण्याचें कबूल केलें असून जानेवारींत कामाला सुरुवात होईल.









मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

## दोन अर्थव्यवस्था

### शेतकऱ्यांचा प्रश्न

शेतीचें उत्पादन योजनाबद्ध करण्याच्या मार्गांत शेतकऱ्याच्या मालकीचे लहान लहान जमिनीचे तुकडे हीच पहिली अडचण होती. शेती सामायिक होऊं लागतांच ती अडचण दूर होऊं लागली. परंतु शेती यांत्रिक होण्यासाठीं यंत्रसाधनादि नवें भांडवल निर्माण होणें जरूर होतें. सामान्य शेतकऱ्यांना हीं यंत्रसाधनें विकत घेणें कसें परवडेल ? ही जबाबदारी सरकारनें स्विकारली आणि सामायिक शेतीचे विसाविसांचे, तिसातिसांचे असे गट पाडून प्रत्येक गटाला आवश्यक असणारीं यांत्रिक औतें व इतर साधनें पुरविणारी शेती यंत्रांचीं केंद्रें ( Machine Tractor stations ) सुरू करण्यांत आलीं. याच्या मोबदला सरकार पिकांचा कांहीं हिस्सा नियंत्रित भावानें घेतें आणि शेती—यंत्रांच्या केंद्रावरील कामगारांनाहि ठराविक भाग दिला जातो. अशा प्रकारें विकाऊ पिकांचा बराच मोठा भाग सरकार खरीद करीत असल्यानें अप्रत्यक्षपणें शेतीचें नियोजन करणें शक्य होतें. तसेंच बीं-बियाण्याची सुधारणा, खतपाणी आणि इतर शेतीविषयीं तज्ज्ञ सल्ला देऊन सरकार शेतीचें उत्पादन वाढविण्यास मदत करतें.

सामायिक शेतकरी झाला तरी स्वतःची शेतजमीन असावी व स्वतःसाठीं गुरेंढोरें व कोंबडी, बकरी पाळावी अशी अनिवार इच्छा त्याला असतेच. शेतकऱ्याची ही स्वाभाविक प्रवृत्ति आणि शेतीचा सामायिकपणा यामध्यें मेळ घालणें हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा होता. सोव्हिएट सामायिक शेतकरी सामायिक शेतावर काम करून राहिलेल्या वेळांत स्वतःच्या मालकीच्या लहानशा जमिनींत स्वतां पीक काढतो, यासाठीं सरकारी शेती यंत्रांचें केंद्र त्याला यांत्रिक साधनेंही पुरवितें, शिवाय सामायिक शेतकरी मर्यादित प्रमाणांत जनावरेंही पाळतो. या सर्व वस्तू त्याला स्वतंत्रपणें विकतां येतात. मात्र या उत्पन्नावर त्याला थोडासा अधिक कर द्यावा लागतो.

शेती व उद्योगधंदे यांपासून उत्पन्न होणाऱ्या उपभोग्य वस्तूंचा शहरी व खेडूत जनतेस पुरवठा करण्याचें काम म्हणजेच अंतर्गत व्यापार, सोव्हिएट सरकारचें व्यापारी खातें आणि सहकारी संस्था यांमार्फत चालतो. व्यापाराची योजना कशी केली जाते आणि त्याचें काम कसें चालतें, हें सांगण्याची ही जागा नव्हे. जनतेची क्रयशक्ति वाढली आणि सांस्कृतिक आणि भौतिक गरजा वाढूं लागल्या तसतसें उत्पादनांत प्रचंड वाढ होत असूनहि वस्तूंचा तुटवडा फार भासूं लागला व अद्यापही कांहीं अंशीं भासतो. मूलभूत औद्योगीकरणाच्या प्रचंड कार्यक्रमामुळें १९३६ सालापर्यंत नित्योपयोगी वस्तूंचें रेशन करणें भाग झालें,याचा उल्लेख मागें आलाच आहे.हा तुटवडा तीव्रतेनें भासला आणि त्यामुळें बाहेरच्या देशांतील लोकांना असें वाटत असें कीं, सोव्हिएट औद्योगीकरणाची योजना फसली असून देशांत उपभोग्य वस्तूंचें उत्पादन घटून दुष्काळ पडलेला आहे. उदाहरण मनोरंजक व बोधप्रद आहे. १९३०—३२ मध्यें अंगाचा साबण आणि बूट यांची कमालीची तूट भासली. परंतु वास्तविक याच काळांत या दोन्ही वस्तूंचें उत्पादन कितीतरी पटीनें वाढलें होतें. मग असें कां झालें? याचें खरें कारण असें होतें कीं, जे लोक पूर्वी कधींच अंगाला साबण लावीत नव्हते वा बूट वापरीत नव्हते, ते आतां या नव्या वस्तू वापरावयास शिकले होते आणि विकत घेण्याइतके पैसेहि त्यांना आतां मिळत होते ! जसजसें औद्योगीकरण वाढत गेलें, तसतसें सर्वत्र सुबत्तेचें वातावरण दिसूं लागलें. अर्थव्यवस्था भांडवली नसल्यामुळें एकीकडे उत्पादनवाढ आणि दुसरीकडे वस्तू विकत घेण्यास पैसा नाहीं, अशी परिस्थिति निर्माण होण्याचें तेथें कारणच नव्हतें.

१९३८ सालापर्यंत सोव्हिएट अर्थव्यवस्थेनें हे प्रमुख प्रश्न सोडविले आणि तिला मजबुती आली. यापुढें तिच्या मार्गांत कोणत्याच अडचणी नव्हत्या असर नाहींत असें नाहीं; पण त्या मूलभूत स्वरूपाच्या नसून तांत्रिक स्वरूपाच्या होत्या आणि अधिक अनुभवाअंतीं त्यांचें सहज निराकरण होणें शक्य होतें. युद्धकाळांत सोव्हिएट समाजवादी अर्थव्यवस्था पुरेपूर कसास उतरली आणि तिचें स्थैर्य व सामर्थ्य सिद्ध झालें. युद्धानंतर ती आतां पुढील मार्ग आक्रमीत आहे.







पाहिजे, त्याला शिक्षण दिलें पाहिजे आणि त्याची निरनिराळ्या व्यवसायांमध्यें विभागणी केली पाहिजे. श्रमशक्तीची योजना आणि व्यावसायिक व औद्योगिक शिक्षण हे समाजवादी अर्थव्यवस्थेतील महत्त्वाचे प्रश्न आहेत. हे प्रश्न सोडविण्यासाठीं शिक्षणाच्या विविध सोयी आणि वेतनाचें वेगवेगळें प्रमाण, सवलती आणि देशाभिमान यांचा कसा उपयोग करण्यांत येतो, याचा उल्लेख मागें आलाच आहे.

उत्पादनाविषयींचा सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे नव्या अर्थव्यवस्थेंत कामगार आणि अधिकारी या दोघांची कार्यक्षमता आणि शिस्त कशी वाढवावयाची, त्यांना अधिकाधिक कार्यप्रवण कसें करावयाचें (Labour Incentives), हा होता. चांगल्या कामास अधिक वेतन हा एक उपाय झाला. पुढें उद्योगधंद्यांत नवी समाजवादी पिढी येऊं लागतांच समाजवादी चढाओढ, स्टॅक्नोवाईट चळवळ इत्यादि स्वयंस्फूर्त उत्पादनवाढीचे नवे प्रकार रूढ होऊं लागले. निरनिराळे कारखाने, कारखान्यांचे विभाग, कामगारांचे गट यांमध्यें उत्पादन वाढविण्यासाठीं चढाओढी लागतात आणि उच्चांक गांठणाऱ्यांचा जाहीरपणें सन्मान होतो. समाजवादी चढाओढींचा महत्त्वाचा विशेष असा कीं, जो गट उत्पादनाचा उच्चांक गांठील, तो गट इतर गटांच्या मदतीस येतो; त्यामुळें चढाओढींत वैयक्तिक कडवटपणा न येतां उलट सामुदायिक उत्साहाचें वातावरण सर्वत्र प्रत्ययास येतें.

स्टॅकोनोव नांवाच्या कोळसाखाण–कामगारानें उत्पादनाच्या पद्धतींत फेरफार करून उत्पादनाचें प्रमाण कितीतरी वाढविलें, तेव्हांपासून अशा तऱ्हेची स्वयंस्फूर्तीनें उत्पादनांत सुधारणा घडवून आणण्याची चळवळ सुरू झाली. तिलाच स्टॅक्नोवाईट चळवळ असें नांव पडलें आहे. स्टॅक्नोवाईट कामगार उत्पादन पद्धतींत ज्या सुधारणा सुचवितात, त्या केवळ वैयक्तिक करामतीवर अवलंबून नसतात. म्हणून हळूहळू बहुतेक सर्व कामगार तिचें अनुकरण करूं शकतात आणि सर्वसामान्य कार्यक्षमता वाढीस लागते. या चळवळीचें स्वरूप कांहीं कुशल कामगारांपुरतें मर्यादित राहिलेलें नाहीं; तिनें राष्ट्रव्यापी स्वरूप धारण केलें आहे. अशी उत्पादनवाढ घडवून आणणाऱ्या कामगारांचें वैयक्तिक वेतन तर वाढतेंच; शिवाय कामगार संघटना, अधिकारी वर्ग, सरकार आणि जनता यांजकडून त्यांचा गौरव होतो. त्यांस "श्रमवीर" (Labour Hero) अशी सन्माननीय पदवी मिळते आणि विशेष सवलती व द्रव्यरूपानें पारितोषिकेंहि दिलीं जातात.

कामगारांना कार्यप्रवण करणाऱ्या या मार्गांचें वैशिष्ट्य ध्यानांत घेतलें पाहिजे. भांडवली अर्थव्यवस्थेप्रमाणें वैयक्तिक हित आणि प्रगति ह्या यांमागील प्रधान प्रेरणा नाहींत. कारण एखादा कामगार जर वैयक्तिक करामतीनें उत्पादन वाढवीत असेल आणि त्यामुळें बरोबरीच्या इतर कामगारांच्या कार्यपद्धतींत सुधारणा होणार नसेल, तर त्याला मिळकत वाढली तरी त्याला सार्वजनिकरीत्या मानमान्यता मिळत नाहीं. इतकेंच नव्हे तर, जर एखादा कामगार केवळ स्वतःच्या हितासाठींच झटत असला आणि सामाजिक जबाबदाऱ्या पार पाडीत नसला, तर त्यावर त्याच्या सहकाऱ्यांकडून कडक टीका होते. तेव्हां समाजवादी अर्थव्यवस्थेंत वेतनांत भेदभाव ठेवून वैयक्तिक प्रयत्नांस वाव ठेवण्यांत आला असला, तरी उत्पादनांतील सुधारणांची मुख्य प्रेरणा सामाजिक स्वरूपाची आहे. वैयक्तिक हित हीच उत्पादनवाढीची मुख्य प्रेरणा राहाणार, हा भांडवली समाजांतील संकेत अशा प्रकारें खोटा ठरला आहे.

श्रमांचा व कौशल्याचा जसा गौरव होतो, तसा अंगचुकारपणा, निष्काळजीपणा आणि अनियमितपणा याबद्दल शासनही करण्यांत येतें. आपली जबाबदारी योग्य रीतीनें पार न पाडल्यास कारखान्याच्या अधिकाऱ्यांस कधीं कधीं फांशीचीच शिक्षा करण्यांत येते. 'सोव्हिएट देशांतील ही पाहा जुलूम जबरदस्ती आणि दडपशाही' असा भांडवली वृत्तपत्रें याचा बराच गवगवा करतात. खाजगी मालमत्तेस धक्का लावल्याबद्दल (चोरी, नुकसानी वगैरेबद्दल) भांडवली समाजांत जर शिक्षा होते, तर समाजोपयोगी उत्पादनकेंद्रावर ज्यांचा अधिकार आहे, त्यांना त्यांच्या कुचराईबद्दल आणि अशा रीतीनें समाजाचें नुकसान केल्याबद्दल शिक्षा होणें अयोग्य आहे असें कोण म्हणेल ?








प्रचंड संघटना उभ्या केल्या. पण ही स्वात्महोमाला सिद्ध असलेल्या माणसांची संघटना करणें त्यांनीं अद्यापि मनावर घेतलें नाहीं.

असें स्वात्महोमदल जर तयार होईल, तर प्रत्येक विग्रहाच्या क्षेत्रांत त्या त्या प्रसंगाच्या महत्त्वाप्रमाणें पांच, दहा, वीस, पन्नास, शंभर माणसें एकाच वेळीं होमून आग्रही विग्रहवाद्यांच्या मनांत सुविचारचक्र सुरूं करतां येईल व त्यांतून थोडेंबहुत सुफल निष्पन्न होईल, असा माझा विश्वास आहे. उदाहरणार्थ, मालक–मजूर–लढ्याच्या प्रसंगीं मालकाची बाजू अन्यायाची आहे, असें जनमत स्पष्ट झाल्यावर दहा स्वात्महोमचमूच्या सैनिकांना चमूपति अनुज्ञा देईल व त्या अनुज्ञेनुसार हे दहाजण पूर्वनिश्चित स्थळीं व वेळीं जाहीरपणें पूर्वनिश्चित योजनेनुसार मरून जातील. मरतांना मालकाला न्यायानें वागण्याची विनंति करणारें चमूपतीच्या सहीचें पत्रक त्यांच्याजवळ असेल, तें ते वाचून दाखवितील व नंतर सॉक्रेटिसाप्रमाणें विष प्राशन करून वा अन्य तऱ्हेनें देह ठेवतील.

येथें एका गोष्टीचा विचार करणें आवश्यक आहे. कायदा, आत्महत्येचा प्रयत्न गुन्हा आहे, असें म्हणतो. स्वयंबलिदान हीहि एक प्रकारची आत्महत्या आहे खास. पण ज्याप्रमाण ठार मारण्याच्या प्रयत्नाचे व ठार मारण्याचे आपण वेगवेगळे प्रकार कल्पितों आणि एका प्रकारच्या ठार मारण्याला व ठार मारण्याच्या प्रयत्नाला गुन्हा संबोधून कडक शिक्षा व दुसऱ्या प्रकारच्या ठार मारण्याला व ठार मारण्याच्या प्रयत्नाला महनीय त्याग संबोधून भरभक्कम पारितोषिक अशी व्यवस्था करतो, तशी स्वखुषीनें मरणाला कवटाळणारांच्या बाबतींतहि करतां येईल. मरणें उदात्त हेतूनें, समाजसेवेच्या हेतूनें कोणी पत्करीत असेल, तर त्याला कायद्याची मदत असावी, आडकाठी नसावी. कायद्यांत घोटाळा राहूं नये म्हणून उदात्त मरणप्रयत्नाला आत्महोमप्रयत्न व हीन मरणप्रयत्नाला आत्महत्याप्रयत्न अशीं वेगळीं नांवें या दोन भिन्न मरणप्रयत्नांना विधिमंडळाकडून दिलीं जावीं.

शिस्तबद्ध आक्रमक सैन्याची चढाई थोपविण्यास स्वात्महोमपथकांचा उपयोग करावा, अशी महात्मा गांधींची मनीषा. माझें म्हणणें–अगोदर स्वात्महोमदलें प्रांतोप्रांतीं तयार करा. त्यांतील स्वयंसैनिकांचा अगोदर सामान्य विग्रहाच्या प्रसंगीं अन्यायी पक्षांची न्यायबुद्धि जागृत करण्यासाठीं उपयोग करा; नंतर वैऱ्यांच्या आक्रमक सैन्यापुढें स्वात्महोमोत्सुकांचा होम कितपत योग्य याचा विचार करतां येईल व निर्णयानुसार आचार करतां येईल.

महाराष्ट्रांत स्वच्छता–मंत्रिपदाला जसे पूज्य अप्पासाहेब पटवर्धन मला योग्य दिसतात, त्याप्रमाणें स्वात्महोमदलें तयार करण्यासाठीं प्रचारकार्य करायला पूज्य सानेगुरुजी योग्य आहेत, असें मला वाटतें. मी थकलों आहे तरी शक्य तें सहकार्य या दोनहि विभूतींशीं मी करीन.

शेवटीं माझ्या मतें

या भवीं सर्व हिंसेचें उच्चाटन असंभव
परी स्वहोम–संतांनें तियेचा तनु संभव
आणि माझी श्रद्धा आहे कीं,
दीन–हिंसा दीन व्हाया अहिंसा व्हावया बली
स्वहोम भारतीं कालीं तळपेल स्थलीं स्थलीं.

**पां. म. बापट.**

## चुकीची दुरुस्ती

'नवभारत'च्या डिसेंबरच्या अंकांत 'संयुक्त महाराष्ट्राचें आर्थिक दर्शन' या लेखांत, ७१ च्या पानावर संपूर्ण संयुक्त महाराष्ट्र व त्याचे घटक यांचें क्षेत्रफळ (चौ. मै.) दिलें आहे. त्या रकान्यांत गोमंतकाचें क्षेत्रफळ ३८८ (चौ. मै.) असें नजरचुकीनें दिलें गेलें आहे ३८८ ऐवजीं १५३४ (चौ. मै.) असें पाहिजे. त्यामुळें संपूर्ण संयुक्त महाराष्ट्राचें क्षेत्रफळ १३२३२० ऐवजीं १३३४६६ असें येईल.

**का स.**



अनुक्रमणिका




